# आचार्यदेवो भव ।

विद्यार्थ्यांविषयीं अत्यंत प्रेम, अध्यापनाची अतीव लालसा,
सहज त्यागशीलता, सतत विद्याव्यासंग, देश-
कालानुरूप धर्मविचार करण्याची सरलप्रवृत्ति
आणि सौजन्य इत्यादि सद्‍गुणांनीं मंडित
असलेल्या तप स्वाध्यायनिरत गुरुवर्य
वेदशास्त्रसंपन्न नारायणशास्त्रीबुवा
मराठे यांच्या चरणीं ग्रंथकर्त्यानें
हा ग्रंथ अत्यंत आदरानें व
विनम्रभावानें अर्पण
केला आहे.

# कै. वा. बाळाजी विनायक बापट



जन्म शके १७६८
इ स १८४६

मृत्यु शके १८४८
इ स १९२६

# कै. वाळाजी विनायक बापट ह्यांचें

# अल्पचरित.

---

माझे वडील कै० ती. स्व. बाळाजी विनायक ( तात्यासाहेब ) बापट ह्यांचा जन्म पुणें येथें शके १७६८ (इ.स.१८४६) चे सुमारास झाला. वडील अगदीं ल्हानपणींच वारल्यामुळें, त्याचें पालनपोषण त्याचे वडील बंधु कै० ती. स्व. चिंतामणभटजी बापट ह्यानीं केलें. हे पुण्यातील जुन्या पिढींतले एक नामांकित वैदिक होते. त्यांनीं दोन वेदाचें चांगलें अध्ययन केलें असल्यामुळें, कांहीं लोक त्यांना द्विवेदी म्हणत. घरची अगदीं गरिबी असल्यामुळें, तात्यासाहेबांनीं वयाचे १७ वें वर्षींच जी. आय. पी. रेल्वेंत नोकरी धरिली. वरींच वर्षें ते वऱ्हाडांतील धामणगांव स्टेशनावर स्टेशनमास्तर होते. इ. स. १८९९ सालीं तारमास्तरांचा जो संप झाला, त्यांत हे सामील असल्यामुळें त्यांचीं नोकरी सुटली. नंतर ५।६ वर्षें मुंबईस कंत्राटाचीं कामें केल्यावर ते माझेजवळ येऊन राहिले. कारण त्यांना दुसरें अपत्य नव्हतें. पण शेवटीं एक दोन वर्षें आपल्या जन्मभूमींत देह पडावा, अशी प्रबल इच्छा त्यांना झाल्यामुळें ते पुण्यास जाऊन राहिले. तेथें वैशाख शु.१४ शके १८४८ (इ. स. १९२६) ह्या दिवशीं त्यांचें देहावसान झालें.

तात्यासाहेबांचा स्वभाव प्रेमळ, परोपकारी व करारी होता वरिष्ठ अधिकाऱ्यांशी त्यांचें वर्तन अगदीं बाणेदारपणाचें असे. पण कामांत

योग्य असल्यामुळें, त्याचें अधिकाऱ्याजवळ चांगलें वजन असे पुष्क
होतकरू तरुणाना त्यांनीं रेल्वेंत नोकऱ्या देवविल्या होत्या. अ
कित्येक लोक नोकरींत बढती मिळून चांगल्या स्थितीस पोंचलेले
अजूनही असतील. स्टेशनमास्तराच्या दर्जाला पोंचल्यामुळें तार
मास्तराच्या संपात सामील होण्यापासून त्याचा स्वत चा कांहीं फायदा
नव्हता. केवळ दुसऱ्याच्या आग्रहामुळें ते संपात मिळाले. पुढें कित्येक
तारमास्तरानीं रेल्वेच्या अपमानकारक अटी पत्करूनही पुनः नोकऱ्या
पतकरल्या. पण रेल्वे अधिकारी बोलावीत असताही, तात्यासाहेब हे
पुन नोकरीवर गेले नाहींत. त्याना स्वधर्माचा व स्वसंस्कृतीचा फार
अभिमान असे व हल्लींच्या अवनतीबद्दल त्याना फार वाईट वाटे

आपल्या शक्तीप्रमाणें वडिलाचें कांहीं स्मारक करावें, असें बरेच
दिवस माझे मनात होतें. आमच्या मंडळींचे परिचित श्री महादेव-
शास्त्री दिवेकर ह्यानीं लिहिलेल्या "आर्यसंस्कृतीचा उत्कर्षापकर्ष"
ह्या पुस्तकाच्या वाचनानें जनतेंत इष्ट दिशेनें कांहीं जागृति होईल,
असें वाटल्यावरून त्याचा पहिला भाग प्रसिद्ध करण्याचा सर्व खर्च
देण्याचें मी ठरविलें व शास्त्रीबोवानीं तो त्याच्या तिसऱ्या श्राद्धतिथीला
वाङ्मय स्मारक रूपानें प्रसिद्ध करण्याचें कबूल केलें. ग्रंथप्रकाशनाचा
हेतु अंशत. तरी साध्य होवो, अशी परमेश्वरापाशीं प्रार्थना आहे

सौ. लक्ष्मीबाई गोखले, नागपूर

# प्रस्तावना

हिंदुसमाजोद्धारक वाङ्मयमालेच्या तिसऱ्या पुस्तकाचा पूर्वार्ध आज वाङ्मय-स्मारक रूपानें प्रसिद्ध होत आहे याबद्दल आनंद वाटतो. हा ग्रंथ दोन भागांमध्यें प्रसिद्ध करण्याचा मनोदय नव्हता. परंतु विषयविवेचन करितांना ग्रंथ सुमारें ४०० पानांचा होईल अशी अटकळ आली. येवढा ग्रंथ छापण्यास एकदम द्रव्यादि मिळणार नाहीं व घाईघाईनें सर्व ग्रंथ लिहून संपविणेंहि इष्ट नाहीं म्हणून अकोला परिषदेहून आल्यावर फेब्रुवारी ते जुलै अखेर प्रकृति सभाळून एकदाचा पूर्वार्ध लिहून काढला. उत्तरार्धाची तयारीहि केली, परंतु गेल्या सात महिन्यांत प्रवास व व्याख्यानें या कार्यामुळें लेखनास अवसर मिळाला नाहीं पहिल्या गणपती-उत्सवात कापराड, आगाशी, मुंबई, विलेपार्ले, माटुंगा, अकोला, वर्धा, वरोडा, चांदा व नागपूर इतक्या ठिकाणीं व्याख्यानास जावें लागलें. पहिला गणेशो-त्सव संपवून वाईस येतों तों उमरखेडकरांच्या तारांवर तारा येऊ लागल्या म्हणून दुसरा गणपती-उत्सव तेथें करून येतां येतां पुसद व वाशीम येथें अनुक्रमें सात व पांच व्याख्यानें दिलीं पुढें लगेच काशी संमेलन उद्भवलें. त्याकरितां अगोदर व मागोदर मिळून दीड महिना मोडला! जानेवारी व फेब्रुवारी हे दोन महिने बार्शी, नगर, बडोदे, खामगाव, मेहेकर इतक्या ठिकाणीं व्याख्यानें देण्यांत गेल्यामुळें मार्चअखेर उत्तरार्ध लिहिण्यास वेळच मिळाला नाहीं, म्हणून पूर्वार्धच प्रसिद्ध करण्याचें ठरविलें आमचे वाचक व हितचिंतक ही वस्तुस्थिति लक्षांत घेऊन आम्हांला क्षमा करतील असा भरंवसा आहे.

कोणत्याहि संस्थेशीं संबंध न ठेवतां स्वातंत्र्यानें हिंदुधर्म-प्रचारकाचें कार्य करण्यास प्रारंभ करून तीन वर्षें झालीं. त्रैवार्षिक वृत्तान्त थोडक्यांत असा देतां येईल कीं, शके १८४८ साल हें ब्राह्मण-जातींची माहिती मिळविण्यांत व वऱ्हाड मध्यप्रांतांत हिंदुसंघटणाची जागृति करण्यांत गेलें. याच वर्षी अकोला परिषदेची भूमिका तयार केली गेली. शके १८४९ हें साल सप्रदणीसारख्या प्राणहारक शत्रूशीं झगडत ब्राह्मण-पोटजातिविषयक पत्रव्यवहार, वृत्तपत्रीं लेख

व वाङ्मयप्रकाशन या कार्यांत गेलें. याच वर्षी अकोला परिषदेचा वृक्ष लावण्यास सुरुवात केली. शके १८५० साल हें अकोला परिषद पचविण्याकरितां किंवा तेथें लावलेल्या वृक्षास पाणी घालण्यांत गेलें असें म्हटल्यास चालेल. अकोला परिषदेपूर्वी व परिषदेनंतर बृहन्महाराष्ट्रांत कोल्हापूर, नगर, बडोदे, नागपूर या भागांत ज्या ५०–६० ठिकाणीं निमंत्रणावरून आम्ही गेलों, तेथील प्रचंड श्रोतृसमुदायानें जें आमच्या विचाराचें आदरातिथ्य केलें, त्यावरून अकोला परिषदेविरुद्ध महाराष्ट्रांत लोकमत तयार करण्याचा यत्न कांहीं महाराष्ट्रीयांनीं काशीकर पंडितांच्या मदतीनें जरी केला, तरी त्यास मुळींच यश येणार नाहीं अशी खात्री वाटते. कारण हिंदु समाजात नवचैतन्याचा संचार होऊं लागला असून तेंच त्याच्या जिवंतपणाचें लक्षण आहे.

हिंदु समाजाचा अभ्यास करितांना अनेक विचार मनांत येतात. त्यांत सांप्रतची परधार्जिणी व घरबुडवी वृत्ति पाहून हा समाज अनादिकालापासून असाच आहे कीं काय अशीहि शंका कित्येक विचारतात. ही शंका सर्वथा निर्मूल आहे, आपली संस्कृति किती प्राचीन व किती उज्वल आहे, आपल्या संस्कृतीचा अपकर्ष कोणत्या कारणानीं झाला हें या ग्रंथांत दाखविण्याचा यत्न केला आहे. सांप्रत जगामध्यें सांस्कृतिक कलह मोठा चालू आहे या ओढाताणींत जगाला कल्याणकारक असलेली आर्यसंस्कृति अवश्य टिकविली पाहिजे. घरांत ना सत्ता व संघटितपणा आणि बाहेर ना त्राता ना दाता, अशा स्थितींत बौद्धक्रांतीपासून शिरलेले दोष समूळ नष्ट करण्याचा उद्योग यापुढें केला पाहिजे. बौद्धक्रांतीमुळेंच मुसुल्मानांचे पाय येथें स्थिर झाले व मुसुल्मानांच्या एकभक्ती व धर्मवेड्या वृत्तीमुळेंच पाश्चात्यांच्या मगरमिठींत आपण सांपडलों गेलों, ही विचारप्रणाली सर्व विद्वानांना मान्य होत आहे. प्रस्तुत ग्रंथातील अपकर्षमीमांसा आम्ही व्याख्यानांतून हजारों श्रोत्यांपुढें मांडली व ती त्यांना पसंत पडली. श्रद्धानंद पत्रांतील "महायुद्धाचें वारें व हिंदुस्थान" या लेखमालेंतील नाराध्या लेखांत या ग्रंथातील विचारांशीं जुळेल असेंच विवेचन केलें असून काशी सभेच्या एक प्रचारक पं. देवकृष्णशास्त्री यांनींसुद्धां ही अपकर्षमीमांसा पसंती

मान्य केली आहे. पंडित म्हणतात, हिंदु समाजानें आचार, विचार व संस्कारानें आतां वैदिक बनलें पाहिजे पण आम्ही म्हणतों, १०।५ हजार वर्षांच्या संक्रमणानंतर हें शक्य नसल्यामुळें वैदिक आर्यांच्या भावना, कल्पना, महत्त्वाकांक्षा, जयिष्णु वृत्ति, पुरुषार्थप्राप्ती यांशींच हिंदु समाजानें आतां समरस झालें पाहिजे मतभेद तो हाच, असो

हिंदुसमाजोद्धारक वाङ्मयमालेच्या द्वारें सेवा करण्यास अनेकांकडून आम्हास प्रोत्साहन मिळत आहे विशेषत श्री वासुदेवराव चितळे, श्री अबादासपंत देवुर्णीकर व श्री श्रीपादपंत अनगरकर यांच्याकडून जें प्रोत्साहन मिळतें तें शब्दानें सांगता येणें कठीण आहे निर्व्याज प्रेम इतकेंच फार तर म्हणतां येईल मालेच्या वाङ्मयाचा प्रचार करण्याचे कामीं श्री ए के वेडगे, सदाफळ वकील, शंकरराव सरनाईक, मधुकरराव हवालदार, एकबोटे, बाबूराव लातूरकर, व्यंकटराव कुलकर्णी, दिगंबरपंत बडवळकर, जहागीरदार वकील, भास्करशास्त्री सोमण आप्पासाहेब इळवे, शंकरराव सहाळकर, वि व वैद्य, वि ग जावडेकर वकील, सचित्तराव सहस्रबुद्धे, नारायणराव डाखळे, डॉ य वि पुरंदरे, स व बावडेकर इत्यादि सहृदय मनापासून साह्य करितात त्याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोंत

## आभार

प्रस्तुत ग्रंथांतील विषयाची चर्चा करून अनेक विद्वानांनीं आम्हास साह्य केलें विशेषत गुरुवर्य वे शा स नारायणशास्त्रीबुवा मराठे व प्रो शि द गोसले, नागपूर, यांनीं आपला पुष्कळ वेळ चर्चेस दिला, लेखी व तोंडी सूचना केल्या, बहुतेक ग्रंथ वाचून पाहिला, यांबद्दल या उभयतांचे कृतज्ञतापूर्वक आम्ही अत्यंत आभारी आहोंत गुरुवर्य मराठेशास्त्रीबुवांनीं ग्रंथ अर्पण करण्यास अनुज्ञा दिली हें त्यांच्या शिष्यवात्सल्याचें द्योतकच होय ग्रंथाला आधार म्हणून घेतलेल्या अनेक विद्वान् ग्रंथकारांचे आम्ही आभारी आहोंत मात्र ह्या सर्वांची परवानगी लेखी किंवा तोंडी घेतां आली नाहीं याबद्दल त्यांनीं क्षमा करावी ग्रंथ लिहिण्याचें काम रा रघुनाथराव रोडे मास्तर यांनीं नियमित येऊन व्यवस्थितपणें केलें हें सांगण्यास संतोष वाटतो अनेकांच्या साह्यानें ग्रंथ तयार झाला खरा,

परंतु तो या वेळीं प्रसिद्ध होण्याचें श्रेय सौभाग्यवती भगिनी लक्ष्मीबाई गोखले यांनाच आहे. त्यांनीं पितृस्मारकनिमित्तानें या ग्रंथाच्या छपाईचा खर्च दिला म्हणूनच हा ग्रंथ आतां प्रसिद्ध झाला. गतवर्षी नागपुरास गेल्या वेळीं प्रो. शि. ह. गोखले आणि त्यांच्या पत्नी सौभाग्यवती लक्ष्मीबाई गोखले यांनीं वाङ्मय–स्मारकाची कल्पना आम्हांस सांगितली व कै. बा. बापटांच्या द्वितीय श्राद्धतिथीच्या दिवशीं ग्रंथ प्रसिद्ध करण्याच्या अटीवर आम्ही मान्यताहि दिली. प्रकृतिदौर्बल्यामुळें गतवर्षींच्या वैशाखांत हा ग्रंथ लिहूनहि झाला नाहीं, मग प्रसिद्धीची गोष्ट कशाला! तथापि या सुजन पतिपत्नींनीं आम्हांस धीर देऊन एक वर्ष उशीरानें म्हणजे तिसऱ्या श्राद्धतिथीस हें कार्य आम्हांकडून करवून घेतलें या त्यांच्या उदारमनस्कतेबद्दल त्यांना धन्यवाद दिले पाहिजेत

वडिलांचें स्मारक व श्राद्ध हें वाङ्मयरूपानें करण्याचा उपक्रम आमच्या माहितीप्रमाणें महाराष्ट्रांत प्रथमतः सौभाग्यवती लक्ष्मीबाईनींच केला याबद्दल त्यांचें कोणीही सकौतुक अभिनंदन करील प्रो. शिवराम हरी ऊर्फ बाबासाहेब गोखले यांचा व आमचा परिचय सुमारें बारा वर्षांपूर्वी उमरावतीस झाला तेव्हांपासून त्यांचें आम्हांवर निर्व्याज प्रेम आहे म्हणूनच श्री. बाबासाहेबांनीं अनेक अडचणी असतां वेळ काढून ग्रंथ वाचून पाहिला, पत्रद्वारें व समक्ष सूचना केल्या, इत-केंच नव्हे तर आमच्या विनंतीस मान देऊन त्यांनीं छोटासा उपोद्घातहि लिहिला, याबद्दल त्यांचे आभार मानावेत तितके थोडेच आहेत चळवळी-पासून अलिप्त असलेल्या, सरकारी नोकरींत असतांना सुद्धां समाजाचें आस्थेनें अवलोकन केलेल्या माणसाचे विचार प्रसिद्ध पुढाऱ्यापेक्षांहि कधीं जोरकस अस-तात, या दृष्टीनें श्री गोखले यांचा उपोद्घात फार महत्त्वाचा आहे ग्रंथाच्या छपाईचें काम वेळेवर व व्यवस्थित केल्याबद्दल श्री. अतीतकर, व्यवस्थापक, समर्थ भारत प्रेस, यांचेहि आभार मानले पाहिजेत

शेवटीं ज्या परमात्म्याच्या कृपेनें हें पुस्तक लिहिण्याचें शारीरिक व मान सिक सामर्थ्य आम्हांला मिळालें, त्या अनंतकोटि ब्रह्मांडनायकाच्या चरणीं सानंद, सविनय सदर प्रणाम करून आणि तो परमात्मा उत्तरोत्तर विशेष सेवा करण्याचें सामर्थ्य देवो अशी प्रार्थना करून हें प्रस्तावनालेखन पूर्ण करितों

वैशाख शुद्ध १४।१८५१ }
पो वाई, जि सातारा }

महादेवशास्त्री दिवेकर.

# उपोद्घात

सुप्रसिद्ध हिंदुधर्म-प्रचारक व लेखक श्री. महादेवशास्त्री दिवेकर ह्यांनी लिहिलेल्या 'आर्यसंस्कृतीचा उत्कर्षापकर्ष' ह्या पुस्तकाच्या पहिल्या भागाला उपोद्घातादाखल चार शब्द मी लिहावे, अशी इच्छा त्यांनी प्रदर्शित केल्यावरून, हा लहानसा उपोद्घात लिहिला आहे

सध्या ह्या देशात आर्य संस्कृती, इस्लामी संस्कृती, व पाश्चिमात्य संस्कृती, अशा तीन भिन्न संस्कृतींचा झगडा चालू आहे हिंदु समाजाची सांप्रतची स्थिति फार शोचनीय व चिंताजनक झालेली दिसत आहे एवढेच नव्हे, तर आपला ह्यापुढें केव्हां तरी उत्कर्ष होईल, किंवा अवनती अशीच होत होत अखेरीस आपण नामशेष होऊ, असे निराशेचे विचारही केव्हां केव्हां कित्येकाचे मनांत घेतात परंतु आपणाला पुनः उत्कर्षाचा काल येणार, अशीच पुष्कळांची दृढ भावना असून अपकर्ष कोणत्या कारणांनी झाला, व उत्कर्ष कोणत्या उपायांनी होईल, ह्याचा विचार समाजातील लोकांमध्यें चालू आहे हा विषय अत्यंत महत्त्वाचा आहे हें सांगावयास नकोच. त्याची सांगोपांग चर्चा व्हावी, हाच ह्या ग्रंथाचा मुख्य हेतु आहे

आर्य संस्कृति ह्या देशांत केव्हांपासून सुरू आहे ह्याबद्दल विद्वानांमध्यें अजून बराच मतभेद आहे वैदिक आर्य मूळचे हिंदुस्थानचे रहिवाशी असून, गेल्या तीन चार शतकांत युरोपियन लोकांनी, आफ्रिका व अमेरिकाखंडात ज्याप्रमाणें वसाहती केल्या, त्याप्रमाणें त्यांनीही उत्तरध्रुवापर्यंत वसाहती केल्या होत्या, किंवा ते मूळचे बाहेरील असून प्राचीन काळी हिंदुस्थानात आले, ह्याबद्दलही एकमत नाहीं. ह्यांपैकीं कोणतेंही मत खरें असें अखेर ठरलें तरी सुमारें ६०००वर्षां पूर्वी आर्य संस्कृति ह्या देशात बद्धमूल झाली होती, असें म्हणण्यास हरकत नाहीं. वेदकाली, रामायणकाली व महाभारतकालीं तिचा सारखा उत्कर्ष होत होता हें ह्या पुस्तकाच्या २, ३, ४ ह्या प्रकरणांत बऱ्याच विस्तारानें दाखविलें गेलें आहे भारतीय युद्धाचे वेळीं तिच्या उत्कर्षाचा मध्यान्ह झाला होता, तेव्हांपासून पाणिनीच्या कालापर्यंत तिची स्थिरावस्था होती; पण तेव्हांपासून अपकर्षाचीं बीजें तिच्यामध्यें रुजू लागलीं, ह्याबद्दलही फारसा मतभेद होईल असें वाटत नाहीं नक्की अपकर्ष केव्हापासून सुरू झाला, हें सांगणें कठीण आहे.

तथापि मुसलमानान्या स्वाऱ्या सुरू झाल्या, तेव्हा हिंदु समाजात प्रतिकारशक्ति फारशी राहिली नव्हती, म्हणून आर्य संस्कृतीचा प्रत्यक्ष अपकर्ष तेव्हापासून सुरू झाला असें म्हणावयास हरकत नाहीं.

एखाद्या देशाचा किंवा समाजाचा अपकर्ष दोन कारणानी होतो. उत्कर्षाला अवश्य असे सर्व गुण समाजात असूनही, दैवयोगानें बाह्य परिस्थितीच इतकी प्रतिकूल होते कीं, तिचा प्रतिकार करणें अशक्य होतें. गेल्या महायुद्धात जर्मन लोकानी बेलजम देशावर स्वारी करून थोड्याच दिवसात तो देश पादाक्रात केला युद्धकलेचें ज्ञान, युद्धसामग्री, उत्कट देशाभिमान वगैरे गोष्टींत जर्मन लोकापेक्षा बेलजियन लोक कमी नव्हते, केवळ जर्मनीचें सैन्यबल अधिक होते, म्हणून त्याचा पराभव झाला महायुद्धात जर्मनीचा जय झाला असता तर त्या देशाची काय स्थिति झाली असती हें सागता येत नाहीं.

परतु मुसलमानानीं हिंदूचा पराभव केला, तो सैन्यबल, युद्धकौशल्य, किंवा शास्त्रास्त्रें ह्या बाबतींत ते हिंदूपेक्षा श्रेष्ठ होते म्हणून केला, असें नसून, हिंदूच्या अंगच्या किलेक अक्षम्य व घातक दोषामुळेच त्याना हार खावी लागली, असे इतिहासावरून दिसतें हे दोष कोणते ह्याचा थोडक्यात विचार करू.

संसार दु खमय आहे, तो क्षणिक आहे, तो असार आहे, शहाण्या माणसानें त्यात गुरफटून न राहता, आपल्या शाश्वत कल्याणाचा मार्ग शोधावा अशा प्रकारची बहुजनाची समजूत होणें, हें अवनतीचें मुख्य कारण आहे. मनाची अशा प्रकारें एकदा पक्की समजूत झाली म्हणजे मनुष्य किंवा समाज ऐहिक उन्नतीविषयी साहजिकच बेफिकीर होतो, इतकच नव्हे तर पारलौकिक सुखाकडे त्याचें सर्व लक्ष गुतलेलें असल्यामुळें ऐहिक अवनतीचेंही त्याला कांहींच वाटत नाहींसे होतें इसवी सनाच्या सातव्या शतकाचे सुमारास हिंदु समाजाची अशी स्थिति झाल्यामुळे, इस्लामी संस्कृतीशी झगडण्याला मनाचा जो ताठरपणा अवश्य होता तो नष्ट झाला होता.

आता कलियुग सुरू झालें, धर्म बुडणार, अधर्म माजणार, म्लेंच्छाचे अत्याचार होणार, ही परमेश्वराचीच इच्छा आहे, अशा प्रकारें मनें दुबळी करणारा भविष्यवाद लोकाचे मनावर पक्का बिंबला होता हेंही अवनतीचें तितकेंच बलवत्तर कारण आहे. अशा प्रकारच्या निरुत्साही विचारानीं लोकांची मनें

कमकुवत धर्मश्रद्धेमुळें, मुसलमानांना प्रतिकार समाजाकडून झाला नाही. ज्या महाभागानें भविष्यपुराण लिहिलें असेल, त्यानें इस्लामी सल्तनतीचें मोठेंच कार्य केलें असें म्हणावें लागतें।

आपसांतील फूट हे आमच्या अवनतीचें दुसरें बलवत्तर कारण आहे. यादवी हा शब्द जणू काय आमच्या हृदयावर पक्का कोरला गेला आहे. यादववीर प्रबल होऊन भूमीला असह्य भार झाला होता, व त्यांचा नाश होऊन हा भार हलका होणें अवश्य होतें. श्रीकृष्ण भगवानांनी सदुपदेशानें त्यांना ताळ्यावर कां आणलें नाही किंवा रामासारखी एखादी गोष्ट तयार करून, त्यांचा नाश कां केला नाहीं हें एक त्या भगवानालाच माहीत. एकमेकांशी लढून त्यांना आपला नाश करून घ्यावा, एवढा एकच उपाय त्यांना दिसला. त्याप्रमाणें यादवी होऊन यादवांचा तर नाश झालाच, पण हें यादवीचें बीज आमच्या मनोभूमींत इतकें पक्कें रुजलें आहे कीं, इतक्या दीर्घकालपर्यंत कटु अनुभव घेऊन सुद्धां आम्ही अजून सावध होत नाहीं. शिवाजी महाराजांचे कालीं व त्यानंतर कांहीं वर्षे मात्र, हें यादवीचें भूत पोटें तरी दडून बसलें होतें असें दिसतें. पण तेवढा काळ वगळला तर, मुसलमानांच्या स्वाऱ्या सुरू झाल्या तेव्हांपासून, अगदीं आज तागायतपर्यंत, आपसांत भांडून आम्ही आपला नाश करून घेत आहोंत. भगवानांनी उपदेशिलेला निष्काम-कर्मयोग आम्ही केव्हांच विसरून गेलों; पण यादवीचें तत्त्व मात्र अजून विसरलों नाहीं.

आपसांतील भांडणामुळें उत्पन्न झालेली द्वेषबुद्धि, व सूड घेण्याची इच्छा आम्हांला अगदीं कळसाला नेते. अशा प्रकारें आपल्या प्रतिपक्षाचा सूड उगविल्यानें समाजाचें, देशाचें व आपल्या धर्माचें कितीं नुकसान होईल, ह्याचा विचारही मनांत न येणें, हा आमच्या स्वभावांतला आणखी एक दोष आमच्या नाशास कारणीभूत झालेला आहे. पृथ्वीराजाचा सूड उगविण्यासाठीं जयचंदानें घोरीला बोलावून प्रथम त्याचा नाश करविला, व लौकरच त्याचा स्वतःचा नाश झाला, हें इतिहासज्ञांस माहीतच आहे. लखुजी जाधवानेंही वैरभावामुळें शहाजीचा नाश करण्याचा प्रयत्न केला होता; तो सिद्धीस गेला नाहीं ही गोष्ट वेगळी. परस्परांतील भांडणामुळें आम्ही अगदीं आंधळे होतों व सूड उगविणें एवढेंच आमचें ध्येय बनतें, मग परिणाम कांहींही होवो!

पण ह्या बाबतींत इंग्लिश लोकांचें उदाहरण पाहिलें म्हणजे त्या लोकांची आज स्थितीक शतकें सारखी उन्नति का होत आहे तें कळतें मेरी व एलिझाबेथ ह्या राण्यांचे कारकीर्दीत रोमन कॅथोलिक व प्रॉटेस्टंट ह्या दोन पक्षांतील द्वेष फार विकोपास गेला होता. मेरीचे कारकीर्दीत कित्येक प्रॉटेस्टंट लोकांना जिवंत जाळण्यांत आलें होतें एलिझाबेथ राणीचे कारकीर्दीत रोमन कॅथोलिकांचाही पुष्कळ छळ झाला होता. पण स्पॅनिश लोकांची स्वारी आपल्या देशावर येत आहे असें कळल्याबरोबर, दोन्ही पक्ष आपला द्वेषभाव विसरून गेले, व त्यांनीं एकजुटीनें शत्रूला तोंड दिलें. इंग्लिश आरमाराचा मुख्य सरदार हा स्वत रोमन कॅथॉलिक होता हें इतिहासज्ञास माहीत आहेच तसेंच गेल्या महायुद्धाचे वेळींही, युद्धांत पडावें किंवा नाहीं ह्याबद्दल व पुढें युद्धाचे धोरणाबद्दल ताम मतभेद होते पण ह्या मतभेदांचा प्रत्यक्ष युद्धावर फारसा परिणाम झाला नाहीं एकदां युद्ध सुरू झालें म्हणजे त्यात जय मिळवावयाचा, हें एकच ध्येय सर्वांचे नजरपुढे होतें इंग्लिश लोकांच्या आंगचे एकजूट व चिकाटी हे गुण प्रशंसनीय व अनुकरणीय नाहींत काय ?

धार्मिक शुद्धीबद्दल गुळचट कल्पना, हेंही आपल्या नाशाचें एक मोठें कारण आहे कपटानें किंवा जुलमानें एखादा हिंदु एकदा परधर्मांत गेला, म्हणजे स्वधर्मांत पुन येण्याचा त्याला मार्ग राहात नाहीं, त्यानें मरेपर्यंत त्याच धर्मांत राहिलें पाहिजे, असा आपल्या धर्माचा अगदीं परवापर्यंत नियम होता. ह्या चुकीच्या समजुतीनें आपल्या धर्माचें व सरकारचें किती नुकसान झालें आहे हें सांगणें कठीण आहे ही आपल्या धर्मांतील गोम मुसलमानांनी पूर्ण ओळखली होती व धर्मप्रसाराचे कामीं तिचा त्यानी पूर्ण उपयोग केला. हिंदु पंडितांना व आचार्यांना ( १ ) धर्म हा मुख्यत मनाचा विषय आहे, शरीराचा नाहीं, ( २ ) जुलमानें एकवेळ गोमांस तोंडात कोंबलें गेलें तर तेवढ्याने कायमचा धर्मभ्रष्ट होत नाही, ( ३ ) असा प्रसंगीं धर्मभ्रष्ट झालेल्यांना प्राय श्चित्त देऊन शुद्ध करून घेणे अवश्य आहे ह्या गोष्टी कशा सुचल्या नाहींत ह्याचें आश्चर्य वाटतें असा प्रकारें धर्मभ्रष्ट झालेल्या लोकांबद्दल कोणाचेंच मनांत सहानुभूति नसे इतकेंच नव्हे तर सर्व लोक त्यांना तुच्छ मानीत असावे असें वाटतें. इतिहासावरून असें दिसतें की, इस्लामी धर्माच्या प्रसाराचे कामीं, *अशा धर्मभ्रष्टांनी* जितक्या नेटानें व उत्साहानें केलें, तितक्या

-उत्साहानें, अस्सल मुसलमानांनींही कदाचित् केलें नसेल. आपला कांहीं अप-राध नसूनही केवळ जुलमानें परधर्मांत गेल्याबद्दल, आपले पूर्वीचे धर्मबांधव आपणांला तुच्छ मानतात, हा विचार मनात येऊनच अशा लोकांचे मनात हिंदु धर्माबद्दल तिटकारा, व हिंदूबद्दल द्वेषबुद्धि उत्पन्न झाली असावी व त्या-मुळेंच त्यांनी स्वधर्मप्रसारासाठी इतके नेटानें प्रयत्न केले असावे असें वाटतें तत्कालीन पंडितांविषयीं व आचार्यांविषयीं फार तर इतकें म्हणतां येईल कीं, पूर्वजन्मींच्या पापामुळेंच एखाद्या व्यक्तीवर जुलमानें धर्मभ्रष्ट होण्याचा प्रसंग येतो अशी त्यांची समजूत असल्यामुळें त्यांनीं ह्या गोष्टीचा विचार केला नसावा. कारण कांहींहि असो, जवळजवळ एक हजार वर्षे ही चूक झाल्यामुळें आज काय स्थिति उत्पन्न झाली आहे हें सर्वांना दिसतच आहे. आता तरी ही चुकी लक्षांत घेऊन ती सुधारण्याचे प्रयत्न ( अल्प प्रमाणांत कां होईना ) सुरू झाले आहेत हें समाजाचें सुदैव होय.

सारांश, ऐहिक उत्कर्षाबद्दल पूर्ण अनास्था, मनें दुबळी करणाऱ्या भविष्य-वादावर पूर्ण विश्वास, आपसांतील फूट, परिणामाकडे लक्ष न देतां प्रतिपक्षाचा सूड घेण्याची उत्कट इच्छा, धार्मिक शुद्धतेबद्दल खुळचट कल्पना, इत्यादि दुर्गुण आपल्या आंगीं होते म्हणूनच मुसलमानांपुढें आपला टिकाव लागला नाहीं

ह्या बाबतींत दुसरी एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. आर्य संस्कृतीच्या उत्कर्षकालांत, स्थैर्यकालांत, धर्मयुद्धाचे नियम पाळण्याची तत्परता, शरणा-गताबद्दल क्षमाशात्त, परधर्मसहिष्णुता, स्वामिभक्ति, सत्यप्रीति, निस्सीम पातिव्रत्य वगैरे सद्गुण आपल्या आंगीं बाणले होते पण ह्या गुणाचा अतिरेक झाल्यामुळें व प्रतिपक्षाच्या धोरणाचें नीट आकलन न झाल्यामुळें स्वमर्जतीन वाढलेल्या शत्रूशीं लढतांना जे नियम क्षत्रिय योद्धे पाळीत असत, तेच नियम मुसलमानांशीं लढतानाही त्यांनीं पाळले धोडक्यांत सांगावयाचें म्हणजे सारासार विचार न राहिल्यामुळें सद्गुणांना दुर्गुणाचें रूप प्राप्त झालें व यामुळेंही आपला नाश झाला कांहीं ऐतिहासिक उदाहरणें घेऊन ह्या मुद्याचें स्पष्टीकरण करूं. महंमद घोरीनें प्रथम स्वारी केली त्या वेळीं पृथ्वीराजानें त्याचा पराजय केला व प्राण वांचविण्यासाठीं महंमद घोरी शरण आला. शरणागताला अभय देणें हा क्षत्रियाचा बाणा, ह्या तत्त्वाला अनुसरून पृथ्वीराजानें त्याला सोडून दिलें. ह्याचा परिणाम काय झाला, हें सर्वांना माहीत आहेच. दुसरें उदाहरण,

मुसलमान सरदाराकडून शिवाजी महाराजाचा पराभव होईना म्हणून औरंगजेबानें जयसिंग ह्या हिंदु राजाची ह्या कामावर योजना केली. औरंगजेब आपला स्वामी, तेव्हा त्याच्या हुकमाची अमलबजावणी करणें हेंच आपलें श्रेष्ठ कर्तव्य, अशी मनाची पक्की समजूत असल्यामुळे ह्या रजपूत वीरानें, आपला सर्व पराक्रम व सर्व युद्धकौशल्य, आर्य संस्कृताच्या–हिंदु धर्माच्या–रक्षणासाठी लढणाऱ्या शिवाजीचा पराभव करण्यात खर्च केलें. स्वामिभक्तीपुढें त्याला स्वधर्माचा व स्वसंस्कृतीची काहीच मातब्बरी वाटली नाही. तिसरें उदाहरण, पतिव्रताधर्म हा स्त्रियाचे अंगचा अत्यंत श्रेष्ठ सद्गुण आहे हें खरें; पण त्याच्याशी स्वखुषीनें व स्वधर्माप्रमाणें विवाह झाला त्याच पतीशीं पतिव्रताधर्मानें वागावयाचें, जो जुल्मान, स्वकीयाचा–आपल्या पित्याचा, भावाचा किंवा प्रत्यक्ष पतीचाही–खून करून आपला पती झाला त्याच्याशीं वागताना पतिव्रताधर्माचें पालन करण्याचें काहींच कारण नाहीं, हा सारासार विचार तत्कालीन रजपूत व इतर स्त्रियामध्यें राहिला नव्हता. मुसलमानांनीं शेंकडा रजपूत व इतर हिंदु स्त्रिया आपल्या जनानखान्यात खेंचल्या कित्येक स्वार्थपरायण हिंदु राजांनीं स्वखुषीनें आपल्या बहिणींची व मुलींची मुसलमानाच्या जनानखान्यात रवानगी केली. ह्या सर्व दुर्दैवी स्त्रियांनी स्वखुषीनें ही स्थिति पत्करली असेल असें वाटत नाहीं पण जुल्मानें झाल्ल्या पतीचा खून केल्याचें एकहा उदाहरण इतिहासात प्रसिद्ध नाहीं पती म्हणजे स्त्रीचें अत्यंत श्रेष्ठ दैवत, तो कसाही असो, दुर्गुणी असो, दुष्ट असो, व्यभिचारी असो, सर्व दुर्गुणाचा प्रत्यक्ष पुतळा असो, त्याची एकनिष्ठपणें भक्ती करणें हेंच स्त्रीचें श्रेष्ठ कर्तव्य ही जी आर्यस्त्रियाची पक्की समजूत झालेली आहे, तिचाच हा दुष्परिणाम असें प्रस्तुत लेखकाचें मत आहे. सारासार विचार न राहिल्यामुळें सद्गुणाना दुर्गुणाचें रूप प्राप्त झाल्याचीं वाटेल तितकीं उदाहरणें गेल्या चार पाचशें वर्षांच्या इतिहासातून देता येतील, म्हणून आणखी उदाहरणें येथे देत नाहीं

साराश, पूर्वग्रह बाजूला ठेऊन समतोल दृष्टीनें विचार केला तर असें दिसतें कीं, आपल्या आगच्या दोषामुळेंच मुसलमानापुढे आपणाला टिकाव धरता आला नाहीं.

हिंदुधर्मावर व संस्कृतीवर अशा प्रकारची घोर आपत्ति आली असतां, त्या आपत्तीतून पार पडण्याचा मार्ग जनतेला दाखविणें हें तत्कालीन पंडितांचें व

आचार्यांचें कर्तव्य होतें. पण त्यांचीं मनें निराळ्याच दोन गोष्टींत गुंतलीं होतीं. (१) सृष्टीच्या मुळाशीं काय आहे, मोक्ष कशानें मिळेल वगैरे गूढ गोष्टींची चर्चा करणें, (२) ह्या असल्या गूढ विषयाबद्दल जीं विरुद्ध मतें प्रतिपादिलेलीं असतील त्यांचेवर टीका करणें, विरुद्ध पक्षानें या टीकेला उत्तर दिलें तर त्याचें खंडन करणें, ह्या महत्त्वाच्या कामांत ते गुंतलेले होते. एका ज्योतिर्विदाची अशी गोष्ट सांगतात कीं, आकाशस्थ गोलाकडे पहात पहात तो चालला असतां वाटेंत असलेली विहीर त्याला न दिसल्यामुळें तो तींत पडला. आमच्या पंडितांची व आचार्यांची बहुतांशीं अशीच स्थिति झाली. परलोकाकडे दृष्टी लागल्यामुळें, इहलोकांतील घडामोडींकडे पूर्ण दुर्लक्ष झालें. पारलौकिक उन्नतीचें कितीही महत्त्व असलें तरी " शरीरमाद्य खलु धर्मसाधन " या न्यायानें त्या उन्नतीलाही ऐहिक उन्नतीची आवश्यकता असतेच, ही गोष्ट तो पार विसरल्यामुळें सर्व समाजाला अधोगति प्राप्त झाली. कित्येक पंडित या स्थितींतच समाधान मानीत असत व दिल्लीश्वराला जगदीश्वराच्या बरोबरीनें मानण्याचीहि त्यांची तयारी असे. पंडितलोकांत परिस्थितीचें गाढ अज्ञान असतें ह्याचें एक ताजें उदाहरण देणें अवश्य आहे. जगांतील निरनिराळ्या देशांशीं संबंध येऊं लागल्यामुळें, शिक्षणप्रसारामुळें व इतर अनेक कारणांनीं आपल्या धर्मसमजुती, आपलीं सामाजिक मतें ह्यांत किती झपाट्यानें क्रांति होत आहे, ह्याचा विचार मुळींच न करितां काशीच्या पंडितांनीं कित्येक दिवस खल करून जे ठराव पास केले ते वाचले म्हणजे हसू येतें व हे महापंडित मतराच्या शतकांत झोंपी जाऊन, सभेच्या पूर्वीं नुकतेच जागे झाले होते कीं काय, असें वाटूं लागतें. असले ठराव पास करून परिस्थितीचें इतकें गाढ अज्ञान त्यांनीं दाखविलें आहे

आद्य शंकराचार्यांनीं आपल्या बुद्धिसामर्थ्यानें बुद्धधर्माचा पाडाव केला, व वैदिक धर्माची स्थापना केली हें खरें, पण त्या धर्माच्या दीर्घकालीन संसर्गामुळें, उत्पन्न झालेलें आमचें मनोदौर्बल्य त्यास नष्ट करितां आलें नाहीं. पृष्ठ १०२ मध्यें 'कोणी कोणाला जिंकलें' ह्या सदराखालीं ग्रंथकारानें जे विचार नमूद केले आहेत ते नि:पक्षपाती मनुष्यास पटतील असें वाटतें. विस्तारभयास्तव तो सर्व उतारा येथें उद्धृत करितां येत नाहीं

पंडितांनी सामान्य जनांच्या परिस्थितीकडे पूर्ण दुर्लक्ष केल्यामुळें, व त्यांना उच्च तत्वज्ञानाचें आकलन करण्याइतकें बुद्धिसामर्थ्य नसल्यामुळे, पुष्कळ लोक मुसलमानी पीरांना व फकीरांना भजू लागले होते. मालोजीराजांना एव फकीराच्या कृपाप्रसादानेंच शहाजी ह्या पुत्रश्रेष्ठाचा लाभ झाला! ह्या फकीऱ्या व ताबुदाऱ्यांच्या वेडापासून ब्राह्मण सुद्धां अलिप्त होते असें म्हणतां येत नाहीं खुद्द पुण्यांत नानाचा ताबूद होता, व मोहरमांत त्याचा मिरवणुक निघाली म्हणजे आमचे धर्मभोळे लोक त्यावर रेवड्यांचा पाऊस पाडीत! असें ऐकलें आहे.

सर्व समाज ह्याप्रमाणें अधोगतीला जात असतां साधुसंतांनी, मार्गांचा प्रसार करून, ब्राह्मणापासून तों अतिशूद्रापर्यंत सर्वांना मोक्षाचा सुलभ मार्ग दाखविला व हिंदुधर्माचें रक्षण केलें ही गोष्ट खरी. ह्या कामगिरीबद्दल हिंदुसमाज त्यांचा सदैव ऋणीच राहील. गीर्वाणभाषारूपी पेटींत मोठ्या बंदोबस्तानें ठेविलेलें व पंडितांच्या मदतीशिवाय सामान्य जनांना दुष्प्राप्य, असें ज्ञान साधुसंतांनी मातृभाषेच्या द्वारें सर्वांना सुलभ केलें, ह्या त्यांच्या घोर पापाबद्दल, गीर्वाणपंडितांनी त्यांना कमी छळलें असें नाहीं. पण साधुसंतांनी आपला मार्ग न सोडतां, आपलें धर्मज्ञान प्रसाराचें कार्य सारखें चालू ठेविलें पण खेदाची गोष्ट ही कीं, जगत् नश्वर आहे, संसार दुःखमय आहे, सांसारिक आपत्तीमुळेंच मनुष्याचें लक्ष परमेश्वराकडे लागतें, वगैरे विचार त्यांचे मनांत बिंबलेले असल्यामुळें ऐहिक आपत्तीची त्यांना फिकीर वाटली नाहीं व त्यांनीं जनतेला ऐहिक उन्नतीचा मार्ग दाखविला नाहीं ह्यांत कांहींच आश्चर्य नाहीं

एक समर्थ रामदासस्वामी मात्र ह्या गोष्टीला अपवाद होते पारमार्थिक उन्नतीला ऐहिक उन्नतीची आवश्यकता आहे हें त्यांचे मनाला पूर्ण पटलें होतें. त्यांनीं ज्याप्रमाणें जनतेला मोक्षाचा मार्ग दाखविला, त्याचप्रमाणें लोकांत राष्ट्रीय भावना जागृत करून ऐहिक उन्नतीचाही मार्ग दाखविला आर्यसंस्कृति अगदीं नामशेष होऊं नये अशी परमेश्वराची इच्छा होती, म्हणूनच कीं काय समर्थ रामदास व शिवाजी महाराज ह्या दोन विभूति महाराष्ट्रांत त्या वेळीं जन्माला आल्या, व त्यांनीं स्वराज्याची स्थापना करून इस्लामी संस्कृतीच्या प्रसारास जबरदस्त अडचण उत्पन्न केली त्यांनीं स्थापिलेली मराठेशाही, तिच्या जन्मानंतर थोड्याच वर्षांनीं, संभाजीच्या चुकीनें उत्पन्न झालेल्या गदांतरांतून

वियोगानें वाचली, व पुढें ५०।६० वर्षे साधारणपणें तिची भरभराटच होत गेली. माधवराव पेशव्याचे मरणानंतर तिला उतरती कळा लागली. नाना फडणवीसांचे मृत्यूनंतर, ती अर्धीमुर्धी इंग्रजांचे ताब्यात गेली, व स. १८१८ साली तिचा शेवट होऊन पाश्चात्य संस्कृतीला ह्या देशात प्रसार पावण्यास अवसर मिळाला. मराठेशाही बुडाली तीहि आमच्या आगच्या दोषामुळेंच बुडाली, असें त्या वेळच्या इतिहासाचें सूक्ष्म अवलोकन करणारास दिसून येईल. हल्लींहि देशाचे उन्नतीसाठीं ज्या चळवळी चालल्या आहेत त्याचा, मनातील पूर्वग्रह बाजूस ठेवून, विचार केला तर असें दिसतें कीं, ज्या दोषामुळें मराठेशाही बुडाली ते दोष अजूनहि आमचे आगीं आहेत. ते नाहींसे झाल्याशिवाय उन्नतीचा आशा करणें व्यर्थ आहे.

साराश, जनतेच्या पुढाऱ्यानी निरभिमान बुद्धीनें आपल्या अवनतीची मीमासा करून ज्या दोषामुळें आपली सारखी अवनति होत आहे, व जे आपल्या अंगीं अजून पूर्णपणें दिसत आहेत, ते लोकान्चा ध्यानांत आणून देण्याची खटपट केली पाहिजे. “ आत्मैव रिपुरात्मन ” हें गीतत सांगितलेलें तत्त्व आर्य संस्कृतीच्या अपकर्षाचे बाबतींत अक्षरश खरें आहे पण ह्याच तत्त्वाबरोबर सांगितलेलें “ आत्मैव ह्यात्मनो बधु ” हें दुसरें तत्त्व ध्यानात धरून प्रत्येक मनुष्य आपलें कर्तव्य करील तर आपला उत्कर्षही खात्रीनें होईल, कारण भगवंताना उपदेशिलेली ही दोन तत्त्वें ऐहिक व पारलौकिक उन्नतीला सारखींच लागू आहेत तीं व्यक्तीच्या व समाजाच्या बाबतींत सर्वकाली सत्य आहेत.

प्रस्तुत ग्रंथ लिहिण्यात श्री. दिवेकरांचा ह्याच हेतु आहे. 'ग्रंथस्वरूप' ह्या पहिल्या प्रकरणात, 'ग्रंथाचा हेतु' ह्या सदराखालीं ते लिहितात, “ आपला उत्कर्ष केव्हां व कसा झाला, व अपकर्ष कोणत्या कारणानां झाला, ह्याचा शांतपणें विचार करण्याची वेळ आतां आली आहे ” ही अपकर्षमीमासा अंतरंगदृष्टीने दोष घालविण्याकरिता केली असून गुण उत्पन्न होण्याकडे ह्या मीमांसेचें पर्यवसान व्हावें, हा ह्या ग्रंथाचा हेतु आहे. हा हेतु अशत तरी साध्य होवो, व अशा प्रकारें लोकजागृतीचें काम करण्यास, त्याना आरोग्य व दीर्घ आयुष्य मिळो, अशी आशा प्रकट करून हा उपोद्घात पुरा करितों

रामनवमी,
१८५१

शिवराम हरी गोखले
नागपूर.

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १३ | २५ | वज्जाता | रज्जाता: |
| २५ | १ | चयेन | चयन |
| ४४ | १४ | सध्या कालमना | सध्याकालमना. |
| ६१ | १० | ताद्द | तद्धि |
| ७६ | ४ | प्रजा | प्रजां |
| ,, | ५ | वित्तैषणाय | वित्तैषणायाश्च |
| ८८ | ११ | समंतभद्रआप्तमीमांसा | समंतभद्र–आप्तमीमांसा |
| ९४ | ६ | नायमात्माय | नोऽयमात्माय |

९५ पासून पृष्ठ ९७।९९।१०१।१०२ पर्यंत पानावरील मथळा "भारत-कालीन आर्यसंस्कृति" असा नसून तो "संन्यास व जगन्मिथ्यात्व" असा समजावा.

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ९९ | १४ | उपधा | उपाधी |
| १०२ | १९ | एकदेशाय | एकदेशीय |
| १०५ | ५ | तत्कालीं | तत्कालीन |
| १०८ | १६ | काही | कव्हाहि |
| १११ | ११ | चतुवर्ग | चतुर्वर्ग |
| ११७ | १९ | परिपूण | परिपूर्ण |
| ११९ | ७ | स्थितीत | परिस्थितीत |
| १२२ | १२ | युद्धपश्चात् | युद्धपश्चात्क |
| १२५ | १८ | ी | थी |
| १२९ | २६ | ज्यं | [illegible] |
| १४२ | १० | वरी अवतार | कला व अवतारतेज |
| १४८ | ९ | मुसलमनाना | मुसलमानांना |
| १५३ | १७ | गमतन् | समन्तुन |
| १५९ | १४ | कलन | कल्पना |
| १६१ | ११ | शिवाशिव | शिवाशाव |
| १६३ | १३ | चाहमनि | चाहमान |
| १७० | १८ | मरणामध्यो | मरण्यामध्य |
| १७४ | १३ | सहृदे श्र | सहृदं |
| १८३ | २१ | Mniversity | University |

### या ग्रंथास उपयोगी पडलेल्या

## ठळक आधारग्रंथांची यादी

१ ऋग्वेद, यजुर्वेद, अथर्ववेद—संहिता
१ दशोपनिषदें
१ षट्दर्शनाचे मूलग्रंथ
१ मन्वादिस्मृति
१ भारत रामायण
१ आचार्यांचे भाष्य ग्रंथ
१ धर्म निबंधकारांचे अनेक निबंधग्रंथ
१ ज्ञानेश्वरी, दासबोध तुकारामाची गाथा
१ वेदामृत व काहीं निबंध ( पं. सातवळेकर )
१ ज्ञानकोशाचे प्रस्तावना-खंड
१ महाभारताचा उपसंहार ( चिं वि. वैद्य )
१ रामायणाचा उपसंहार ( महाराष्ट्रिय )
१ गीतारहस्य ( लो टिळक )
१ इतिहासाचार्य राजवाडे यांचे भाषा, समाज व इतिहासविषयक अनेक ग्रंथ व निबंध
१ नासदीय सूक्तभाष्य ( आहिताग्नि राजवाडे )
१ मध्ययुगीन भारत, भाग १।२।३ ( चिं वि वैद्य )
१ मुसल्मानी रियासत, भाग १।२ ( इतिहासकार सरदेसाई )
१ प्रो. रानडे यांच्या तत्त्वज्ञानाच्या इतिहासाचे दोन्ही भाग
१ बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार—( प्रो वैद्य, सांगली )

# आर्यसंस्कृतीचा उत्कर्षापकर्ष

## प्रकरण पहिलें

### ग्रंथस्वरूप

सांप्रत हिंदुसमाज हा एका मोठ्या सामाजिक क्रांतीच्या अवस्थेमध्यें आहे. जगातील अनेक उलाढालींचा परिणाम हिंदुसमाजावर झाला असून त्यामुळें या समाजातील सर्व थर अगदीं हादरल्यासारखे झाले आहेत. असंतोष हें उत्कर्षाचें बीज आहे असें म्हणतात. त्या दृष्टीनें हिंदुसमाजांतील सर्व घटकांमध्यें उत्कर्षप्रेरक असंतोषहि स्पष्ट दिसत आहे. हिंदुसंघटनाची चळवळ ही हिंदुसमाजाच्या सामुदायिक अभ्युदयाकरिताच उत्पन्न झालेली आहे, व तिनें बहुजनसमाजाचें लक्ष्य अस्पृश्यतानिवारण, शुद्धिसंघटण, पोटजातींचें एकीकरण, क्षत्रिय व वैश्य वर्गांचें पुनरुज्जीवन व शरीरबलसंवर्धन इत्यादि जिव्हाळ्याच्या विषयाकडे वेधण्याचे यत्न चालविले आहेत. हिंदुसंघटणेच्या व्यापक क्षेत्रात अनेक महत्त्वाचे विषय आहेत व त्याकडे लोकांचें लक्ष्य वधणें अत्यावश्यक आहे. हिंदुसंघटनाची ही चळवळ प्रथमतः मुसल्मानसापेक्ष सुरू झाली असली, तथापि ती नेहमीं मुसलमानसापेक्ष राहाणार नाहीं व राहाण्याचें प्रयोजन नाहीं. प्रतिपक्षाचें जेव्हां चढाईचें धोरण असतें, तेव्हां जोराच्या प्रतिकाराची सिद्धता ठेवावी लागते, पण तसली आणीबाणीची अल्प वेळ निघून गेल्यावर आपली वैगुण्यें सुधारण्याकडे समाजाचें लक्ष्य लावावें लागतें. म्हणून हिंदुसंघटनाची चळवळ आतां मुसलमाननिरपेक्ष करण्याची वेळ आली आहे असें दिसतें. प्रसंगविशेषाकरितां तात्पुरता प्रतिकार सिद्ध ठेवून ज्या आपल्या दोषामुळें व्यंगामुळें व वैगुण्यामुळें प्रतिपक्षी आपणावर आक्रमण करीत असतो ते दोष, तीं व्यंगें व वैगुण्यें समूळ नष्ट करण्याचा प्रयत्न आतां सारखा चालू ठेविला पाहिजे.

**ग्रंथाचा हेतु**–हिंदुसमाजाची सांप्रतची स्थिति फार शोचनीय आहे. हिंदुसमाज म्हणजे सर्वत्र फाफट पसाऱ्याचा एक बाजारच आहे. समाज अवाढव्य, आयत जुना, अतएव एखाद्या युक्तिवुद्धानें भारून ठेवण्यास कठीण, अशी याची स्थिति आहे. समाजापुढें ध्येय एक असावें, द्रव्य एक असावें, समाजांतील स्फूर्ति व विचार यांच्यामध्यें एकरूपता असावी, म्हणजे समाजांत जिवंतपणा असतो. पण हिंदुसमाजांत आज यांपैकीं कांहींहि नसल्यामुळें तो दुर्बल झालेला आहे. हिंदु समाजामध्यें जें नाहीं व जें असावें असें वाटतें तें उत्पन्न करण्याकरितां यत्न चालू आहेत. पण यत्नांना कल्पनेप्रमाणें यश न आलें कीं 'कायहो, आम्ही असेच का? आमचा उत्कर्ष कधीं झाला होता काय?' अशी कुतूहलपूर्ण पृच्छा होते. विचारी गृहस्थाचे तोंडूनहि असले प्रश्न ऐकण्यांत येतात. या प्रश्नामध्यें थोडा निराशेचा भाग असतो व थोडा आशाजन्य उत्साहाचाहि भाग असतो हें खरें. सारांश समाजाला सांप्रतच्या चिंताजनक स्थितीची जाणीव उत्पन्न झाल्यामुळें आपला उत्कर्ष केव्हां व कसा झाला व अपकर्ष कोणत्या कारणांनीं झाला, याचा विचार शांतपणें करण्याची आतां वेळ आली आहे. प्रस्तुत ग्रंथांत आपल्या उत्कर्षाची थोडी कल्पना देऊन अपकर्षाच्या अनेक कारणांपैकीं कांहीं प्रमुख कारणांचा विचार करण्याचें योजिलें आहे. ही अपकर्षमीमांसा अंतरंगदृष्टीनें दोष घालविण्याकरितां केली असून गुण उत्पन्न होण्याकडे या मीमांसेचें पर्यवसान व्हावें हा या ग्रंथाचा मुख्य हेतु आहे.

**आर्य शब्दाचा अर्थ**—ग्रंथाचें नांव 'आर्यसंस्कृतीचा उत्कर्षापकर्ष' हें आहे. या नांवांतील प्रत्येक शब्दाची फोड करणें अवश्य आहे. पहिल्यानें आर्य म्हणजे कोण असा प्रश्न येतो. कारण, मानववंशशास्त्र आणि भाषाशास्त्रदृष्ट्या जगांत पुष्कळ ठिकाणीं आर्यवंश हल्लीं विद्यमान् आहे असें ठरलें आहे. तेव्हां त्या सर्वांच्या संस्कृतीचा विचार कर्तव्य आहे काय? या प्रश्नाचें उत्तर इतकेंच कीं, जगांतील आर्यांशीं प्रस्तुत कांहीं कर्तव्य नाहीं; केवळ हिंदुस्थानांतील म्हणजे भरतखंडांतील किंवा आर्यावर्तांतील आर्यांच्या उत्कर्षाचा विचार प्रस्तुत ग्रंथांत करावयाचा आहे. अनादिकालापासून जे आर्य या भरतखंडांत राहात आहेत, ज्यांनीं विजिगीषाबुद्धीनें उत्तरध्रुवापर्यंत व इतरत्रहि आक्रमण केलें, ज्यांच्या संस्कृतीचे अवशेष आज जगांत पुष्कळ ठिकाणीं दृग्गोचर होत आहेत, ज्यांची गीर्वाणवाणी सर्व जगांत मान्य व सुसंपन्न अशी आहे, ज्यांनीं जगांतील

इतर मानवसमुदाय थंगाला रंग लावून व हातडी पांघरून आयुष्य कठीत असता जगातील सर्व पुरुषार्थ भोगून जगापलीकडील वस्तु शोधून तत्त्वज्ञानाचे उत्कृष्ट सिद्धान्त निर्माण केले, ज्यांनी जगातील अत्यंत प्राचीन अशा आपल्या वैदिक वाङ्मयाची जोपासना करून त्या वाङ्मयाच्या द्वारें आपल्या संस्कृतीचें परिणत स्वरूप जगापुढें ठेविलें, ज्यांचे प्रज्ञा, पौरुष, पराक्रम, धैर्य, शील, विद्या, उद्योग, उत्साह इत्यादि गुण वैदिक वाङ्मयावरून हृत्पटलावर कोरून ठेवण्याजोगे दिसून येतात, ज्यांच्या विशिष्ट गुणावरून आर्य हा शिष्ट वर्ग वाचक शब्द बनला, ज्यांनीं वेदकाळापासून आजपर्यंत परिस्थितिप्रमाणें योग्य तो बदल करून धर्मपरंपरा टिकविलेली आहे, अशा या भारतीय आर्यांच्या संस्कृतीचा विचार प्रस्तुत कर्तव्य असून भारतबाह्य आर्यांचा येथें कांहीं संबंध नाहीं हें स्पष्ट सांगितलें पाहिजे.

**संस्कृति म्हणजे काय?**—आर्य शब्दाचा अर्थ सांगितल्यावर संस्कृति या शब्दाचाहि विचार केला पाहिजे. संस्कृति शब्दाला इंग्रजींत Civilization व Culture असे शब्द योजतात. संस्कृति म्हणजे जातिराष्ट्रादि संघातांच्या सामुदायिक जीवितक्रमाचें साकल्य अशी व्याख्या ज्ञानकोशकर्ते देतात. अगदीं सोप्या मराठींत सांगावयाचें तर संस्कृति म्हणजे मानवी मनावरील ठसे असें म्हणता येईल. मानवी मनावर जे ठसे उमटतात व जे भाषा, शास्त्र, शस्त्र, कला, कौशल्य, धर्म, समाज, इत्यादि सर्व मानवी घडामोडींमध्यें अनेक रूपानें परिस्फुट होतात, त्या सर्व ठशांना म्हणजे संस्कारसमुच्चयाला संस्कृति असें म्हणतां येईल. संस्कृति शब्द व्यापक आहे. या शब्दाच्या पोटांत मानव समाजाच्या विकार व विचारजन्य अशा सर्व घडामोडी अंतर्भूत होतात. या सर्व घडामोडींना अभ्युदय व निःश्रेयसप्रवण करण्याचें कार्य आपल्या धर्म या शब्दानें केलें आहे. म्हणून संस्कृति शब्दाप्रमाणें धर्म हा शब्दसुद्धा अत्यंत व्यापक असून संस्कृति म्हणजे धर्म असें म्हटलें तरी चालेल कारण धर्मामध्यें आचार, नीति, तत्त्वज्ञान, व्यवहार, राजकारण, समाजकारण, कलाकौशल्य, वैद्यशास्त्र, इतिहास, विज्ञान, हीं सर्व अंतर्भूत होतात वास्तव आर्य संस्कृतीचा उत्कर्षापकर्ष याऐवजीं आर्यधर्माचा म्हणजे वैदिक धर्माचा उत्कर्षापकर्ष असेंहि समजता येईल परंतु हल्लीं धर्म या शब्दार्थाचा अत्यंत संकोच झाला आहे धर्म म्हणजे परलोकप्राप्तीचा मार्ग, धर्म म्हणजे ईश्वरविषयक कर्तव्यें, धर्म म्हणजे कांहीं अदृष्ट व

चीन देशाच्या भोंवती तेथील राजानें मोठी भिंत बांधली. हेतु हा की, ही भिंत ओलांडून कोणी येऊ नये व आपल्या स्वास्थ्यात बिघाड करूं नये त्या भिंतीच्या आत चीनचा उत्कर्ष सदैव होईल, अशी व्यवस्था त्यानें केली होती. परंतु भिंत ओलांडणारे व ती पाडणारे जेव्हा भेटले तेव्हा चीन हरला व त्यामुळे परकीयांच्या शासनसपत्तेमुळें चीनचा अपकर्ष सुरू झाला वेदकाळापासून हिंदुसमाजाचा सारखा उत्कर्ष झाला व होत आहे असें–जर परकीयांच्या स्वाऱ्या झाल्या नसत्या व होऊनहि त्याना धप्पड लगावता आली असती तरच– म्हणता आलें असतें पण शिकंदराच्या स्वारीपासून तों आजपर्यंत आलेल्या परकीय पाहुण्याना येथें मुक्तद्वार आहे; इतकेंच नव्हे, तर त्याचें सत्तावर्चस्वहि आहे. त्या सत्तावर्चस्वानें आर्यसंस्कृतीच्या अनेक अंगावर अनिष्ट संस्कार केले आहेत म्हणून आर्यसंस्कृतीचा अपकर्ष पुष्कळ दिवसापासून चालू आहे असें सिद्ध करिता येतें आर्य संस्कृतीचा अपकर्ष होण्यापूर्वी तिचा केव्हा तरी उत्कर्ष होता यात मुळींच संशय नाहीं. भूतकाल उज्ज्वल उत्कर्षाचा आहे म्हणून भविष्यकालहि उत्कर्षपूर्णच येणार हा भरवसा आहे हा भविष्यकाळ उत्कर्ष घेऊन येणारा व्हावा, एतदर्थ वर्तमानकालीन दोष त्या कालाबरोबरच घालविले पाहिजेत

**आर्यसंस्कृतीचा प्राचीन उत्कर्षकाल**— प्रस्तुत लेखकाच्या मतें आर्यसंस्कृतीच्या उत्कर्षाचा काल बराच मोठा व प्राचीन आहे. खिस्तपूर्व ४००० ते खिस्तपूर्व ८०० म्हणजे तीन हजार वर्षें आर्यसंस्कृति ही उत्कर्षाच्या उच्च स्थानीं होती ऋग्वेदसंहितेपासून आर्यांच्या उत्कर्षास प्रारंभ झाला. ऋग्वेदसंहितेचा काल खिस्तपूर्व ४००० च्याहि पलीकडे आहे, असें पुष्कळ विद्वानांचें मत आहे खिस्तपूर्व ३००० च्या सुमारास भारतीय युद्ध धरिलें तर या वेळीं आर्यसंस्कृतीचा सूर्य ऐन मध्यान्हावर होता यात संशय नाहीं भारतीय युद्धापासून पाणिनीपर्यंत म्हणजे शकपूर्व ३००० ते ८०० हा काल उत्कर्ष भोगण्याचा व त्यास स्थैर्य आणण्याचा दिसतो. म्हणून हीं तीन हजार वर्षें आर्य संस्कृतीच्या इतिहासात अत्यंत भरभराटीचीं अशीं समजलीं पाहिजेत शकपूर्व ८०० ते शकोत्तर ८०० म्हणजे सुमारें १॥ हजार वर्षें हीं कांहींच्या मतें उत्कर्षाचींच आहेत परंतु या दीड हजार वर्षांत अप-कर्षाचींच बीजें रुजत होतीं असें आमचें मत आहे. साक्षात् अपकर्षाचें स्वरूप

दिसणें व सूक्ष्म रूपानें त्याचें बीज रुजत असणें यात जरी फरक असला तरी चिकित्सकास बीजाचें महत्त्व अधिक वाटतें. म्हणून हा काळ अपकर्षाचाच म्हटला पाहिजे वैदिक संहिता, मनुस्मृति, रामायण व महाभारत या ग्रंथावरून उत्कर्षकालीन स्थितीची यथार्थ कल्पना येते; तत्कालीन परिस्थितीचें भडक व उद्बोधक चित्र रेखाटणें हा या ग्रथाचा उद्देश नाही तसें करू गेल्यास तो स्वतंत्र ग्रंथ होईल. म्हणून आर्यसंस्कृतीचें स्वरूप वेदकाळीं, मनुस्मृतिकाळीं, रामायणकाळीं व महाभारतकाळीं कसें होतें याची सामान्यत कल्पना येण्याजोगें अल्प विवेचन पुढील तीन प्रकरणात करूं.

---

# प्रकरण दुसरें

## वेदकालीन आर्यसंस्कृति

**वेदमहति**—प्रस्तुत प्रकरणात वेदकालीन संस्कृतीची थोडी कल्पना द्यावयाची आहे. थोडी म्हणण्याचें कारण वैदिक वाङ्मय महोदधि इतका खोल आहे व त्यामध्यें शब्दरूपी रत्नें इतकी गच्च भरलेली आहेत कीं, त्यांची नुसती कल्पना देण्याकरतां ज्ञानकोशकारानीं प्रस्तावनाखंडाच्या तिसऱ्या भागामध्यें जवळजवळ तीनशें पानें खर्ची घातली आहेत. देवता, देवयोनि, असुर, स्वर्ग, धर्म, पृथ्वि, ध्वनि, धातु, जमीन, उदक, उष्णता, गति, सख्या, वनस्पति, प्राणि, मनुष्य, शरीरावयव, वैद्यक, अन्न, नातेंगोतें, मनोविकार, युद्ध, सार्वजनिक वार्ता, खेळ, गृह, कुल, वस्त्र, दान, भाषा, वस्त्रे, भूषणें, व्यापार, पाप, पुण्य, दळणवळण, वाद्यें, अभिचार इत्यादि शेंकडों मुख्य विषय व तदंगभूत हजारों उपविषय वेदांमध्यें आलेले आहेत. या सर्वांवरून संस्कृतीचा

आटावा घेतला पाहिजे पण हें कार्य मोठें असल्यामुळें वैदिक वाङ्मयांतील काहा उतारे व त्याचा भावार्थ यावरच कार्यभाग उरकणें भाग आहे जगात वेद हे अत्यंत पवित्र व उच्च असे धर्मग्रंथ आहेत वेदांइतकें प्राचीन वाङ्मय जगांत दुसरें नाहीं. *भाग्याची व अभिमानाची गोष्ट ही कीं,* जगातलें हें उत्कृष्ट वाङ्मय भारतीय आर्यांनीं आजपर्यंत सुरक्षित करून ठेवलेलें आहे. जगामध्यें सप्ताश्चर्यें ( Seven wonders ) आहेत असें म्हणतात, *परंतु त्या सर्वांपेक्षा कित्येक हजार वर्षांपूर्वीचें वाङ्मय जशाचें तसें ठेवणें व* प्राचीन मन्त्रद्रष्ट ऋषि ज्या अभिनिवेशानें तें म्हणत असत त्याच अभिनिवेशानें तें आज म्हणणें हेंच जगातलें महदाश्चर्य होय या वैदिक वाङ्मयाकडे आश्चर्यचकित दृष्टीनें जग पाहात आहे यात नवल नाहीं. सर्व आधुनिक संशोधकांचें मतें वेदांइतकें प्राचीन वाङ्मय दुसरें नसल्यामुळें प्राचीन मानवसमाजाच्या संस्कृतीचें उत्कृष्ट प्रतिबिंब वेदांमध्येंच आढळत वैदिक आर्यांच्या विचारांची, भावनांची व कल्पनांची परिस्फुटता वेदमन्त्रांमध्यंच दृग्गोचर होते आर्यांच्या संस्कृतीला या वैदिक वाङ्मयापूर्वी बरेच दिवस प्रारंभ झाला असें म्हणता येतें. कारण मानवी कृतींमध्येंच संस्कृति दिसू लागते, परंतु समाजाच्या प्राथमिक विकृतींची अवस्था जाण्यास कांहीं काळ जावा लागतो. अर्थात् तो काल गेल्यावर वैदिक वाङ्मय उत्पन्न झालें आहे वेद हे पौरुषेय आहेत कीं अपौरुषेय आहेत हा वाद संपणारा नसला तरी ते दुर्लभारंभ आहेत, अत्यंत प्राचीन आहेत असें म्हटल्यावाचून गत्यंतर नाहीं. कांहीं म्हटलें तरी वेदांचें श्रेष्ठत्व हें अबाधित आहे

ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद असे चार प्रसिद्ध वेद आहेत. वेदांचे मुख्य विभाग संहिता व ब्राह्मण हे असून ' मन्त्रब्राह्मणयोर्वेद नामधेय " अशी परिभाषा आहे ब्राह्मणाच्या उत्तर भागास आरण्य किंवा आरण्यक असें म्हणतात चार वेदांचीं जैमिनी, कौषितकी, ऐतरेय, तैत्तिरीय, शतपथ, गोपथ, ताण्डय, तलवकार अशीं ब्राह्मणें असून इश, केन, कठ, प्रश्न, मुंड, माण्डुक्य, तैत्तिरीय, ऐतरेय, छांदोग्य व बृहदारण्यक अशीं दहा प्रमुख उपनिषदें आहेत उपनिषदांमध्यें प्रामुख्यानें तत्त्वविचार आलेला आहे शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद व ज्योतिष हीं सहा वेदांगें वेदार्थज्ञानाकरितां आवश्यक आहेत

पदगें--शिक्षा म्हणजे स्पष्ट उच्चार करून आघात देऊन संहिता म्हणणें होय या वेदांगाचा उल्लेख तैत्तिरीय उपनिषदात आलेला आहे तेथें शब्द व त्या वरील आघात, शब्दावयव व त्यावरील आघात, स्वरमाधुर्य व शब्दसंधि असे शिक्षेचे सहा विभाग सांगितले आहेत प्रातिशाख्याचाहि संबंध शिक्षेशींच येतो. प्रातिशाख्यामध्यें पदपाठावरून संहितापाठ कसे तयार करावयाचे याविषयीं नियम आहेत संहितेच्या एकेक शाखेचें एकेक पाठपुस्तक होतें म्हणूनच प्रातिशाख्य असें नाव आहे प्रत्येक प्रातिशाख्यात ती ती संहिता म्हणण्याच्या पद्धतीचें सांगोपांग विवेचन आलेलें आहे कल्प म्हणजे श्रौत, गृह्य, धर्म व शुल्ब सूत्रें होत. श्रौतसूत्रामध्यें यज्ञसंस्काराची माहिती आहे. गृह्यसूत्रामध्यें गर्भाधानादि अंत्येष्टीपर्यंतचे संस्कार, पंचमहायज्ञ, श्राद्ध, वार्षिक यज्ञयागादि महोत्सव हे विषय आहेत. धर्मसूत्रें हीं गृह्यसूत्रासारखींच असून त्यात कर्म, विधि व चार वर्णांच्या आचारविचाराची माहिती आलेली आहे. शुल्ब-सूत्रांचा संबंध श्रौतसूत्राशीं असून त्यात वेदीची रचना, अग्निकुंडाची रचना व महत्त्वमापन हे विषय आलेले आहेत व्याकरण या अंगाचा अर्थ तर स्पष्टच आहे तथापि व्याकरणावरील जुनी वेदांगाचीं पुस्तकें आज उपलब्ध नाहीत पाणिनीचें प्राचीन व सर्वोत्कृष्ट असें व्याकरणशास्त्र उपलब्ध आहे, पण त्यांत केवळ वेदभाषेचाच विचार नाही. निरुक्त ग्रंथामध्यें वेदांतील कठीण शब्दांचें विवेचन व व्युत्पत्ति हीं दिली आहेत, निघण्टु हा ग्रंथहि या अंगाचच येतो हा ग्रंथ म्हणजेच वैदिक शब्दकोश होय छंद शास्त्र व ज्योतिःशास्त्र या वेदांगांतील कांहीं भागाचे एकेक ग्रंथ उपलब्ध आहेत छंद शास्त्रामध्यें वेदांतील वृत्तांची माहिती आहे वेदांगज्योतिष हा ज्योतिःशास्त्रावरील लहान पद्यात्मक ग्रंथ आहे त्यामध्यें चंद्र व सूर्य यांची स्थानें, सत्तावीस नक्षत्रांची

गृह, वेश्म, शाला, प्रासाद, हर्म्य, अट्ट, सौध, अगार, अग्निशाळा, यज्ञशाळा या शब्दावरून, घरें, वाडे, मंदिरें, हवेल्या, राजवाडे या सर्वांचा व्यवहार त्या वेळी होता हें सिद्ध आहे पर्यंक म्हणजे पलंग, तल्प म्हणजे गादी, उपबर्हण म्हणजे उशी, थविल म्ह पर्भे, परिपवन म्ह. दोरीचे पसे या वस्तूचा उपयोग राजवाड्यांमध्यें व श्रीमंताच्या घरामध्यें होई. रथ्या म्हणजे रस्ता, अत पन्था म्हणजे भुयारातील मार्ग, सेतु म्ह. पूल, खनन, खनित्र, रथकार, तक्षा, सुशिल्प, ऋभु, कारु, क्षता, अनुभत्ता, अभिक्षत्ता ( खोदकाम करणारे ), अयस्ताप ( लोहार ) या शब्दावरून विविध प्रकारच्या कारागिराचा बोध होतो. त्या वेळी सर्व वाहनामध्यें रथाची आवड अधिक होती. हिरण्यरथ, विद्युद्रथ, अश्वरथ, महारथ, सप्तचक्ररथ हे शब्द निरनिराळ्या प्रकारच्या रथाचे निदर्शक आहेत परशु, खड्ग, सूची, आयुध, सुआयुध, उग्रायुध, तिग्मायुध इत्यादि आयुधवाचक शब्द त्यातील तरतमभाव दर्शवितात. धनु, इषु, तीक्ष्णेषु इत्यादि शब्दावरून धनुर्वेदाच्या प्रगतीचा बोध होतो. वैदिक काळचे शुनवासा, सुवासा., दुर्वासा, रजयिता, उष्णीष ( पागोटें ), सामूल ( लोकरीचें वस्त्र ), परिधान ( उपरणें ), पाडव ( शुभ्र वस्त्र ), ऊर्णा ( लोकर ) असे वस्त्राविषयीं उल्लेख आहेत ( " ऊर्णासूत्रेण कवयो वयंति ' यजु. १९।८० ). आहन, उदचन, कद्रु, पिशिल, द्रोण, कलश, रजतपात्र, हे शब्द वेदकाळीं कोण कोणत्या तऱ्हेची भांडी असावीत हें सुचवितात अयस्, रजत, चंद्र, सीस, सुवर्ण, हिरण्य हे शब्द धातूची कल्पना देतात. हिरण्यमणि, हिरण्यबाहु हिरण्यस्रक्, हिरण्यशृंग, कर्णशोभन, कुरीर ( शिरोलंकार ) या शब्दावरून तत्कालीन अलंकारांचा बोध होतो वीणा, नाडी, तूणव, कर्करी हे शब्द वाद्यवाचक आहेत वर्म, कवच, हस्तघ्न, दुंदुभि, उपानह, रज्जु, तंतु इत्यादि शब्दावरून कातड्याचे पदार्थ कोणकोणते असावेत हें दिसतें वेदकाळी व्रीहि, यव, माष, तिल, मुद्ग, प्रियगु, श्यामाक, नीवार, गोधूम इत्यादि धान्यें होतीं व त्यांचे विविध पदार्थ करीत असत. घृतौदन, दध्योदन, पायस, पृषदाज्य, आमिक्षा इत्यादि शब्दावरून त्या वेळी दुधातुपाची कशी रेलचेल होती याची कल्पना येते. घरात मुली धार काढीत व या दुहिता धारोष्ण दूध सर्वांना देत व स्वत पीत असत.

**वेदातील धनसंबंधक विचार**--वैदिक आर्यांचे धनसंबंधक विचार आजहि चिंतनीय आहेत ईशावास्योपनिषदामध्यें प्रथमच " मागृध' कस्य

**स्विद्धनम् ॥** ( यजु ४०।१ ) कुणाच्याहि धनापहाराची इच्छा करूं नका असें म्हटलें आहे धन म्हणजे पैसा येवढाच अर्थ नाहीं, तर पुत्र, विद्या, शरीर, स्त्री, गो, अश्व, अशीं अनेक धनें आहेत **'एकशतं लक्ष्म्यो मर्त्यस्य साकं तन्वा जनुषोऽधिजाताः ॥** ( अथर्व. ७।११५।३ ) मनुष्याच्या शरीराबरोबर शेंकडों धनें उत्पन्न झालेलीं आहेत असें म्हटलें आहे. त्यावरून या सर्व संपत्तीची महत्त्वाकांक्षा धरून ते ती कशी मिळवीत हें विचार करण्यासारखें आहे. जगांतील अनेक व्यवहाराना धनाची अपेक्षा आहे. हें धन मनुष्यानें नातीनें मिळवावें, तें विपुल मिळवावें व त्याचा सत्पात्रीं व्यय करावा अशी वेदाज्ञा आहे. मनुष्यानें दैवावर न विसंबिता द्रव्य मिळविण्याकरिता माघार न घेता नेटानें उद्योग करावा तरच त्याला विजय प्राप्त होतो. **"अप्रतीतो जयति सधनानि प्रति जनान्युत या सजन्या ( अवस्यवे यो वरिव कृणोति ब्रह्मणे राजा तमवन्ति") देवा ॥** ऋ ४।५०।९–जो मनुष्य कच न खाता उद्योग करितो, जो अमुक यत्न करितो, (जो सरळ मार्गानें जातो म्हणून अधोगर्तेला कधींहि जात नाहीं, ) असाच मनुष्य व्यक्तीनें आणि समाजानें मिळवावयाच्या धनाची प्राप्ति करूं शकतो, धनप्राप्ति करण्यात विजयी होतो. **शूरग्राम सर्ववीर सहावान् जेता पवस्व सनिता धनानि। तिग्मायुध क्षिप्रधन्वा समत्स्वषाळ्ह साह्वान् पृतनासु शत्रून् ॥** ऋ. ९।९०।३.

जो शूर, सर्व प्रकारें वीर्यवान्, सहनशील, विजयी, शस्त्रास्त्रानें युक्त, शत्रूना असह्य, शत्रूंच्या छातीत धडकी भरविणारा असतो तोच सर्व प्रकारचें धन मिळवूं शकतो, असें क्षत्रियाचें वर्णन आहे. परंतु सामान्य माणसानें "**अप्रतीतो जयति**" हेंच वाक्य हृदयावर कोरून द्रव्यार्जनास लागलें पाहिजे वेदामध्यें धनाची मागणी पुष्कळ ठिकाणीं केली असून तें मिळविण्याचें व उपभोगण्याचें सामर्थ्यहि प्रार्थिलें आहे.

> **रयिं सर्ववीर दधातन ॥** ऋ. १०।१५।११
>
> **सुवीरासो वय धना जयेम ॥** ऋ. १।६१।२३
>
> **चोदयस्व महते धनाय ॥** ऋ ११।१०४।७.

'सर्व प्रकारच्या वीर्यानें धन मिळवें, पराक्रमी होण्याते आम्ही धन मिळवावें. महत् धनार्जनार्थ आम्हांला प्रवृत्त कर' हें या मंत्रांतील अर्थावरून उघड

दिसतं द्रव्य तर खूप मिळवावें पण "ददामीत्येव ब्रूयात् ॥" अथर्व १२।४।१, 'मी देतों असें म्हणत असावें' कारण जगांत द्रव्य हें विविध कार्याकरिताच खर्चिलें पाहिजे. अनेक प्रकारें जो द्रव्याचा दानधर्म करितो तोच श्रेष्ठ होय असेंहि पुढील मन्त्रांत म्हटलें आहे.

श्रीणामुदारो धरुणो रयीणां मनीषीणां प्रार्पणः सोमगोपाः ॥

ऋ. १०।४५।५

'धनाला धारण करणारा व मुक्तहस्तानें धन देणारा विशेषतः बुद्धिमानांना द्रव्य देणारा म्हणजे विद्वानांचा आश्रयदाता हाच सोमाचा रक्षक होतो' द्रव्याचा उपयोग धर्म, देश, समाज यांकरितां न करितां जो स्वतःकरितां करितो तो पापी चांडाळ होय असेंहि विचार वेदमंत्रांत आढळतात

मोघमन्नं विन्दते अप्रचेताः सत्यं ब्रवीमि वध इत्स तस्य ।
नार्यमणं पुष्यति नो सखायं केवलाघो भवति केवलादी ॥

ऋ. १०।११७।६

'जो अप्रबुद्ध मनुष्य परिश्रम न करितां बापजाद्यांची कमाई खात बसतो किंवा दुसऱ्याचा अपहार करून जगतो अशा मनुष्याचें जगणें व अन्न खाणें म्हणजेच साक्षात् मृत्यु होय जो श्रेष्ठ कार्यकर्त्यांना त्याच प्रमाणें हितकारक मित्राना आश्रय देत नाहीं असा जो आप्पलपोट्या असतो तो केवळ पापी होय' वरील विवेचनावरून धन कोण मिळवितो, धनाचे प्रकार धन मिळवून त्यावें काय करावें, याविषयीं आर्यांचे वेदांतील विचार कसे आहेत याचा कल्पना येते खरोखर जगांतील कोणत्याहि वाङ्मयांत यापेक्षा अधिक चांगले विचार धना विषयीं आढळणार नाहींत

**वैदिक राज्यपद्धति**—वैदिक वाङ्मयावरून आर्यांच्या राज्यपद्धतीवर चांगलाच प्रकाश पडतो. अनेक प्रकारच्या राज्यशासन–संस्था असल्याचा उल्लेख ऐतरेय ब्राह्मणामध्ये आहे 'साम्राज्यं भौज्यं स्वाराज्यं वैराज्यं पारमेष्ठ्यं राज्यं महाराज्यं आधिपत्यमयं समंतपर्यायीस्यात् सार्वभौमः सार्वायुष आंतादापरार्धात् पृथिव्यै समुद्रपर्यंताया एकराडिति ॥' ( ऐतरे० ब्रा० ८।१५ ) त्याचप्रमाणें ऋग्वेदामध्यें प्राति

निश्चित स्वराज्याचा उल्लेख आला आहे. ऋग्वेदकालीं ज्या शासनसत्था होत्या त्यात " बहुपाय्य स्वराज्य " सत्था होती, हा विशेष आढळतो

आयद् वामीय चक्षसा मित्रवय च सूरय ।
व्यचिष्ठे बहुपाय्ये यतेमहि स्वराज्ये ॥ ऋ ५।६६।६.

**भावार्थ**—' मित्रभावानें वागणारे अर्थात् वैमनस्यहीन सज्जनांनो, तसेंच विशाल दर्शनाच्या सज्जनांनो, तुम्ही सर्व व आम्ही सर्व विद्वान् मिळून व्यापक आणि ज्याच्या रक्षणाला अनेक लोकांच्या सहाय्याची अपेक्षा आहे अशा स्वराज्याची व्यवस्था उत्तम करण्याकरिता सर्व प्रकारचे यत्न करू. '

या मन्त्रावरून प्रातिनिधिक स्वराज्याची चांगली कल्पना येते. हें स्वराज्य सभा, समिति व सेना यांच्या सहाय्यानें राजा चालवीत असे राजाची निवड सुद्धा सभा व समिती यांच्या मतानें होई मंत्री, सेना, कोश इत्यादि दृष्टीनें राजा नेहमीं समर्थ होइउ व तो तसा राहील अशाच निवड काळजी-पूर्वक होई अशी निवड केल्यानंतर राष्ट्राचा कोणते फायदे होतात याचें वर्णन पुढीलप्रमाणें आहे.

जितमस्माकमुद्भिन्नमस्माकमृतमस्माक
तेजोऽस्माकं ब्रह्मास्माकं स्वरस्माकं यज्ञोऽस्माकं
पशवोऽस्माकं प्रजाऽस्माकं वीरा अस्माकं ॥ अथर्व १६।८.

"या सौम्य पुरुषाची निवडणूक करण्यामुळें आमचा विजय होइउ, आमची उन्नति होईल, आमचें आरोग्य वृद्धिंगत होईल, आमचें तेज वाढेल, आमचें ज्ञान वाढेल, आत्मबल वाढेल, आमचे यज्ञ, पशु, प्रजा व शूर या सर्वांची वृद्धि होइउ ' यावरून ' राजा प्रकृतिरञ्जनात् ' हें तत्त्व ह्या काळीं स्पष्ट दिसतें. राजाचें कर्तव्य प्रजेचें बळ वाढविणें, त्याचें क्षात्रतेज कायम टेवणें आणि त्याची सर्व प्रकारचा उन्नति करणें हें असे हें कर्तव्य पार पाडण्याबद्दल राजा प्रजेस अभिवचन देइ

एषामहमायुधा सस्याम्येषा राष्ट्रं सुवीरं वर्धयामि ।
एषां क्षत्रमजरमस्तु जिष्ण्वेषां चित्तं विश्वेऽवन्तु देवा ॥
अथर्व ३।१९।५

'मी या प्रजाजनाची शस्त्रांनें चांगलीं रक्षण करीन, (त्याना नि शस्त्र करणार नाहीं), याच्या राष्ट्राची शूर पुरुषाच्या साह्यानें मी उन्नति करीन, या राष्ट्राचें क्षात्रतेज क्षीण न होईल आणि सर्व विद्वान् लोक या प्रजेच्या विजयशाली चित्ताचें म्हणजे उत्साहाचें नेहमीं संरक्षण करतील अशी दक्षता घेईन.' वैदिक मंत्रातील भावार्थावरून असें स्पष्ट दिसतें कीं, राजसंस्थेबद्दल त्या वेळीं "ना विष्णु पृथ्वीपति" असे संकुचित विचार नव्हते. या विचाराचा प्रादुर्भाव पुराणकालानंतर किंवा बुध्दोत्तर काळीं झाला असावा.

**मातृभूमीविषयीं पूज्यता**–वेदामध्यें स्वदेशाविषयीचे आणि मातृभूमीविषयीं पूज्यतेचे उल्लेख आढळतात. आज जी स्वदेशसेवेची कल्पना आहे ती त्या वेळीं जगातच असणें शक्य नव्हतें. परंतु पृथ्वीचें मातृभूमीच्या स्वरूपानें वर्णन आहे उदाहरण म्हणून तीनच उतारे खालीं देतों.

**(१) त्वज्जातास्त्वयि चरन्ति मर्त्यास्त्वं बिभर्षि द्विपदस्त्वं चतुष्पदः। तवेमे पृथिवि पंचमानवा येभ्यो ज्योतिरमृतं मर्त्येभ्य उद्यन् सूर्यो रश्मिभिरातनोति ॥** अथर्व. १२।१।१५. **(२) उपहूता पृथिवीमाता उपमां पृथिवीमाता ह्वयताम्।** यजु. २।१०. **(३) नमो मात्रे पृथिव्यै माहं मातरं पृथिवीं हिंसिषं मा मां माता पृथिवी हिंसीत् ॥** ते स. १।८।१५

(१) हे पृथ्वी माते, आम्ही सर्व तुझ्यापासून उत्पन्न होत्साते तुझ्यावरच हिंडत फिरत आहोंत. पृथ्वीमाते, तूच सर्व द्विपाद व चतुष्पाद प्राण्याचें पोषण करितेस हे पंच मानव (ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र व निषाद) तुझेच सुपुत्र आहेत. यांच्याकरिता उदयास येणारा सूर्य आपल्या किरणांनीं अमृतरूप तेज प्रसृत करीत असतो (२) मातृभूमीची भक्ती केली आहे म्हणून ती मातृभूमि आज मला उत्साहित करो. (३) मातृभूमीला नमस्कार असो. मजकडून मातृभूमीला कोणताहि त्रास न पोंहचो त्याचप्रमाणें मातृभूमि (रुष्ट होऊन) माझें कोणतेंहि अहित न करो पहिल्या मंत्रातील "त्वज्जाता त्वयि चरन्ति" हीं पदें अगदीं अर्थपूर्ण आहेत. तुझ्यापासून आमचा जन्म आहे, तूच आम्हांला लहानाचें मोठें केलेस, तुझ्याच आधारावर आमचें वास्तव्य आहे

या भावना चिंतनीय आहेत. यावरून हें वर्णन व ही स्तुति भरतभूमीचीच केली असून तिचेंच प्रसंगी पृथ्वीच्या स्वरूपानें वर्णन केलें आहे असें वाटतें. देशाभिमान ही वृत्ति पाश्चात्यांपासून आलेली असली तरी Motherland ची कल्पना आह्मास कांहीं नवी नाहीं. अभिमानास्पद गोष्ट ही आहे कीं, मातृभूमीच्या सेवेची कल्पना आपल्या वैदिक वाङ्मयातहि आहे.

**पुरुषार्थ व उद्योग**—वेदामध्यें पुरुषार्थाविषयीं व मोठा उद्योग करून यश मिळविण्याविषयीं फारच उद्बोधक असा उपदेश पुष्कळ ठिकाणीं केला आहे. जगाकडे पहा. पुरुषार्थी व्हा. प्रजावान् व्हा. प्रज्ञावान् व्हा अशी घोषणा आज मुद्दाम करावयास पाहिजे ह्मणून कांहीं उतारे भावार्थासह देतों.

**पिबतं च तृप्णुतं चा च गच्छतं प्रजां च धत्तं द्रविणं च धत्तम् ॥ १ ॥ जयतं च प्रस्तुतं च प्रचावतं प्रजां च धत्तम् द्रविणं च धत्तं ॥ २ ॥ हतं च शत्रून् यततं च मित्रिण प्रजां च धत्तं द्रविणं च धत्तम् ॥ ३ ॥ ब्रह्मजिन्वतमुत जिन्वतं धियो हतं रक्षांसि सेधतममीवा ॥ ४ ॥ क्षत्रं जिन्वतमुत जिन्वतं नृन्हतं रक्षांसि सेधतममीवा ॥ ५ ॥ धेनूर्जिन्वतमुत जिन्वतं विशोहत रक्षांसि सेधतममीवा ॥ ६ ॥** ऋग्वेद ८।३५।१० ते १२ व १६ ते १८

भावार्थ—प्या, तृप्त व्हा, पुढें चला, प्रजाधारण करा, द्रव्य जवळ ठेवा, ॥ १ ॥ विजयी व्हा, प्रशसनीयाचें संरक्षण करा, प्रजा व द्रव्य वाढवून त्याचें संरक्षण करा ॥ २ ॥ शत्रूचा नाश करा, मित्रांशीं सत्कार्य करा, प्रजा व धन संपादन करा ॥ ३ ॥ ज्ञान प्राप्त करून घ्या, सद्बुद्धीचें रक्षण करा, दुष्टाचा नाश करा व रोगांना नष्ट करा ॥ ४ ॥ क्षात्रतेज कमवा, आणि पुढाऱ्याच्या सांनिध्यात रहा, राक्षसांचें हनन करून रोगराई दूर करा ॥ ५ ॥ गोधन प्राप्त करा, प्रजासपन्न व्हा, दुष्टाचा नाश करा व रोगाचें निवारण करा ॥ ६ ॥

प्रज्ञा, द्रव्य, बाई, ज्ञान, वीर्य इत्यादि सर्व मिळवून मनुष्यानें शभर वर्षे राष्ट्रसेवा करावी या उद्देशानें वरील आज्ञा केल्या आहेत असेंहि कांहीं मंत्रावरून दिसतें. उदाहरणार्थ—**उर्जे त्वा बलाय त्वौजसे सहसे त्वा अभिभूयाय त्वा राष्ट्रभृत्याय पर्यूहामि शत शारदाय ॥** अथर्व. ॥ १९।३७।३.

**भावार्थ**—अन्न, बल, ओज, उत्साह, विनय, राष्ट्रसेवा व दीर्घायुष्य याच्या प्राप्तीकरिता मी प्रार्थना करितों. अर्थात् मनुष्यानें येवढ्या गोष्टी संपादिल्या म्हणजे तो पुरुषार्थी झाला यांत संशय नाहीं अशा पुरुषार्थी मनुष्यावर ईश्वराचें कृपाछत्र असतें म्हणून ईश्वरकृपासंपादनार्थ मनुष्यानें पुरुषार्थाकरिता अखंड झटलें पाहिजे परमेश्वराची कृपा सतत उद्योग करणा यावर होते, दैव वायावर होत नाहीं याबद्दलहि पुष्कळ वचनें आहेत.

न ऋते श्रान्तस्य सख्याय देवा । ऋ ४।३३।११

श्रमाविना देव सख्य करीत नाहीं ऐतरेय ब्राह्मणात दैव, उद्योग, व ईशप्राप्ती याविषयीं चार पाच मत फारच उत्कृष्ट व प्रोत्साहक आहेत ते सर्व हिंदूनीं पाठ करण्याजोगे आहेत.

नाऽना श्रान्ताय श्रीरस्ति । पापोनृषद्वरो जन इन्द्र इच्चरत
सखा । चरैवेति ॥ १ ॥ पुष्पिण्यौ चरतो जंघे भूष्णुरात्मा फल
ग्रहि । शेरे अस्य सर्वे पाप्मानः श्रमेण प्रपथे हताः । चरैवेति
॥ २ ॥ आस्ते भग आसीनस्योर्ध्वस्तिष्ठति तिष्ठत । शेते निप
द्यमानस्य चराति चरतो भग । चरैवेति ॥ ३ ॥ कलिः शयानो
भवति संजिहानस्तु द्वापर । उत्तिष्ठंस्त्रेता भवति कृतं संपद्यते
चरन् ॥ चरैवेति ॥ ४ ॥ चरन् वै मधु विंदति चरन्स्वादुमुदुंब
रम् । सूर्यस्य पश्य श्रेमाणं यो न तंद्रयते चरन् । चरैवेति ॥ ५ ॥

ऐत ब्रा. ७।१५

**भावार्थ**-श्रमाविना श्रीचा प्राप्ति होत नाहीं आळशी मनुष्य पापा समजावा. पुरुषार्थी मनुष्याचा मित्र ईश्वर आहे म्हणून यत्न करा व पुरुषार्थ संपादन करा ॥ १ ॥ जो चालतो ( व्यायाम घेतो ) त्याच्याव मांड्या पुष्ट होतात फलप्राप्तीपर्यंत यत्न करणारा मनुष्य प्रभावशाली ठरतो प्रयत्न करणाऱ्याच मार्गांत येणारे पापभाव—विघ्नें आपोआपच नष्ट होतात याकरितां यत्न करा, कष्ट करा ॥ २ ॥ जो घरीं बसतो त्याचें नशीबहि बसतें जो उभा राहतो त्याचें नशीबहि उभें राहतें जो निजतो, त्याबरोबर त्याचें दैवहि झोपीं जातें त्याप्रमाणें जो चालू लागतो त्याचे मागोमाग त्याचें दैवहि येतें.

म्हणून मनुष्यानें प्रयत्न केला पाहिजे व सक्षेपी झालें पाहिजे ॥ ३ ॥ झोपी गेला की कलियुग लागतें, आळस सोडला कीं द्वापर युगाला प्रारंभ होतो, उठून बसणें हें त्रेतायुगाचें लक्षण होय व उद्योग म्हणजेच कृतयुग होय याकरितां मनुष्यानें उद्योगच केला पाहिजे. ॥ ४ ॥ मधमाशी भ्रमण करून मध मिळविते, पक्षीहि संचार करून मधुर फळें प्राप्त करून घेतात. सूर्याचें तेज त्याची शोभा हीं त्याच्या निरलस व सतत भ्रमणाचीं फळें होत. याकरितां प्रयत्न करा व परिश्रम करा. अशाच प्रकारचे मत वेदांमध्यें पुष्कळ आहेत, त्यापैकी ऋग्वेदातील दोन तीन मन्त्र देऊन पुढें चालू लागतों.

**इच्छन्ति देवा सुन्वन्तं न स्वप्नाय स्पृहयन्ति । यन्ति प्रमादमतन्द्राः ॥ ऋ. ८।२।१८ अरायिकाणे विकटे गिरिं गच्छ सदान्वे । शिरिं बिठस्य सत्वभिस्ते भिष्ट्वा चातयामसि ॥ ऋ १०।१५५।१. अदो यद्दारु प्लवते सिंधो:पारे अपूरुषम् । तदारभस्व दुर्हणो तेन गच्छ परस्तरम् ॥ ऋ. १०।१५५।३**

भावार्थ—देव यज्ञकर्त्यांची इच्छा करतात, आळशी मनुष्याची करीत नाहींत. अयोग्य वागणाऱ्यांचें दमन देव न चुकतां करितात ॥ १ ॥ हे धनहीन, विरूप, कुरूप व सदा आक्रोश करणाऱ्या दरिद्रते, निर्जन पर्वतावर जा, नाहींतर वज्रासारख्या कठीण हृदयाच्या मनुष्यांच्या पराक्रमाचे साह्यानें तुला समूळ नाश आम्ही करू शकू ॥ २ ॥ कौशल्यानें दारिद्र्यरूपी समुद्राच्या पार जाण्याकरितां यत्न करितो. याकरितां कारागिरीला प्रारंभ करा दारिद्र्यानें अत्यंत पीडित झालेल्या मनुष्यानो, दारिद्र्याच्या पार या कारागिरीनें जावें, कारण कौशल्य व कला हींच दारिद्र्याचा नाश करितात.

उद्योगाची व पुरुषार्थाची महती तुमती वेदांत नसून आळस, करंटेपणा, अनुद्योग हे दुर्गुण जावेत अशाहि प्रार्थना आहेत. ऋग्वेदामध्यें एका ठिकाणी घरांत बसून बसून मजबूत वृद्ध होण्याचा प्रसंग न येवो अशी मागणी इंद्राजवळ केलेली आढळते

**मा ते अमाजुरो यथा मूरास इंद्र सख्ये त्वावतः । निषदाम सचा सुते ॥ ऋ. ८।२१।१५.**

भावार्थ—हे इंद्रप्रभो, मूर्खासारखे आम्ही परामध्येच बसून बसून वृद्ध होणारे न व्हावे. तर तुझ्या भक्तीनें तुझ्याजवळ राहात राहात यज्ञामध्यें तुझ्या सेवेंतच आम्ही असावें.

दीर्घायुष्य—वैदिक आर्य दीर्घायुषी होते. " शतायुर्वै पुरुष " असा वैदिक वाक्प्रचार त्या वेळी होता. आयुष्यवृद्धीचे अनेक उपाय त्यावेळीं व्यवहारांत असावेत. जगांतील कोणत्याहि पुरुषार्थाला आयुष्यादि हें मोठें साधन आहे. मृत्यूसारखी या जगांत हानी नाहीं, म्हणूनच अनेक असुरांनीं कित्येक वर्षे तपस्या करून अमरत्वाचे वर मागितलेले दिसतात. मनुष्याचें ऐहिक ऐश्वर्य दीर्घायुष्यांत आहे. किंबहुना कोणतेंहि ऐश्वर्य भोगण्याचें आयुष्य हेंच साधन आहे. महाभारतकालीन सर्व वीर दीर्घायुषी होते. गेल्या महायुद्धांतील रणांगणावर आलेल्या सेनापतींकीं बहुतेक सर्व साठ वर्षांवरचे होते. आज आपली तरुण पिढी फारच अल्पायुषी दिसते. या पिढीला वेदांतील दीर्घायुष्याच्या कल्पना शिकवून त्यांचें आयुष्य वाढविलें पाहिजे. म्हणून भगदीं सोप्या अर्थाचे कांहीं मंत्र देतों

पश्येम शरद शतं जीवेम शरदः शतम् ॥ ऋग्वेद ७।६६।१६

पश्येम शरदः शतं जीवेम शरदः शतम् शृणुयाम

शरदःशतं प्रब्रवाम शरदः शतमदीनाः स्याम

शरदः शतं भूयश्चशरदः शतात् ॥ यजु. ३६।२४

बुध्येम शरदः शतम् । रोहेम शरदः शतम् ॥

पूषेम शरदः शतम् । भवेम शरदः शतम् ॥

भूयेम शरदः शतम् । भूयसी शरदः शतात् ॥ अथर्व. १९।६७

भावार्थ—शंभर वर्षे पहावें, जगावें, ऐकावें, ( सृष्टीचा उपभोग घ्यावा ), व्याख्यानें द्यावींत, शंभर वर्षे दैन्य न येता आम्ही जगावें आणि शंभर वर्षांपेक्षांहि अधिक काल आम्ही आनंदांत असावें, शंभर वर्षे आम्ही ज्ञान मिळवावें, तें वाढवावें, शरीरानें पुष्ट व्हावें. सपश व्हावें, उन्नतीप्रत जावें, इतकेंच नव्हे तर शेंकडों वर्षांपेक्षांहि अधिक काल आम्ही सदोदित उत्कर्ष पावत असावें. वैदिक आर्यांची ही जिजिगीषाबुद्धि व महत्त्वाकांक्षा प्रत्येक हिंदूनें हृत्पटलावर कोरून ठेवण्यास नको काय ?

**धैर्य व निर्भयता**—धैर्य व निर्भयता हे दोन्ही गुण परस्पर पोषक आहेत. किंवा हा एकाच वृत्तीचीं निरनिराळीं नावें आहेत मानवी जीविताला या गुणद्वयाची अत्यंत आवश्यकता आहे श्रीमत् भगवद्गीतेमध्यें दैवी संपत्तीचें वर्णन करिताना पहिलें लक्षण "अभयं" म्हणजे निर्भयता हें सांगितलें आहे निर्भयतेमध्येंच मनुष्याचें खरें पौरुष चमकतें. मनुस्मृतीमध्यें जो दशलक्षणात्मक धर्म विवेचित केला आहे त्यात **"धृति-क्षमा दमोऽस्तेय"** धृति म्हणजे धैर्य हा गुण पहिला म्हणून वर्णिला आहे.

हिंदु लोक भित्रे आहेत, भ्याड आहेत असें हल्लीं म्हटलें जातें याची प्रत्येक हिंदुला लाज वाटली पाहिजे व त्यानें वैदिक आर्यांचे धैर्यविषयक विचार जे प्रार्थनेच्या रूपानें हिमालयातील गंगेप्रमाणें धो धो वाहात आहेत त्याचें आकंठ पान केलें पाहिजे आमच्या हृदयांत (प्राणात) भीति मुळीच नसावी असें वर वैदिक आर्यांनीं देवतांजवळ मागितलें आहेत

यथा द्यौश्च पृथिवी च न बिभीतो न रिष्यतः
एवा मे प्राण मा बिभेः ॥ अथ० २।१५।१
यथाहश्च रात्री च न बिभीतो न रिष्यत
एवा मे प्राण मा बिभेः ॥ अथ० २।१५।२
यथा सूर्यश्च चंद्रश्च न बिभीतो न रिष्यतः
एवा मे प्राण मा बिभेः । अथ० २।१५।३
यथा ब्रह्म च क्षत्रं च न बिभीतो न रिष्यतः
एवा मे प्राण मा बिभेः । अथ० २।१५।४
यथा सत्यं चानृतं च न बिभीतो न रिष्यतः
एवा मे प्राण मा बिभेः ॥ २।१५।५
यथा भूतं च भव्यं च न बिभीतो न रिष्यतः
एवा मे प्राण मा बिभेः ॥ अथ० २।१५।६

भावार्थ—ज्याप्रमाणें द्युलोक व पृथ्वी, दिवस व रात्र, सूर्य आणि चंद्र, ब्रह्म व क्षत्र, सत्य व असत्य, भूत आणि भविष्य हीं द्वंद्वें कधींहि भीत

नाहीत, अर्थात् निर्भयतेमुळें कधीं नष्ट होत नाहीत त्याप्रमाणें हे माझ्या पंच-प्राणांनो, ( हे जीवा ) तुम्ही कधीहि भिऊं नका.

या मंत्रांत चंद्र-सूर्य, रात्र-दिवस, भूत-भविष्य यांच्याप्रमाणें आमचे अंगांत धैर्य उत्पन्न व्हावें अशी उत्कटत्वानें परमोच्च ध्येय म्हणून आकांक्षा दर्शविली आहे. प्राणामध्यें ( अंगात ) भीति व मनांत कुविचार येऊं लागले की आत्मनाश समीप आला असें समजावें.

**शुभ संकल्पी मन**—मनाच्या विविध वृत्ति जगांत दृग्गोचर होतात संकल्प करणारें मन हेंच यच्चयावत् भव्य इमारती उभारीत असतें. मन जर हाताशीं आलें, मनावर ताबा चालविता येऊं लागला, आणि मनांतील कुविचार जाऊन तेथें सुविचाराचा ( शिवसंकल्पाचा ) प्रादुर्भाव होऊं लागला तर वैय क्तिक उत्कर्षाला विलंबच नाहीं. वैदिक वाङ्मयांत मनामध्यें सदैव शिवसंकल्प असावेत अशा प्रार्थना केलेल्या आढळतात. त्यांतील एक उत्कृष्ट भाग यजुर्वेदामध्यें आहे त्यांत मनाचें वर्णन बरेंच केलें असून शेवटीं **"तन्मे मन शिवसंकल्पमस्तु"** तें माझें मन शिवसंकल्पयुक्त होवो असा चरण प्रत्येक मंत्राच्या शेवटीं घातला आहे.

**स्त्रियांचें समाजांत स्थान**—वेदकालीन समाजांत स्त्रियांचें स्थान कुठें होतें हें आतां पाहू.

**आत्मा वै पुत्र नामासि इति । जायायास्तदेव जायात्वं यतोऽस्यांपतिः पुनर्जायते ॥ तथाच बह्वृच ब्राह्मणम् पतिर्जाया प्रविशति गर्भो भूत्वेह मातरम् । तस्या पुनर्नवोभूत्वा दशमे मासि जायते ॥ तज्जाया जाया भवति यदस्या जायते पुन ॥**

" आत्मा हाच पुत्र होय निश्चयामध्यें पति पुन जन्माला येतो, तेच जायेचें जायात्व होय पति गर्भरूपानें जायेमध्यें प्रविष्ट होतो व पुन नवीन स्वरूपानें दहाव्या महिन्यांत जन्माला येतो पति निश्चयामध्यें दहाव्या महिन्यांत जन्माला येतो तीच जाया होय " या मंत्रांत पुरुषापेक्षा स्त्रीचें महत्त्व अधिक दाखविलें आहे पति हा गर्भरूपानें पत्नीला माता करितो व पतीला जन्म देणारी म्हणून तिला जाया म्हणावें असें उत्कृष्ट तत्त्व यांत सांगितलें आहे त्याचप्रमाणें वाजसनेय ब्राह्मणामध्यें ' **अर्धो ह वा एष आत्मनस्तस्माद्य-**

**ज्जायां न विन्दते नैतावत्प्रजायते असर्वोहि तावद्भवति अथ यदैव जायां विन्दतेऽथ प्रजायते तर्हि सर्वो भवति।'**

"स्त्री हा आत्म्याचा अर्धा भाग होय म्हणून जोंवर मनुष्य गृहस्थाश्रमी नाही व प्रजावान् नाही तोंवर तो अपूर्ण समजावा पण जेव्हां मनुष्य स्त्री प्राप्त करून घेतो व प्रजावान् होतो तेव्हाच तो पूर्ण समजावा असें वेदवेत्ते ब्राह्मण म्हणतात." येथें स्त्री व पुरुष हे दोन्ही घटक तुल्यबल आहेत असें सांगितलें असून स्त्रीशिवाय पुरुषाची पूर्णता नाही म्हणजे समाजाची पूर्णता नाही असा सिद्धान्त गोंवलेला आहे. "**अर्धो वा एष आत्मनः यत्पत्नी**" असं तैत्तिरीय संहितेमध्यें ( ६।१।८ ) म्हटलें आहे पत्नी ही जणु काय पुरुषाचें अर्धें शरीर हा त्या म्हणण्याचा अर्थ आहे. त्यावरून वैदिक समाजांत स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीचें स्थान होतें यात शंका नाही. "**मातापूर्वरुपम्**" "**मातृदेवोभव,**" हीं तैत्तिरीय आरण्यकांतील वाक्यें पित्यापेक्षां मातेचें श्रेष्ठत्व स्पष्ट करितात बृहदारण्यक उपनिषदामध्यें—

**स वै नैव रेमे तस्मादेकाकी न रमते स द्वितीय मैच्छत स हैतावानास यथा स्त्री पुमांसौ संपरिष्वक्तौ स इममेवात्मानं द्वेधा पातयत्ततः पतिश्च पत्नीचा भवतां तस्मादिदमर्ध वृगल-मिवस्वइति ह स्माह याज्ञवल्क्यस्तस्मादयमाकाशः स्त्रिया पूर्यत एव तां समभवत्ततो मनुष्या अजायन्त ॥ बृ. दा अ १ ब्रा. ४.**

प्रथमारंभी परब्रह्म हें एकटें होतें. त्या एकटपणाला चैन पडेना म्हणून त्याला दुसरें कोणी तरी हवें असें वाटलें. नतर तें ब्रह्म स्वतः एका कुजलेल्या स्त्री पुरुषांच्या जोडप्याच्या आकाराचें झालें. त्याचे त्यानें दोन भाग केले, तेच पति व पत्नी हे होत. म्हणून पत्नी हा पतीचा अर्धा भाग होय. जी पोकळी पुरुषावरून भरली जात नाही ती स्त्रीवरून भरली जाते व अशा रीतीनें स्त्री व पुरुष मिळून प्रजा उत्पन्न होते येथेंहि स्त्रीपुरुषांची उत्पत्ति एकदम कशी झाली हें सांगून हीं दोन्ही वर्गांच्या व्यवहारांना परस्पर पोषक कशी आहेत हें उत्तम तऱ्हेनें दाखविलें आहे.

**गृहपत्नीचें स्थान**—अथर्ववेदामध्यें गृहपत्नीला उद्देशून जे आशीर्वाद-पर मंत्र आहेत त्यावरून गृहिणीचे अधिकार कळतात.

शिवाभव पुरुषेभ्यो गोभ्यो अश्वस्य शिवा ।
शिवास्मै सर्वस्मै क्षेत्राय शिवा न इहैधि ॥ ३।२८।३
इह प्रियं प्रजायै ते समृध्यतामस्मिन् गृहे ।
गार्हपत्याय जागृहि एना पत्या तन्वंसं ॥
स्पृशस्वाथ जिर्विविदथ मा वदासि ॥ अ. १४।१।२१
आशासाना सौमनसं प्रजां सौभाग्यं रयिम् ।
पत्युरनुव्रता भूत्वा संनह्यस्वामृताय कम् ॥ १४।१।४१
यथा सिंधुर्नदीनां साम्राज्यं सुषुवेवृषा ।
एवा त्वं सम्राज्ञ्येधि पत्युरस्तं परेत्य ॥ अ १४।१।४२
सम्राज्ञ्येधि श्वशुरेषु सम्राज्ञ्युत देवृषु ।
ननान्दु सम्राज्ञ्येधि सम्राज्ञ्युत श्वश्रवाः ॥ अ १४।१।४४
गृह्णामि ते सौभगत्वाय हस्तं मया पत्या
जरदष्टिर्यथास । भगो अर्यमा सविता
पुरंधिर्मह्यं त्वादुर्गार्हपत्याय देवा ॥ १४।१।५०
सुमंगली प्रतरणी गृहाणां सुशेवा पत्ये श्वशुराय शंभू ।
स्योना श्वश्र्वै प्रगृहान् विशेमान् , १४।२।२६
आरोहतल्पं सुमनस्यमानेह प्रजां जनय पत्ये अस्मै । इंद्राणीव
सुबुधा बुध्यमाना ज्योतिरग्रा उषस प्रतिजागरासि १४।२।३१
प्रबुध्यस्व सुबुधा बुध्यमाना दीर्घायुत्वाय शतशारदाय ।
गृहान् गच्छ गृहपत्नी यथा सो दीर्घं त आयु सविता कृणोतु
१४।२।७५

भावार्थ–हे स्त्रिये, तू पुरुष, गाई, घोडे व गृहांतील इतर सर्व स्थानें यांना व आम्हाला कल्याणकारक अशी होऊन तू गृहांत ये येथें तुझ्या संततीचें हितवर्धन होवो. घरातील गार्हपत्य कर्मांमध्यें तू जागरूक रहा पतीच्या आश्रानें शरीरसौख्य प्राप्त करून घे व ज्ञानवृद्ध होऊन सभामध्यें भाषण कर. मनाची प्रसन्नता, संतति, सौभाग्य, ऐश्वर्य, द्रव्य यांची इच्छा करणारी होत्साती

पतीला अनुकूल वश करणारी होऊन तुझें सुख इंद्रपुरादीं स्पर्धा करील असें वर्तन कर. ज्याप्रमाणें बलवान् समुद्रानें नद्यांकरितां साम्राज्य उत्पन्न केलें, त्याप्रमाणें तू पतीच्या घरीं जाऊन त्या सम्राटाची पट्टराणी हो. सासरा, दीर, नणंद, सासू, यांच्यामध्यें राहून यांना सुख देणारी अशी तू सम्राज्ञी हो. हे स्त्रिये, उत्तम भाग्याच्या प्राप्तीकरता मी तुझें पाणिग्रहण करीत आहें. मज पतीबरोबर तू पूर्ण वृद्धावस्थेपर्यंत रहा. भाग्यवान्, श्रेष्ठ, उत्पादक, (सृष्टी-च्या) अशा देवतांनीं तुला माझीं गृहपतीचीं कर्तव्यें पार पाडण्याकरता दिलेलें आहे. ( सांगितलें आहे ) हे स्त्रिये, तू उत्तम मांगल्य करणारी, घरांत स्वच्छता, टापटीप, व्यवस्था ठेवून त्याचें ऐश्वर्य वाढविणारी, पतीची उत्कृष्ट सेवा करणारी, सासू, सासरा व घरांतील इतर माणसें या सर्वांना सुख देणारी अशी होऊन या घरांत प्रविष्ट हो. हे स्त्रिये, प्रसन्न मनानें तू या शय्येवर चढ व आपल्या पतीकरतां प्रजा उत्पन्न कर. इंद्राच्या इंद्राणीप्रमाणें ज्ञानयुक्त होऊन प्रकाश देणारी ( उषःकालाप्रमाणें ) अशी तू हो. शंभर वर्षांच्या आयुष्याकरतां उत्तम ज्ञान प्राप्त करून घेऊन तू आपल्या पतीच्या घरीं जा. तेथें गृहाची स्वामिनी होऊन सुखानें रहा. सर्वांचा प्रेरक व उत्पादक श्रीसविता तुझें कल्याण करील.

"पत्नीहि पारीणह्यस्येशे" असें तैत्तिरीय संहितेंत ( ६।२।१ ) म्हटलें आहे. त्यावरून गृहांतील सर्व कार्यांवर गृहिणी या नात्यानें स्त्रिया सर्वाधिकारी होत्या असा भाव व्यक्त होतो. प्रापंचिक जबाबदारी सांभाळण्याची पात्रता असल्यावांचून इतका अधिकार कोणी देईल काय ? स्त्रियांबद्दल आदर व त्यांजवर विश्वास त्या काळीं मोठा होता म्हणून "पत्नीहि सर्वस्य मित्रं," असें तैत्तिरीय संहितेमध्यें (६।२।९) वाक्य आलेलें आहे. नवरा, दीर, सासू, सासरा या सर्वांप्रमाणें आल्यागेल्याची काळजी घेणें, अतीताभ्यागताचा परामर्ष घेणें, ही कर्तव्यें करण्यांत वैदिक स्त्रिया अत्यंत तत्पर असत, म्हणून त्यांना सर्वांचें मित्र असें म्हटलें जाई. वरील विवेचनावरून वेदकाळीं स्त्रीविषयक कल्पना होत्या हें वाचकांच्या ध्यानीं येईल.

**स्त्रियांचें शिक्षण व राहाणी**—वैदिक स्त्रियांचें शिक्षण, राहाणी, कौशल्य, वागणूक इत्यादि विषयीं थोडा विचार केला पाहिजे. "जायेव पत्य उशती सुवासा " असें ऋग्वेदसंहितेंत ( ४।३।२ येथें ) वर्णन आलें आहे. त्यावरून वैदिक स्त्रिया उत्कृष्ट तऱ्हेचीं व तलम वस्त्रें प्रसंगविशेषीं नेसत असत

तसेंच "**सुभगे कांपीलवासिनी**" या तैत्तिरीय संहितेच्या सहाव्या अष्टकात आलेल्या वाक्यावरूनहि हें सिद्ध होतें. सुकपर्दा, सुकुरीर, स्वौपशा अशीं तै. सं, ४।१।५, येथें विशेषणे आलेली आहेत. त्यांचा विचार केल्यास वैदिक स्त्रिया वेणी घालीत, कधीं केस पिळून बुचडा घालीत, व कधीं केशकलापाची रचना अत्यंत मनोहर व टापटिपीनें करीत असें दिसतें. "**यथा ह वै योषा सुवर्णं हिरण्यं पेशलं बिभ्रती रूपाण्यास्ते**" असें तै॰ ब्रा.( ३।३।५ त ) म्हटलें आहे त्यावरूनहि वैदिक स्त्री शक्त्यनुसार सुवर्णाचे अलंकार धारण करी व ती आपली राहाणी व्यवस्थित व टापटिपीची ठेवी असें म्हणण्यास हरकत नाहीं श्रीमंतांच्या स्त्रियाचा उल्लेख शतपथ ब्राह्मणात १३।४।१ यांत आला आहे तो पाहिला म्हणजे त्यांच्या अलंकाराची व थाटामाटाच्या राहाणीची कल्पना येते.

सूच्या अच्छिद्यमानया सीव्यतु ।
पेशस्कृति संतुना संव्ययन्ति ।

या उल्लेखावरून वैदिक स्त्रिया शिवणकाम व विणकाम या कला जाणत होत्या असें म्हणता येतें "**पत्न्यय उपगायन्ति**" तै. स. ( ७।५।७ ), "**पत्न्यश्च काण्डवीणा**" ऐतरेय आरण्यक ( ५।१।५ ), या वाक्यावरून व ताण्ड्य ब्राह्मणातील आपघाटिला नामक वाद्याच्या उल्लेखावरून वैदिक यज्ञपत्न्या सामगान करणाऱ्या ऋत्विजांची साथ करीत, अलगुजासारखें सुषिर वाद्य तोंडानें वाजवीत व विण्यासारख्या ततुवाद्यामध्येंहि त्या कुशल असत असें म्हणण्यास आधार आहे. खेलराजाची स्त्री विश्पला ही उत्कृष्ट रणधुरंधर होती, तिनें लढाई केल्याचें वर्णन ऋग्वेद १०।३९।८ मध्यें आलेलें आहे. लढाईत या स्त्रीचा पाय तुटला व तो अश्विनी कुमारानी लोखंडाचा करून जुळविला अशी माहिती तेथें मिळते. मुद्गलानी म्हणजे मुद्गल नावाच्या कोणा एका पुरुषाची स्त्री ही सारथ्यकर्मामध्यें मोठी निपुण होती असें वर्णन ऋग्वेद,१०।१०२।२ मध्यें आढळतें. तात्पर्य वैदिक स्त्रिया शूर, साहसी व सारथ्यकर्मकुशल अशा होत्या. स्त्रियाच्या ठिकाणीं गृहिणीकर्मातील नैपुण्य, कलांतील अभिज्ञता व युद्धांतील शौर्य ही सर्व असतांना त्या अत्यंत विनयशील असत हें विशेष ध्यानांत ठेवण्याजोगें आहे. "**स्नुषा श्वशुरा लज्जमाना निलीयमानैति**"

असें वर्णन ऐतरेय ब्राम्हणामध्यें आहे त्यावरून सासुरवासिनी वडील माणसापुढें विनयानें वागत व पदर सावरून बाजूला होत असें दिसतें. तात्पर्य वैदिक स्त्रियात विद्या व शिक्षण ही पूर्ण असताना " **विद्या ददाति विनयं** " हें तत्व त्यांच्या हाडीमासीं खिळलेलें होतें.

**वैदिक स्त्रियांची वृत्ति**—वैदिक स्त्रियांनीं ठिकठिकाणीं ज्या प्रार्थना केल्या आहेत, त्याचा सारांश पुढीलप्रमाणें देता येईल " इंद्राणीप्रमाण मी सौभाग्यसंपन्न व्हावें. अदितीप्रमाणें सुपुत्राची माता स्त्री व्हावें, माझे पुत्र शत्रूचा संहार करणारे असे व्हावेत, माझी मुलगी पुरंध्रीपदाला ( गृहिणी-पदाला ) योग्य अशी असावी आणि मी स्वत सर्व कार्यांत जयशाली, भाग्य-शाली, व वीर्यशाली असावें " वैदिक आर्यांच्या स्वभावाला पोषक अशा सर्व वृत्ति वैदिक स्त्रियामध्यें दिसतात. गृहरक्षण, गृहशिक्षण, ज्ञानार्जन, साहित्यसंगी-तादिकांचें ज्ञान व रणकौशल्य या सर्व क्षेत्रात स्त्रिया पुरुषांच्या बरोबरीच्या होत्या इतकेंच नव्हे तर गार्गी, वाचक्नवी, मैत्रेयी यांसारख्या ब्रह्मवादिनी स्त्रिया ब्रह्मवेत्त्याशीं बरोबरीच्या नात्यानें चर्चादि करीत असत, हें बृहदारण्यकादि उप-निषदांवरून स्पष्ट होतें. वैदिक ऋषींमध्यें जसे मंत्रद्रष्टे ऋषी होते तशाच मंत्र-द्रष्ट्या ऋषिकाहि होत्या व त्यानीं वैदिक वाङ्मयात आपलें स्थान अढळ करून ठेविलें आहे इतकें सांगितलें म्हणजे वेदकाली स्त्रियांचें समाजांत स्थान काय होतें याविषयीं अधिक विवेचन करण्याचें प्रयोजन उरणार नाही.

**यज्ञसंस्था**—वैदिक आर्यांची मुख्य संस्था म्हटली म्हणजे यज्ञ ही होय. या यज्ञसंस्थेवरून तत्कालिन सामाजिक परिस्थितीची चागली कल्पना येते. यज्ञांशीं त्रैवर्णिकांचा साक्षात् संबध असे व इतरांचा परंपरेनें असे यज्ञसंस्था ही वैदिक प्रवृत्तिपर धर्माची उत्कृष्ट खूण आहे सर्व मंत्राचा संबध विनियोगरूपानें यज्ञांशीं जोडलेला आहे. विविध सूक्तावरून व यज्ञीय प्रार्थनांवरून इंद्र, आदित्य, वरुण, वायु, अग्नि, विष्णु, पूषन्, सोम, सूर्य, मरुत्, रुद्र, अश्विन्, बृहस्पति, उषा इत्यादि देवतांची कल्पना येते याच सूक्तामध्ये दान, धर्म, सत्कार व अध्यात्म यांविषयींचे विचार आढळतात कश्यप, अत्रि, वसिष्ठ, भृगु, अंगिरस, भरद्वाज, विश्वामित्र, गौतम, जमदग्नि या ऋषींचा संबध यज्ञकर्माशीं विशेष दिसतो. थोरांच्या संबधाच्या अनेक गोष्टी व आख्यायिका वेदात सांपडतात.

दर्शपूर्णमास, पिंडपितृयज्ञ, चयन, अग्निष्टोम, वाजपेय, दर्शपेय, ज्योतिष्टोम, अश्वमेध, राजसूय, पुरुषमेध, महाव्रत, बृहस्पतिसव, स्वर्गसत्र, नक्षत्रसत्र अशा नांवावरून यज्ञाच्या स्वरूपाची यथार्थ कल्पना येते. यज्ञसंस्थेची पूर्ण वाढ झाली होती म्हणून तिला अनेक प्रकारचे कारागीर लागत. सुतार, सोनार, लोहार, चामार, शिंपी, विणकर, कुंभार, रथकार, दोऱ्या वळणारे, वाद्यवादक अशा तऱ्हेचे कारागीर त्या वेळीं होते. चतुर्वेदांखेरीज इतिहास, पुराण, वाकोवाक्य, देवविद्या, ब्रह्मविद्या, क्षत्रविद्या, नक्षत्रविद्या, सर्पविद्या, गणितशास्त्र, महत्त्व मापन, अस्रें काढणें अशा विद्यांचा उल्लेख काहीं ठिकाणीं आढळतो. यज्ञांमध्यें यजपत्न्यांना बराच मान असे. त्या मोकळ्या मनानें वावरत असत. यज्ञप्रसंगी त्या तत्त्वज्ञानाची चर्चा करीत व उत्सवांमध्यें भाग घेत आणि आनंदानें काल क्रमणा करीत. स्त्रियांची योग्यता पुरुषांबरोबर मानली जाई. किंबहुना त्याचे दक्ष " अर्धे भार्या मनुष्यस्य " या न्यायानें पुरुषाच्या बरोबरीचे असत. आर्यांच्या पत्न्यांचा स्वभाव आनंदी, उदार्णी साधी व वृत्ति निर्भय असे. आर्य हे स्वभावानें प्रामाणिक, पवित्र व निग्रही होते. आर्यांच्या घरांत गृहिणीचें महत्त्व फार असे. गृहिणी म्हणजेच घर अशा समजूत होती. या गृहिणी गृह-कृत्यांत दक्ष असत. त्या शाकान्न व मांसान्न सिद्ध करीत. घरात दूधदुभतें पुष्कळ असे. दूध काढणें हें मुलींचें मोठें काम समजलें जाई. गाई, बैल, घोडे हीं घरोघरी असत. घोड्यांचा उपयोग शेतीकडेहि होत असावा.

**यज्ञसंस्थेचे परिणाम**—एकंदरींत यज्ञसंस्थेनें आर्यांच्या सामाजिक जीवनावर चांगलाच परिणाम केला आहे असें दिसतें. त्या संस्थेनें १. गोत्र-प्रवराचे संबंध कायम ठेविले, २. गान व नृत्य या सुधारलेल्या कला अस्तित्वात आणल्या, ३. प्राणिशास्त्र वाढविलें व शिल्पशास्त्र पूर्णतेस नेलें, व्याख्यानें, इतिहास, पुराणें यांची वृद्धी केली, ४. रानटी व मागासलेल्या समाजांना उत्सवांच्या निमित्तानें आपल्याकडे आकर्षून घेतलें, ५. अनेक लोकांच्या समुच्चयामुळें व्यवहारधर्म उत्पन्न केला, ६. यज्ञ हें सामाजिक संपत्तीच्या उपभोगाचें साधन बनविलें, ७. अग्निहोत्रपुरःसर यथाहुती स्थापन करण्याचें कार्य सुगम केलें, ८. हळूहळू व्यापारवृद्धीस साह्य केलें, ९. सर्वांत विशेष गोष्ट म्हणजे समाजाचा विस्तार जसा होऊं लागला तसा सर्वांची व्यापक कल्पना केली व या सर्वांमध्यें ऐक्य

नादावें म्हणून सार्वराष्ट्रीय धर्म उत्पन्न केले, १० यज्ञानिमित्त अनेक विद्वान् एकत्र येऊं लागल्यामुळें तत्त्वज्ञानाच्या वाढीस उत्तेजन मिळालें.

**यज्ञांतील कांहीं प्रार्थना—** या यज्ञामध्यें देवतांना उद्देशून अनेक प्रार्थना म्हटल्या जात. त्या वैयक्तिक व सामुदायिक उत्कर्षाच्या दृष्टीनें विचारणीय आहेत. समष्टिधर्माची योग्य कल्पना वैदिक आर्यांना होती. मी, माझी बायको व माझें घर या पलीकडे न पाहणाऱ्याची जी संकुचित दृष्टि आज समाजात दिसते तिचा मागमूसहि या प्रार्थनांमध्यें नाहीं. जग अनित्य, जगाशीं आपणास काय करावयाचें आहे, आपण बरें, आपलें घर बरें, असें म्हणण्यांत मोठा पुरुषार्थ आहे असें समजणाऱ्या लोकांनीं या प्रार्थनांतील अर्थाचें चांगलें पठणच केलें पाहिजे, तरच त्यांची दृष्टि थोडी निवळेल.

तनूपा अग्नेऽसि तन्वं मे पाह्यायुर्दा अग्नेऽस्यायु र्मे देहि वर्चोदा अग्नेऽसि वर्चो मे देहि । अग्ने यन्मे तन्वाऊनं तन्म आपृण ॥

वाजसनेयि संहिता ३।१५

" हे अग्ने, तू शरीरसंरक्षण करणारा आहेस, माझ्या शरीराचें रक्षण कर. हे अग्ने, तू आयुर्दाता आहेस; मला आयुष्य दे. हे अग्ने, शक्ति देणारा तूच आहेस, मला शक्ति दे. हे अग्ने, माझ्या शरीरांतील सर्व उणेपणा तू भरून काढ. "

आयुर्यज्ञेन कल्पतां प्राणो यज्ञेन कल्पतां चक्षुर्यज्ञेन कल्पतां श्रोत्रं यज्ञेन कल्पतां पृष्ठं यज्ञेन कल्पतां यज्ञो यज्ञेन कल्पतां ॥

यजु. ९।२१

" या यज्ञानें आयुष्याची वाढ होवो । यानें प्राणवायु वाढो । डोळे चांगले होवोत, यानें कान चांगले होवोत । पाठीची वाढ होवो; यज्ञानें यज्ञाची वाढ होवो "

वाङ्म आसन्नसोः प्राणश्चक्षुरक्ष्णोः श्रोत्रं कर्णयोः ॥ अपलिताः केशा अशोणा दन्ता बहु बाह्वोर्बलम् ॥१॥ ऊर्वोरोजो जंघयोर्जवः पादयोः ॥ प्रतिष्ठा अरिष्टानि मे सर्वात्मा निभृष्टः ॥२॥ तनूस्तन्वा मे सहे दतः सर्वमायुरशीय ॥ स्योनं मे सीद पुरुः पृणस्व पवमानः

स्वर्गे ॥ ३ ॥ उत्तिष्ठ ब्रह्मणस्पते देवान् यज्ञेन बोधय ॥ आयुः प्राणं प्रजां पशून् कीर्तिं यजमानं च वर्धय ॥ ४ ॥

अथर्व० कां० १९, सू. ६० ते ६३.

**भावार्थ**—माझ्या वाणींत पूर्ण आयुष्यापर्यंत वक्तृत्वशक्ति असो नासिकेमध्यें प्राणशक्ति संचार करो, डोळ्यांत उत्तम दृष्टि राहो, श्रवणेंद्रियें तीक्ष्ण असोत, माझे केस न पिकोत, माझे दांत न किडोत ( मलिन न होवोत ), बाहूमध्यें चांगलें बळ असावें, माझ्या मांड्यामध्यें चांगलें सामर्थ्य असावें, माझ्या जंघामध्यें(पोटऱ्यामध्यें) चापल्य असावें. पायामध्यें स्थिरता व दृढता राहो. सारांश, माझे सर्व अवयव धष्टपुष्ट होवोत. माझा अंतरात्मा उत्साहयुक्त असो. प्रबळ शत्रूशीं टक्कर देण्याचें सामर्थ्य माझ्यामध्यें असो. पूर्णायुष्यांत मी सुखानें व आनंदानें असावें म्या अत्यंत शुद्ध व्हावें व उत्तम लोक जो स्वर्ग त्यामध्यें माझें अखंड वास्तव्य व्हावें हे ज्ञानदेवते, तू उठ व सत्कर्मद्वारा विद्वानांना चेतना दे. त्याचप्रमाणें आयुष्य, जीवन, संतति, पशुपालन, कीर्ति व सत्कर्म करणाऱ्याचें बल ही वृद्धिंगत कर वैयक्तिक प्रार्थनाप्रमाणें कांहीं सामुदायिक प्रार्थनाहि उत्कृष्ट आहेत त्यापैकीं कांहीं भावार्थासह येथें देणें उचित आहे

ॐ आ ब्रह्मन् ब्राम्हणो ब्रह्मवर्चसी जायतामस्मिन् राष्ट्रे । राजन्य इषव्यः शूरो महारथो जायतांम् । दोग्ध्री धेनुर्वोढाऽनड्वानाशुः सप्तिः पुरंधिर्योषा जिष्णूरथेष्ठाः । सभेयोयुवा । अस्य यजमानस्य वीरो जायताम् । निकामे निकामे नः पर्जन्यो वर्षतु । फलिन्यो न ओषधयः पच्यन्ताम् । योगक्षेमो नः कल्पताम् ॥

परमात्मन् ! या राष्ट्रांत ब्राह्मणवर्ग तेजस्वी व विद्वान् होवो क्षत्रियवर्ग अचुक निशाणबाज, धाडसी व युद्धकुशल होवो. गाई दुधाळ, बैल बळकट, घोडे चपळ, स्त्रिया पतिव्रता, स्थवर्ग्ये जयिष्णु, तरुण आपल्या विद्वत्तेची व वक्तृत्वाची सभेवर छाप पाडणारे असे होवोत. नागरिकांना सत्पुत्र होवोत योग्य वेळी पाऊस पडो. शेतें उत्तम पिकू देत व आमच्या राष्ट्राचा योगक्षेम उत्तम चालू दे.

वयं शूरेभिरस्तृभिरिंद्र त्वया युजावयम् । सासह्याम पृतन्यतः ॥

ऋ. १।८।४

वयं जयेम त्वया युजा वृतमस्माकमंशमुदवा भरेभरे । अस्मभ्य मिंद्र वरिवः सुगं कृधि प्रशत्रूणा मघवन् वृष्ण्यारुज ॥ ऋ. १।१०२।४

भावार्थ—हे इंद्रा, आम्ही तुझ्या सन्निध राहून आणि अस्त्राचा प्रयोग करणाऱ्या शूर वीरांचे सहवासांत राहून आमच्यावर ससैन्य आक्रमण करणाऱ्या शत्रूचा पराभव करूं. ॥ १ ॥ हे ऐश्वर्यसंपन्न प्रभो, तुझ्या सहवासांत राहून आम्हांभोंवती वेढा घातलेल्या शत्रूवर आम्ही विजय प्राप्त करूं देवा, युद्धामध्यें आमच्या भागाचें तूं रक्षण कर. हे इंद्रा, आमच्याकरितां धन अगदीं सौलभ्यानें मिळेल असें कर. आणि शत्रूचें बल नष्ट होऊन त्याचा नायनाट होईल असें कर. ( सारांश, परमेश्वराची कृपा आम्हांवर व्हावी म्हणजे आमचे शत्रु त्याच्या कृपेनें सर्वस्व पराजित होतील )

ॐ विश्वतश्चक्षुरुत विश्वतोमुखो विश्वतोबाहुरुत विश्वतस्पात् । सं बाहुभ्यां धमति संपतत्रैर्द्यावाभूमी जनयन्देव एकः ॥

ज्या परमेश्वराला सर्व बाजूला डोळे, तोंड, हात, पाय आहेत, ( अर्थात आपण कोणास कांही न कळत कांही केलें तरी ईश्वर तें पहातोच ), जो बाहूपासून स्वर्ग, पायापासून पृथिवी ही उत्पन्न करितो, तो स्वर्ग, पृथिवी इत्यादि सर्व जग उत्पन्न करणारा परमात्मा एकच आहे.

ॐ मयि मेधां मयि प्रजां मयीन्द्र इन्द्रियं दधातु । मयि मेधां मयि प्रजां मय्यग्निस्तेजो दधातु । मयि मेधां मयि प्रजां मयि सूर्यो भ्राजो दधातु ॥

भगवान् इंद्र मला स्मरणशक्ति, मुलेंबाळें आणि इंद्रियसामर्थ्य देवो. भगवान् अग्नि मला स्मरणशक्ति, मुलेंबाळें व विचारशक्ति देवो. भगवान् सूर्य मला स्मरणशक्ति, मुलेंबाळें व तेजस्विता देवो.

ॐ सह नाववतु । सहनौ भुनक्तु । सहवीर्यं करवावहै । तेजस्वि नावधीतमस्तु । मा विद्विषावहै ॥

परमात्मन् ! आम्हां गुरुशिष्यांचें रक्षण कर. दोघांसहि ऐश्वर्य दे. दोघांकडून मोठे पराक्रम होऊं देत. आमचें ज्ञान तेजस्वी रहावें आणि आमच्यामध्यें नित्य प्रेमभाव राहो. हे परमेश्वरा ! सर्वदा शांति असो.

**उपनिषदांचें सामान्य स्वरूप**—वैदिक वाङ्मयाचे एका निराळ्या
दृष्टीनें तीन भाग पडतात. एक कर्मपर, दुसरा स्तुतिपर व तिसरा तत्त्वज्ञान-
पर हे ते तीन भाग होत. कर्मपर व स्तुतिपर भाग यज्ञकर्मांशी संबद्ध आहे
तत्त्वज्ञानाचा विषय हा यज्ञकर्माहून अगदीं स्वतंत्र राहातो तत्त्वज्ञान
उपनिषदामध्यें आहे. आणि हीं उपनिषदें ब्राह्मणग्रंथांतील आहेत. फक्त अपवाद
म्हणून एकच ईशावास्योपनिषद हें संहितेपैकी आहे उपनिषदांतील तत्त्व
ज्ञान जगामध्यें श्रेष्ठ असून त्यात जीव, जगत् व ब्रह्म याचें विवेचन उत्कृष्ट
केलेलें आहे भाषा सोपी, सरळ, बाळबोध असून विषयाची मांडणी प्रश्नोत्तर-
रूपानें केल्यामुळें व मधून मधून संवाद ग्रथित केल्यामुळें विषयाचें आकलन
सौलभ्यानें होतें भाषा सोपी व साधी असली तरी या वाङ्मयांत प्रतिभा व
प्रसंगी काव्यहि भरपूर आहे हें तत्त्वज्ञान जगाला देण्याचें कार्य हिंदूंच्याकडे
आहे. याबद्दल प्रत्येक आर्याला अभिमान व धन्यता वाटेल उपनिषदांचा
बारकाईनें अभ्यास केल्यास त्या वेळीं प्रवृत्ति-निवृत्तीचे विवाद दृष्टोत्पत्तीस
येतात. केवळ प्रवृत्तिपर यज्ञयागांमध्यें पूर्ण गढून स्वर्गकामेच्छू झालेले लोक
जसे आढळतात तसेच जग अनित्य, दु खद, असें म्हणून केवळ तत्त्वज्ञानाच्या
विचारांत मग्न झालेलेहि ऋषि दिसतात यज्ञयाग करणाऱ्यांची निंदा उपनि-
षदामध्यें बरीच दिसते "**प्लवाह्येते अदृढा यज्ञरूपा" अष्टेनैव नीय-
मानायथांधा**" ॥ अशा शब्दप्रयोगांनीं कर्मावर ताशेरे उडविले असून
ज्ञानाची महती अधिक वर्णन केलेली आहे कोणी ज्ञानाचा तर कोणी कर्माचा
पुरस्कार करीत तर जनक व याज्ञवल्क्य हे ज्ञान व कर्म यांच्या समुच्चयाचा
यत्न करीत. जनक राजानें एतदर्थ अनेक सभा भरविल्याचे आधार सापडतात
क्षत्रिय राजांना तत्त्वज्ञानाची आवड बरीच असे राजर्षि जनक व ब्रह्मर्षि
याज्ञवल्क्य यांचे संवाद बृहदारण्यकामध्यें सर्वत्र आहेत त्यांत तत्त्वविचारच
मुख्य आहे. उपनिषदांतील तत्त्वविचार म्हणजेच अध्यात्मज्ञान होय हें अध्यात्म
ज्ञान मोक्षविद्येचें मूळ आहे

**नासदीय सूक्त**—उपनिषदांमध्यें अध्यात्मविद्या जरी असली तथापि उप-
निषदांपूर्वी म्हणजे बऱ्याच प्राचीन काळीं या भरतखंडात अध्यात्मज्ञानाचा
प्रादुर्भाव झालेला होता व तेव्हांपासूनच उपनिषदांतील विचाराची वाढ
झाली आहे सृष्टीचें अगम्य मूलतत्त्व काय ? त्यापासूनच ही नामरूपात्मक

सृष्टि कशी निर्माण झाली असावी याबद्दलचे विचार प्रथम ऋग्वेदातील नासदीय सूक्तामध्यें प्रगट झालेले आहेत. या विचारांसारखे प्रगल्भ, स्वतंत्र व मुळाला हात घालणारे तत्त्वज्ञानाचे विचार दुसऱ्या कोणत्याहि धार्मिक ग्रंथात आढळत नाहींत, इतकेंच नव्हे तर अशा प्रकारें अध्यात्मविचारानें भरलेला याच्याइतका प्राचीन लेख जगात उपलब्ध नाहीं ईशावास्योपनिषद् हें संहितेपैकी असून तें उपनिषदांमध्यें ज्येष्ठ व श्रेष्ठ आहे असें मानण्यात येतें; त्याप्रमाणेंच याचाहि समावेश उपनिषदांमध्यें व्हावयास पाहिजे होता. परंतु तो का झाला नाहीं हें समजत नाही. हें नासदीय सूक्त सर्व उपनिषदांचें उपनिषद आहे यात तिळप्राय संदेह नाहीं. वेदांततत्त्वज्ञान हें उपनिषदांपासून सुरू झालें असें म्हटलें तर वैदिक तत्त्वज्ञान त्यापूर्वी किती उच्च दर्जाला पोंचलें होतें हें या सूक्तावरून समजतें वैदिक तत्त्वज्ञान हें साक्षात् साहितिक तत्त्वज्ञान व वेदान्त तत्त्वज्ञान हें औपनिषद तत्त्वज्ञान असल्यामुळें या दोहोंना जोडणारा मधला दुवा ईशावास्योपनिषद् होय. कारण तो एका बाजूनें संहितेंतील शेवटचा अध्याय आहे, तर दुसऱ्या बाजूनें उपनिषदातील पहिलें उपनिषद् आहे अशा ईशावास्याच्या पलीकडच्या नासदीय सूक्तातील विषय अवलोकन केल्याखेरीज वेदांततत्त्वज्ञानाचाच काय पण जगातील कोणत्याहि तत्त्वज्ञानाचा उलगडा नीट होणार नाहीं. वास्तव वैदिक तत्त्वज्ञानाला भूषणभूत असलेलें हें आद्य सूक्त तत्त्वज्ञानाचा एक नमुना म्हणून येथें भाषांतरासह देतों

मंत्र—नासदासीन्नो सदासीत्तदानीं नासीद्रजो नो व्योमा परो यत्। किमावरीवः कुह कस्य शर्मन्नम्भः किमासीद्गहनं गभीरम् ॥१॥

नासदीय सूक्त ( ऋग्वेद मंडळ १०।१२९ )

भाषांतर —तेव्हां म्हणजे मूळारंभीं असत् नव्हतें आणि सत् हि नव्हतें। अंतरिक्ष नव्हतें आणि त्यापलीकडचें जें आकाश तेंहि नव्हतें। (अशा स्थितींत) कोणी ( कोणाला ) आवरण घातलें ( म्हणावें )? कोठें? कोणाच्या सुखासाठीं! अगाध व गहन पाणी ( तरी ) होतें काय?

मंत्र—न मृत्युरासीदमृतं न तर्हि न रात्र्या अह्न आसीत्प्रकेतः। आनीदवातं स्वधया तदेकं तस्माद्धान्यन्न परः किंचनाऽऽस ॥२॥

**भाषांतर**—तेव्हां मृत्यु म्ह. मृत्युग्रस्त नाशवंत दृश्य सृष्टि नव्हती, व (दुसरा) अमृत म्ह. अविनाशी नित्य पदार्थ (हा भेद) हि नव्हता. तसेंच रात्र आणि दिवस यांचा भेद करण्यास कांहीं साधन (=प्रकेत) नव्हतें. (जें काय होतें) तें एकलें एकच स्वयेंनें म्ह. आपल्या शक्तीनें वायूशिवाय श्वासोच्छ्वास करीत म्ह. स्फुरत होतें त्यांशिवाज किंवा त्यापलीकडे दुसरें असें कांहींच नव्हतें.

**मंत्र.**—तमः आसीत्तमसा गूढमग्रेऽप्रकेतं सलिलं सर्वमा इदम्। तुच्छेनाभ्वपिहितं यदासीत् तपसस्तन्महिनाऽजायतैकम् ॥३॥

**भाषांतर**—अंधकार होता, आरंभी हें सर्व अंधकारानें व्याप्त (आणि) भेदाभेदविरहित पाणी होतें, (किंवा) आभु म्हणजे सर्वव्यापी ब्रह्म (आर भींच) तुच्छानें म्हणजे पोकळमायेनें आच्छादिलेलें होतें, असें (यत्) जें (म्हणतात), तें (तत्) मूळ एक (ब्रह्मच) तपाच्या महिम्यानें (रूपांतरानें पुढें) प्रकट झालेलें होतें.

**मंत्र**—कामस्तदग्रे समवर्तताधि मनसो रेतः प्रथमं यदासीत्। सतो बन्धुमसति निरविन्दन् हृदि प्रतीष्या कवयो मनीषा ॥४॥

**भाषांतर**—(याच्या) मनाचें जें रेत म्हणजे बीज प्रथमतः निघालें तेंच आरंभी काम (म्हणजे सृष्टि निर्माण करण्याची प्रवृत्ति किंवा शक्ति) झाला. विनाशी दृश्य सृष्टीचा (हाच) असतामध्यें म्हणजे मूळ परब्रह्मात रहाता हा. विनाशी दृश्य सृष्टीचा (पहिला) संबंध होय, असें ज्ञात्यांनी अंतःकरणांत विचार करून बुद्धीनें निश्चित केलें आहे.

**मंत्र**—तिरश्चीनो विततो रश्मिरेषाम् अधः स्विदासीदुपरि स्विदासीत्। रेतोधा आसन् महिमान आसन् स्वधा अवस्तात् प्रयतिः परस्तात् ॥ ५ ॥

**भाषांतर**—(हा) रश्मि म्ह. धागा किंवा किरण यांच्या (मध्यें) आडवा पसरला; आणि खाली होता म्हटलें तर वरहि होता (यांच्यांतले कांहीं) रेतोधा म्ह. बीजप्रद झाले, व (वाढून) मोठेहि झाले त्यांचीच स्वशक्ति अलीकडे व प्रयति म्ह. प्रभाव पलीकडे (व्यापून) राहिला

मंत्रः—को अद्धा वेद क इह प्रवोचत् कुत आजाता कुत इयं विसृष्टि। अर्वाग देवा अस्य विसर्जनेनाथ को वेद यत आवभूव ॥६॥

भाषांतरः—( सताचा ) हा विसर्ग म्हणजे पसारा जेथून झाला, किंवा कोठून आला, हें ( यापेक्षां ) प्र म्हणजे विस्तारानें येथें कोण सागणार ? कोण निश्चयात्मक जाणतो ? देवहि या ( सत् सृष्टीच्या ) विसर्गानंतरचे मग ती जेथून निघाली तें कोण जाणणार ?

मंत्रः—इयं विसृष्टिर्यत आवभूव यदि वा दधे यदि वा न दधे। यो अस्याध्यक्षः परमे व्योमन् सो अंग वेद यदि वा न वेद ॥७॥

भाषांतरः—( सताचा ) हा विसर्ग म्हणजे पसारा कशापासून किंवा तो निर्मिला गेला अगर न गेला, तें परम आकाशात असणारा या जगाचा जो अध्यक्ष ( हिरण्यगर्भ ) तो जाणीत असेल, किंवा नसेलहि ! ( कोणी सागावें ? )

**उपसंहार**—येथवर अनेक विषयावरील उतारे भावार्थासह दिले आहेत त्यांवरून वैदिक आर्यांचा स्वभाव प्रवृत्तिपर, जोमदार, उत्साही, आनंदी व पराक्रमी होता असें स्पष्ट दिसतें. जगातील पुरुषार्थाकडे त्यांची वृत्ति होती. ते इंद्र, वरुण इत्यादि देवतापाशी सुदर स्त्रिया, वीरपुत्र व दमदार घोडे मागत. ते स्वत सोमरस पीत, मांसान्न-भक्षण करीत व यज्ञामध्यें देवतानाहि अर्पण करीत. वैदिक आर्यांचें ध्येय स्वर्ग होतें व तेंहि सुख व ऐश्वर्य यांचें भोगण्याचें स्थान होतें आर्यांच्या स्वभावांत निवृत्तीचें बीज मुळींच नव्हतें असें म्हणता येणार नाही. त्या विषयाकडेहि त्यांचें लक्ष होतें. एकंदरीत वैदिक आर्यसंस्कृति आशिष्ट, द्रढिष्ट, बलिष्ट, जयिष्णु, आक्रमशील आणि सत्य, नीति व योग्य ता अनासक्ति यावर अधिष्ठित अशी होती असें म्हणतां येतें.

---

# प्रकरण तिसरें

---

## रामायणकालीन आर्यसंस्कृति

केवळ वैदिक वाङ्मयावरून आर्यसंस्कृतीच्या स्वरूपाची कल्पना काय येते हें दुसऱ्या प्रकरणांत पाहिलें. वैदिक वाङ्मयानंतर (संहितेनंतर) आर्यसंस्कृतीचें यथार्थ स्वरूप दाखविणारा ग्रंथ म्हटला म्हणजे रामायण हा होय रामायणाचा काल हा भारतीय युद्धापूर्वी जातो भारतीय युद्धकाल शकपूर्व ३००० असावा असें अलीकडे अनेक प्रमाणावरून ठरत आहे तेव्हां रामायणकाल हा निदान या कालामागें पांचशें वर्षे जातो. म्हणजे शकपूर्व ३५०० च्या सुमारास सूर्यवंशी राजा श्रीरामचंद्र यांच्या रामराज्याची भरभराट होती असें म्हणतां येतें अर्थात्‌ त्या वेळीं विविध अंगानीं नटलेली आर्यसंस्कृति कशी होती हें रामायणावरून समजतें.

**रामायणाचें स्वरूप**—रामायण हें जगांतील आदिकाव्य असलें तरी तें ऐतिहासिक सत्यानें युक्त आहे वाल्मिकींच्या मुखांतून सहज स्फूर्तीनें बाहेर पडलेलें हें ऐतिहासिक काव्य आर्यसंस्कृतीच्या भालपटलावरील सौभाग्यदर्शक कुंकुमतिलक आहे असें म्हटल्यास अतिशयोक्तिदोष येणार नाहीं या ग्रंथाच्या कर्त्यांचा उल्लेख वाजसनेयी संहितेमध्यें सांपडतो रामायण हा प्राचीन ग्रंथ मूळ या शुद्ध स्वरूपांत आज मिळणें अशक्य आहे आज आपणापुढें असलेला ग्रंथ दोन हजार वर्षांपूर्वीचा असला तरी त्यामध्यें भारतीय युद्धपूर्व संस्कृतीचा बराच भाग आढळतो या ग्रंथाचें काव्य, पुराण व इतिहास असें त्रिदल स्वरूप आहे या ग्रंथाची चिकित्सा आधुनिक विद्वानांनीं पुष्कळ केली असून या ग्रंथांतील उत्तरकाण्डाचा बराच भाग प्रक्षिप्त असल्याचें सिद्ध केलें आहे. प्रक्षिप्त भाग सोडून दिल्यास इतर ग्रंथावरून तत्कालीन संस्कृतीची ढोबळ कल्पना येण्यास कांहीं अडचण पडणार नाहीं

**वैवस्वत मनु**—सूर्यवंशी श्रीरामचंद्राच्या कुळांतील पहिला राजा वैवस्वत मनु हा होय यानेंच धर्मशास्त्र व समाजशास्त्र या विषयींचे निर्बंध घालून दिले त्यांतील कांहीं नियम हल्लींच्या भृगुप्रोक्त मनुस्मृतीमध्यें आहेत साम्प्रतचा

मनुस्मृति हा ग्रंथ व महाभारत ग्रंथ हे समकालीन आहेत. म्हणून भारतामध्ये दिसणाऱ्या लोकस्थितीहून काही वेगळी लोकस्थिति या ग्रंथात नाही. सांस्कृतिकदृष्ट्या मनुस्मृतिग्रंथावरून भारत व रामायण ग्रंथांपेक्षा काही निराळे सांगता येईल असें वाटत नाही, म्हणून मनुस्मृति व आर्यसंस्कृति असें स्वतंत्र प्रकरण देण्याचें कारण नाही. असो. मनु हा मोठा तत्ववेत्ता व प्रतिभावान् राजा होता. त्याने राजा व प्रजा यांकरिता अशी बंधनें घालून दिली की ती सर्व सूर्यवंशी राजांना कल्याणप्रद वाटली. प्रजानुरंजन हें सर्व सूर्यवंशी राजांच्या राजवटींतील एक विशेष लक्षण म्हणून सांगता येईल. याच गुणामुळें सूर्यवंशी राजांची कीर्ति अजरामर होऊन राहिली आहे.

**श्रीरामपूर्वकालीन राजे**—सूर्यवंशी श्रीरामचंद्राच्या पूर्वीच्या काही राजांची नावें ऋग्वेदामध्यें आलेली आहेत. दिवोदास, सुदास, भरत, हर्यश्व, निकुमाध, मांधाता, त्रिशकु, हरिश्चंद्र, हे सूर्यवंशी राजे ऋग्वेदकालीन आहेत. बाहुक, सगर, भगीरथ, नल, रघु, अज या राजांची कीर्ति इतिहासरूपानें अद्याप उज्वल आहे. सूर्यवंशी राजांच्या राजवटीत आर्य हा शब्द सद्गुण-समुच्चयवाचक बनला येवढें सांगितलें म्हणजे त्यांच्या गुणांची कल्पना येईल. सूर्यवंशी राजे व रामराज्य या वेळीं लोकस्थिति कशी होती हें सांगण्यापूर्वी प्रथम रामायणांतील मुख्य नायकाचा परिचय करून देऊन नंतर लोकस्थितीच्या विवेचनाकडे वळू.

**प्रभु रामचंद्रांची योग्यता**—रामायणग्रंथामध्यें वैयक्तिक सद्गुणांची पराकाष्टा आढळते, म्हणून या ग्रंथाला व्यक्तिधर्मांचा उत्कृष्ट आदर्श असें म्हणतां येईल. रामायणांतील प्रत्येक व्यक्तीच्या गुणांचा परिपोष स्वतंत्र व अन्यनिरपेक्ष आहे म्हणून तो परमावधीस पोंचलेला दिसतो. मार्मिक वाचकाला रामायणांत काय सापडणार नाही ? खरा कर्मयोगी कसा असावा, संकटाचे वेळीं थोर लोक कसें वागतात, राजानें प्रजाहितदक्ष कसें असावें, पतिपत्नीचें निर्विषयक प्रेम, गृहस्थाश्रमी मनुष्याचें अनुकरणीय उदाहरण, पितृभक्ति, बंधुप्रेम यांची उत्कटता ही सर्व रामायणांत जशी यावच्चंद्रदिवाकरौ आढळतील तशी अन्यत्र आढळणार नाहीत. रामायणांतील मुख्य नायक जो राम त्याच्या अंगच्या एकेक गुणाचा विचार करू लागल्यास काय सांगावें व काय वगळावें असा प्रश्न पडतो. कारण रामचंद्रामध्यें सर्वच गुण उत्कट असे दिसतात. प्रजानुरंजनी राजा, उद्दाम योद्धा, संकटकाळी न

डगमगणारा साधु पुरुष, कट्टा कर्मयोगी, धर्मनिष्ठ, धैर्याचा महामेरू, पितृभक्त, गुरु शुश्रूषक, सत्यवचनी, मनोनिग्रही, विनयशील, तेजस्वी, शुचिर्भूत, उदार, विद्वान्, प्रज्ञावान्, पौरुषवान् अशी जी विशेषणें लावावीत ती रामाला ततोतत लागू पडतात.

राम या नावाचें महत्त्व त्याच्या गुणामध्येंच आहे. कारण रामचंद्र हा आपल्या अंगच्या गुणानींच सर्वांना वश झाला होता. ज्या ज्या ग्रंथात रामाच्या नावाचा निर्देश आहे, त्या त्या ग्रंथांत त्याच्या गुणाचाहि गौरव केलेला आहे. वाचकानीं रामचरित्राचें रहस्य त्याच्या गुणसमुच्चयात आहे हें ध्यानात ठेवून गुणाचें अनुकरण करण्याचा यत्न करावा धैर्य हा पहिला मोठा सद्‌गुण रामा च्या ठिकाणीं होता. रामचरित्र हें सकटपरंपरेनें भरलेलें आहे. सर्व सकटांना तोंड देण्याचें सामर्थ्य धैर्यामुळेंच उत्पन्न होतें व धैर्य या गुणाचा प्रभाव सकटांतच दृष्टीस पडतो. धर्मपरता हा दुसरा सद्‌गुण रामाच्या चारित्र्यांत धैर्याशीं समिश्र झालेला दिसतो. धर्मपरता हें तत्त्व एकदा स्वीकारलें की त्या योगानें आपत्ति यरचेवर येतात. परंतु त्या सहन करण्याचें सामर्थ्य हें धर्मपरतेमुळेंच येतें. धर्मपरता हा गुण मनाचें समाधान कायम ठेवून उत्साहाची वृद्धि करितो. या गुणाच्या साह्यानें मनाचा खबीरपणा कायम राहिला की आत्मविश्वास उत्पन्न होतो. रामाचे ठिकाणी आत्मविश्वास हा तिसरा सद्‌गुण आढळतो. आत्मविश्वासाचा प्रभाव काही निराळाच असतो त्यायोगें अमुक एक कार्य झटून आपल्याकडून होईल अशी निश्चिती असते याच आत्मबळावर अनेक कार्ये साधून नेतां येतात. पितृभक्ति हा चौथा गुण रामचरित्रांत अनुस्यूत आढळतो पित्याला वचनमुक्त करण्याकरितां रामानें अरण्यवास पत्करिला हा प्रसंग किती हृदयद्रावक होता! अखिल वसुधरच अधिपत्य हातीं येत असता त्यावर लाथ मारून पित्याला सत्यवादी ठरविण्याकरितां त्यानें वनवास स्वीकारला यातच त्याच्या पितृभक्तीची व त्यागवृत्तीची पराकाष्ठा दिसून येते. लोकाच्या अत्यु त्कट प्रेमाचा त्याला पाठिंबा होता; त्याच्या जोरावर सिंहासन पटकावण्याची अपेक्षा त्यानें धरिली नाहीं. तरुण भार्येचा मोह व वनवासांतील दु ख यानीं त्याचें हृदय विदीर्ण केलें नाहीं राज्यवैभवसुखलालसेनें त्याची चित्तवृत्ति क्षुब्ध झाली नाही किंवा कैकेयीच्या भाषणानें त्याला क्रोध आला नाही. रामानें पित्याज्ञा शिरसावद्य करून अल्पवयात बुद्धीला स्थिरता आणण्याजोगा जगातील अनुभव नसतांना जी स्थितप्रज्ञता दाखवून राज्यत्याग केला त्यातच स्वार्थत्यागाचा कळस

आहे. पितृभक्तीप्रमाणें बंधुप्रेम, मैत्री, युद्धकौशल्य, व्यवहारज्ञान, राजकीय धोरण, कौटुंबिक वर्तन, मनुष्यपरीक्षा, वाक्चातुर्य इत्यादि प्रमुख सद्गुण रामचंद्रामध्यें ठिकठिकाणीं ठसठशीतपणें दिसतात. हे सर्व गुण लक्षांत ठेवून तशी कर्तव्यनिष्ठा, तसें धैर्य, तसा अचुक यत्न, तशी चिकाटी, आणि स्थितप्रज्ञता अंगीं येण्याकरिता रामचरित्राचें पुन पुनः मनन करण्यास वाचकांनीं मुळींच आळस करूं नये.

**सीतादेवीचें चारित्र्य**--रामपत्नी सीता हिची योग्यता रामापेक्षा काकणभर अधीकच आहे सीतेचें पतिव्रतापंचकांत स्मरण करण्याचा परिपाठ तिच्या पातिव्रत्य या गुणामुळेंच पडलेला आहे. रामाची सहधर्मचारिणी म्हणून सीतेवर विपत्तींचा भार एकंदरींत अधीक पडला; व तो तिनें सहन केला त्याबद्दल कौतुक वाटतें रामापेक्षा सीतेच्या त्यागाची पायरी वरची आहे. कारण रामाला पित्याला वचनमुक्त करण्याकरिता वनवासाशिवाय गत्यंतर नव्हतें परंतु सीतेची स्थिति तशी नसताना पातिव्रत्याच्या परमोच्च कल्पनेनें तिनें रामाबरोबर अरण्यांत जाण्याची तयारी केली. राम वनांत जाणार हें कळल्यावर त्याजबरोबर आपण वनांत जावें का न जावें असल्या शंकेला तिनें अंतःकरणांत स्थान दिलें नाहीं. वनवासातील कष्टमय राहाणीची तिला जाणीव असताना पतिविरहदुःख असह्य वाटून राम नको म्हणत असताना तिनें अरण्यांत येण्याचा सविनय आग्रह धरिला. संकट आलें कीं तें टाळण्यासाठीं हरप्रयत्न करणें हा मनुष्यस्वभाव आहे. अर्थात् यावेळीं सीतेनें कैकेयीच्या वरप्रदानाच्या बाबतींत असतील तेवढ्या पळवाटा व निघतील तेवढे श्लेष सुचवून अरण्यवास चुकविण्याचा प्रयत्न करावयास पाहिजे होता. परंतु राम व सीता या दोघांच्या भाषणांत असा प्रयत्न दिसून येत नाहीं. उलट मोठमोठ्यांनीं तसे प्रयत्न केले असता ते नाकारून रामानें प्रतिज्ञापालन करण्याचें ठरविलें व त्यास सीतेनें असंमति दर्शविली नाहीं यापेक्षां तिच्या मोठ्या मनाची आणखी साक्ष कोणती ? रामाप्रमाणें सीतेचे ठिकाणीं धैर्य व निर्भयता हे गुण उत्कट तेनें दिसतात. या गुणाच्या साह्यानेंच तिनें रामचंद्राचें पुनर्दर्शन होईपर्यंत रावणाशीं बाणेदारपणाचें वर्तन केलें. रावणाशीं बोलण्याचे सीतेला जेव्हां प्रसंग आले तेव्हां एखाद्या सिंहीप्रमाणें तिनें आवेशानें त्याला उत्तरें देऊन चूप बसविलें आहे. सीतेवर दुःखाचे अनेक अकल्पित प्रसंग आले, त्यापैकींच युद्धानंतर रामाच्या

भेटीस आल्याचा प्रसग होय एक वर्षभर पतिविरहानें झुरत असलेली सीता रामा
ज्या भेटीस येते तोंच त्यानें सर्वांसमक्ष तिचा अपमान केला. तें पाहून लक्ष्मण
व मारुतीसुद्धां संतप्त झाले अशा बिकट प्रसगीं परपुरुषस्पर्शाबद्दल प्रायश्चित्त
म्हणून अग्निप्रवेशाचा उपाय योजून त्या दिव्यातून सीता बाहेर पडली. राव-
णानें कपटानें सीतेचा अपहार केल्यामुळें असहाय्य स्थितीत सीतेला परपुरुष-
स्पर्श झाला; त्याबद्दल सीता दोषास पात्र नव्हती तथापि तिनें रावणाशीं अशी
तीक्ष्ण वागणूक ठेविली होती कीं ती मारुतिरायाचे तोंडून ऐकल्यानतर रामाला
आनद झाला सीतेच्या पावित्र्याविषयीं विनाकारण रामानें शंका घेतल्यामुळें
तिला केवढा धक्का बसला असेल याची कल्पनाच करवत नाहीं. वनातून घरीं
आल्यानतर अशाच कांहीं क्षुल्लक लोकापवादाच्या भयानें रामानें सीतेचा त्याग
केला. तो दु खद प्रसग भयकर होता कारण यावेळी पत्नीनें तिचा त्याग केल्या-
मुळें तिला शारीरिक व मानसिक क्लेश अति झाले पण ते सर्व सहन करून तिनें
लक्ष्मणाबरोबर श्रीरामाला प्रजावात्सल्याविषयी जो निरोप पाठविला तो वाचला
की तिच्या धैर्यशाली मूर्तीपुढें लोटांगण घालावेंसें वाटतें सीतेचें व्यावहारिक
धोरण आणि मनाचें औदार्य हे गुणहि पुष्कळ ठिकाणीं दिसतात. पतिपत्नीं-
मधील वैषयिक प्रेम सयुक्त स्थितींत अबाधित असतें परतु खऱ्या प्रेमाची
परीक्षा वियुक्त स्थितींतच होते. रामानें सीता त्याग करण्यात कठोरपणा दाख-
विला खरा, परतु विषयलपट मनुष्याकडून हें झालें असतें काय ! रामसीतेमध्यें
जे विरहाचे प्रसग आले त्या वेळीं रामाला सीतेचा व सीतेला रामाचा ध्यास
लागला होता हें परस्पर प्रेमाचें द्योतक होय मारुतीला सीतेनें विचारलें कीं
" राम कशाचें चिंतन करीत असतो ? " राम झोपेंतून जागा होताच "हा सीते,
हा सीते" असें म्हणत उठतो असें मारुतीच्या तोंडचें उत्तर एकून सीतेला काय
वाटलें असेल बरें ! सीतेला रामाचा ध्यास कसा लागला होता, ती किती कृश
झाली होती, शोकानें तिचें अत करण कसें होरपळलें होतें हें सर्व मारुतिमुखानें
ऐकतांच रामानें सीतामुक्ततेविषयीं उत्कंठेनें यत्न केला

**लक्ष्मणाचा स्वार्थत्याग:**—लक्ष्मणाचा स्वार्थत्याग या दोघाच्या स्वार्थ
त्यागापेक्षां उच्च कोटीचा ठरतो पित्याचें वचन खरें करण्याकरिता रामाला व
सहधर्मचारिणी म्हणून सीतेला वनात जाणें भाग होतें परतु लक्ष्मणाचा तसा
सबध नसतांना तो अनन्य भ्रातृप्रेमानें दडकारण्यांत जावयास सिद्ध झाला हें

अपूर्व होय. खरी आत्मस्फूर्ति लक्ष्मणाच्या वागणुकींत दिसून येते. नवलाची गोष्ट ही की चौदा वर्षांच्या दीर्घकालीन अवधींत लक्ष्मणाच्या तोंडून त्याग वृत्तीला कमीपणा आणणारे उद्गार पश्चात्तापानें चुकूनहि निघाले नाहींत त्यानें भ्रातृसेवेचें जें असिधाराव्रत एकदां स्वीकारलें तें आजन्म शेवटास नेलें. लक्ष्मण हा रामाचा सहचर होता म्हणून वनवासात सीतारक्षण व इतर कार्ये यांची व्यवस्था करणें हीं कामें लक्ष्मण व्यवस्थित करी त्यामुळें रामाला पुष्कळ सुख झालें. लक्ष्मणाचें रामावर अकृत्रिम प्रेम होतें म्हणूनच पहिल्या मुक्कामावर परत जाण्याविषयीं रामानें सांगताच लक्ष्मणानें "उदकाबाहेर काढलेला मत्स्य जसा जिवंत राहात नाहीं तसें माझें होईल" असें उत्तर दिलें. लक्ष्मणानें रामाची सेवा केली हें सर्वश्रुत आहे परंतु त्यानें रामाला चार दोन प्रसंगीं बोध केला आहे हेंहि विसरतां कामा नये. सीताहरणानंतर राम क्रुद्ध होऊन जग जाळतों म्हणाला, पंपासरोवरावर एकदां राम विषण्ण होऊन बसला, युद्धप्रसंगीं एकदा निराश झाला, त्यावेळीं युक्तिवाद करून रामाला धीर देण्याचें कार्य लक्ष्मणानेंच केलें आहे. लक्ष्मणावर रामाचेंहि दृढ प्रेम होतें. लक्ष्मणाला मूर्छा येऊन समरभूमीवर तो पडला त्यावेळीं लक्ष्मणाच्या गुणांचें गौरवपूर्वक स्मरण करून राम म्हणतो, "शोधू गेलें असतां या मर्त्य लोकांत सीतेसारखी स्त्री मिळणें शक्य आहे. परंतु युद्धनिपुण व मनाचें काम करणारा लक्ष्मणासारखा बंधु मिळणें अशक्य आहे" लक्ष्मणाचें भ्रातृप्रेम संकटसमयीं टिकलें, किंबहुना वृद्धिंगत झालें यांतच त्याच्या चारित्र्यांतील स्वारस्य आहे मितभाषी, पवित्राचरणी, मृदुस्वभावान्, व्यवहारज्ञ अशीं विशेषणें स्वयंसेवक लक्ष्मणाला लाविलेली आहेत.

**भरताचें निरुपम वैराग्य**—राम, सीता व लक्ष्मण यांचे स्वार्थत्याग परमावधीचे आहेत परंतु भरताचा स्वार्थत्याग या सर्वांन्यावर झळकतो कारण वरील तीन व्यक्तींवर अप्रत्यक्ष रीत्या वतव्याची जबाबदारी होतीच. परंतु भयंकर लोकापवाद सोसून पर्ताच्या प्राणाची पर्वा न करितां त्यास वचनांत पकडून जें राज्य कैकेयीनें मिळविलें, त्याचा क्षणभरहि उपभोग न घेण्यांत भरतानें जें वैराग्य प्रगट केलें, त्याच्र जगांत सादृश्य क्वचित्च आढळेल रामसीताप्रभृतींनी कर्तव्य करण्यांत जर कुचराई केला असती तर त्याच्याकडे थोडें तरी गौणत्व आलें असतें. परंतु कर्तव्याविषयीं तसा दृगन्वित संबंध नसतांना भरतानें राज्यलक्ष्मीचा त्याग केला याचें महत्त्व रामापेक्षां अधीक

आहे. मातेनें राज्यवैभवाचें ताट त्याच्यापुढें वाढून ठेविलें होतें; परंतु तें अधर्म व अपकीर्ति यांच्या भयानें त्यानें लाथाडलें व राम येईपर्यंत तो ग्रतस्थ राहिला. भरतानें त्यावेळीं राज्याचा स्वीकार केला असता तर प्रजाजनांनीं अडथळा केला नसता कारण त्याचें वर्तन लोकांशीं रामाप्रमाणेंच होतें, पण राज्यस्वीकाराबरोबरच रामायणाचा संक्षेप झाला असता! भरतानें राज्याचा त्याग करून आपलें व रामाचें चरित्र जगापुढें ठेविलें हे त्याचे महदुपकार आहेत. रामाचा राज्यत्याग सकारण होता, परंतु भरताचा त्याग निष्कारण अतएव अत्यंत महत्त्वाचा आहे. अगात तारुण्य, माता, पिता व प्रजाजन यांची अनुकूलता असतांना सार्वभौम सत्तेवर पाणी सोडण्यांत भरताची धर्मपरता, भ्रातृवात्सल्य व धैर्य या गुणाचा कसोटी लागते या दोन्ही गुणांत भरतानें रामाची बरोबरी केलेली आहे. दोघांवरहि अकल्पित प्रसंग आले व दोघांनीं आपले निश्चय आश्चर्य वाटण्याजोगे एकदम व्यक्त केले. रामाची स्वार्थनिरभिलाषा जशी उज्ज्वल होती तशीच भरतानेंहि दाखविली. तो म्हणाला, "रामा वांचून हें राज्य मला झेपणार नाहीं. व झेपलें तरी धर्मविरुद्ध म्हणून मी त्याचा स्वीकार करणार नाहीं." याच विचारानें भरत रामाकडे गेला व आपलें राज्य आपण येऊन करा अशी त्यानें विनंती केली रामानें पितृवचनाकरितां येणें शक्य नाहीं असें सांगतांच भरतानें रामाज्ञा म्हणून रामाची ठेव या नात्यानेंच राज्यकारभार चालविला. राम येईपर्यंत अयोध्येबाहेर नंदीग्रामीं राज्योपभोगाचा त्याग करून तो तापसवेषानें राहिला यात त्याची त्यागवृत्ति व साधी राहाणी दिसून येते. भरत हा नेहमी साधेपणानें राही म्हणून त्याला चौदा वर्षे व्रतस्थ काढणें मुळींच जड गेलें नाहीं. सूर्यवंशांतील सर्व राजर्षिंच्याना साध्या राहणीचा बाळपणापासून अभ्यास असे हे सर्व राजपुत्र शरयु नदीवर दररोज स्नानास जात असत असें त्यांचें वर्णन आहे. एकंदरींत भरत हा धैर्यवान्, धर्मवेत्ता, सत्यवादी, निर्भीड, जितेंद्रिय, गोड बोलणारा, पराक्रमी, असा होता म्हणूनच त्याची कीर्ति रामाच्या बरोबरीनें झाली आहे

**मारुतिराय**—रामायणांतील पांचवी अतुल पराक्रमी व्यक्ति श्रीमारुतिराय ही होय. सुग्रीवाच्या साहाय्याकरितां रामलक्ष्मणांशीं मैत्री संपादन करणें, येवढेंच कार्य करणें मारुतिरायाला क्रमप्राप्त होतें. परंतु येवढ्या कार्यापेक्षां मारुतिचरित्र हें कितो तरी श्रेष्ठ सेवेनें भरलेलें आहे. मारुतीनें एकदा श्री-

रामाचें सेवकत्व पत्करल्यावर कसल्याहि संकटास त्यानें पाठ दाखविली नाहीं. सीताशुद्धीकरिता शेकडों वानर गेले त्यात मारुतीहि एक होता परंतु इतरा प्रमाणें सुग्रीवाचा बोल न लागेल अशी यावच्छक्य कामगिरी पार पाडावी अशी संकुचित कल्पना मारुतीच्या मनाला शिवली नाहीं. दक्षिणसमुद्रापर्यंत सर्वत्र शोध केल्यावर समुद्रोल्लंघनाचे वेळीं सर्वांनी हातपाय गाळले अशा वेळीं केवळ स्वामिभक्तीनें प्रेरित होऊन समुद्रोल्लंघनाचें धाडस मारुतीनें केलें व राक्षसाच्या भरवस्तीत जाऊन त्यानें आपले प्राण संकटात घातले सीतेचा शोध लागताच मारुतीला परत येण्यास हरकत नव्हती परंतु सांगकामेपणा न स्वीकारितां सीताशुद्धि, तिचें कुशल, तिचा निरोप, लंकेतील स्थिति, रावणाचें बल या सर्वांचा कयास मारुतीनें घेतला आणि अशोक वनिकेचा विध्वंस करून राक्षसाच्या हृदयांत वानरांच्या पराक्रमाबद्दल दहशत बसविली युद्धामध्यें स्वत अखेरपर्यंत पुढाकार घेऊन निरपेक्षपणें रामाची उत्कृष्ट सेवा केली रामायणातील मारुताच्या निर्हेतुक सेवेनिमित्त जो त्याचा राम, लक्ष्मण, सीता याच्याबरोबर जयजयकार होत आहे तो सर्वथा उचितच आहे

**इतर व्यक्तींचा नामनिर्देश**—रामायणांतील मुख्य पंचायतनाचा परिचय झाल्यावर त्या पंचायतनाभोंवती असलेला परिवार संस्कृतीनें कसा होता हें पाहिलें पाहिजे सुमित्रा, कौसल्या, कैकेयी, दशरथ, शत्रुघ्न, इत्यादि व्यक्तींची मानसिक संस्कृति जी रामायणात वर्णिलेली आहे, तीवरून तत्कालीन लोकस्थितीचीहि कल्पना येते समाजाची संस्कृति कशी होती हें पाहण्यास सामाजिक स्थितीचेंच विवेचन केलें पाहिजे. परंतु रामपंचायतन ज्या समाजांत एका काळीं वावरत होतें तो लोकसमाजहि संस्कृतीनें उच्च असलाच पाहिजे. फोटोची पार्श्वभूमिका ( Back-ground ) जितकी उठावदार असते तितका फोटो चांगला खुलतो हीच स्थिति समाजाची आहे समाजांतील कर्त्या व्यक्ति ज्या समाजातून पुढें येतात, त्याची पूर्वपरंपरा चांगली उज्ज्वलच असावी लागते रामायणात वर्णिलेलीं पात्रें किती उच्च कोटीचीं आहेत हें पाहिल्यावर त्या समाजाच्या मनोभूमिकेची कल्पना आपोआप येते परंतु ती अधिक सुस्पष्ट व्हावी म्हणून तत्कालीन सामाजिक स्थितीचाहि थोडासा विचार करू

**सूर्यवंशी राजे व त्यांची प्रजा**—एकदरींत सूर्यवंशी राजाच्या राजवटीमध्यें प्रजेला फार सुख झालें कारण त्यावेळीं प्रजेचें मत विचारांत घेऊन

राज्य करण्याची सर्वोत्कृष्ट पद्धति अयोध्येंत रूढ होती अयोध्येच्या राज्यपद्धतींत सर्वसंमत गोष्ट अमलांत आणावयाचें कार्य राजाकडे ठेविलें होतें अयोध्येच्या राज्यात जी परिषद भरे तिला मांडलिक राजे, प्रजेचे पुढारी व ऋषी उपस्थित राहात असत. अशी एक परिषद रामाला यौवराज्याभिषेक करण्याचे वेळीं दशरथानें बोलाविली होती. अयोध्येची राज्यपद्धति खरीखुरी राजप्रजासत्ताक होती म्हणून राजाला मंत्र्याच्या सल्ल्याशिवाय कांहीं करितां येत नसे सूर्यवंशी राजे हे मोठे प्रजावत्सल होते. प्रजेचें प्रेम संपादन करण्याकरितां ते स्त्रीपुत्रादिकांचा मोह आडवा आला तरी तो बाजूला सारीत राजा कसा असावा, त्याचे अधिकार काय, त्याचीं कर्तव्यें कोणतीं, त्यानें कुणाशीं मसलती कराव्या दासंबंधाचे निर्बंध बनलेले होते. लोकांचा स्वभाव सात्त्विक व कर्तव्यनिष्ठ राहावा व राजानें नेहमीं प्रजावत्सल राहावें म्हणून राजा व प्रजा यांना एका धर्मतत्त्वात गोविलें होतें. रामानें महाप्रस्थान केलें तेव्हा सर्व प्रजा धाय मोकलत त्याचेमागें लागली या उदाहरणावरून त्यांचे संबंध कसे होते याची कल्पना येते राजा व प्रजा यांचा गर्भ व गर्भवती स्त्रीप्रमाणें संबंध असल्यामुळें अराजक स्थितीचा लोकांना कटाळा वाटे. अराजक स्थितींत समाजस्वास्थ्य बिघडून धर्महानी होते, ती न व्हावी म्हणून राजाची स्थापना त्वरित करीत.

**धार्मिक व सामाजिक उत्कर्ष**—सूर्यवंशी राजांच्या राजवटींत धार्मिक, सामाजिक व शैक्षणिक सुधारणादि चांगल्या होत होत्या. यज्ञसंस्थेच्या द्वारें लोकशिक्षणाचें कार्य होई त्यानिमित्त विद्वान् मंडळी एकत्र जमत व धर्म, आचार, नीति, तत्त्वज्ञान या विषयांवर चर्चा करीत. वर्णाश्रमव्यवस्था, संस्कार, व्यवहारधर्म, सामान्यधर्म, विशेषधर्म, आपद्धर्म यांना याच वेळीं स्वरूप आलें. विवाहसंस्था, गुरुगृहवास, शिष्टाचार, सदाचार यांची वाढहि चांगली झाली शिक्षणाचें पवित्र कर्तव्य हें ऋषींच्या हजारों आश्रमांत निस्पृहतेनें होई. या आश्रमात अध्ययनाकरितां नाना देशांचे छात्रगण येत असत. राजपुत्र व सामान्य लोकांचीं मुलें यांचें शिक्षण कडक देखरेखीखालीं एकत्र होत असे गुरुसेवा व पुढें गुरुदक्षिणा यांवर विद्यादान होई. जातिसंस्थेचा त्या वेळीं मागमूसहि नव्हता म्हणून सर्ववर्णीय विद्यार्थी एकत्र एका गुरुजवळ अध्ययन करीत. त्रैवर्णिकांचें सहाध्ययन होई असे स्पष्ट उल्लेख आहेत नि स्पृह ऋषींच्या बाणेदारपणामुळें विद्यार्जन चांगलें होई व त्यांची राजावर एक प्रकारची दरर

असे शिक्षणाला शिस्त होती आणि विचारस्वातंत्र्याला पूर्ण वाव होता. ज्या विचारस्वातंत्र्याबद्दल आज कांहीं लोक प्रौढीनें बोलतात तें विचार व आचरणस्वातंत्र्य रामायणकाळीं होतें, हें सीतात्यागाच्या उदाहरणावरून उघड होतें.

**रामायणकालीन लोकस्थिति**—दशरथ राजा सार्वभौम होता. त्याच्या हाताखालीं अनेक देशांचे मांडलिक राजे होते. ते करभार आणून देत. दशरथ राजाचें जें ऐश्वर्य वर्णिलें आहे तें वाचून सांप्रतच्या दरिद्री वाचकाला अतिशयोक्ति वाटेल. परंतु आजच्या दारिद्र्याच्या चष्म्यानें त्याजकडे न पाहतां पूर्वीच्या भाग्यचक्षूनेंच पाहिलें पाहिजे. अयोध्येचें वर्णन, राजस्त्रियांचीं गृहें, राजपुत्रांचे वाडे, त्यांतील बाहुभूषणें, रत्नमाला, कुंडलें, कड्या, आंगठ्या, रत्नें, रत्नखचित पर्यंक, बहुमोल वस्त्रें, सुवर्ण, हत्ती, घोडे, गाई, धान्यागारें, कोश, पाकशालादि अठरा कारखाने यांच्या माहितीवरून त्या काळीं आर्यसंस्कृति वैभवाच्या शिखरावर आरूढ झाली होती असें म्हणतां येतें. शिबिका, शकट, रथ व नावा हीं वाहतुकीचीं साधनें होतीं. यांच्या साह्यानें दूरदूरच्या देशांशीं व्यापार चाले. राजसत्ता व धर्मसत्ता निराळी नव्हती. राजसत्ता हीच धर्मरक्षणाचें कार्य करी. विशेषतः चातुर्वर्ण्य ही संस्था व चातुर्वर्ण्यवान् राजा असल्यामुळें धर्माचें प्रतिपालन यथायोग्य होई. सर्वच ब्राह्मण तपस्वी नव्हते. पुष्कळ ब्राह्मण कृषि, पौरोहित्य यासारखे व्यवसाय करीत. आचार, संस्कार, प्रायश्चित्त हीं सर्व चातुर्वर्ण्याला पोषक अशीं होतीं. त्यांचें यथासांग अनुष्ठान होई. अतिथिसत्कार चांगला होई. ब्राह्मविधीनें अग्नीच्या साक्षीनें विवाह होई. मैत्री दृढ करण्याला अग्नीची साक्ष लागे. रामायणकालीं वनस्पत्याहार व मांसाहार हे दोन्ही होते. शिल्पशास्त्र, ज्योतिषशास्त्र, हस्तिशिक्षा, धनुर्वेद, चित्रकला, रथचर्या, अश्वारोहण, गजारोहण, गायन, विमान इत्यादि भौतिक शास्त्रांत त्या वेळीं बरीच प्रगति झाली होती. रामायणामध्यें अनेक कारागिरांचे उल्लेख आहेत, त्यांवरून अनेक व्यवसाय त्या काळीं होते यांत शंका नाहीं. सुतार, सूत्रधार, ज्योतिषी, नट, सारथी, पुराणिक, द्वारपाल, गवई, बजवय्ये, व्यापारी, ताल धरणारा, गवळी, आचारी, बुरुड, मजूर, कुंभार, जवाहिऱ्या, बहुरूपी, अकॅस काम करणारा, रत्नांना पैलू पाडणारा, कांचेच्या कुप्या व हस्तिदंती काम करणारा, वैद्य, धोबी, कलाल, न्हावी, नावाडी, कोष्टी, रंगारी, सोनार, इत्यादि धंदेवाले लोक त्यावेळीं होते. यातच राज्यव्यवस्था, लष्कर, शिपाई-

र्व फौजदारी अधिकारसबद्ध असलेल्या व्यवसायांची भर घातली की ही यादी मोठीच होते. राज्याचा भरभराट होती म्हणून हरहुन्नर व कौशल्य यांची वाढ झाली. वस्त्रे विणण्याची विद्या पूर्णत्वास गेली होती. सुतापेक्षा रेशमी तलम वस्त्रे राजे लोक वापरीत. रेशमी वस्त्रास जरीचे काठ असत

पागोटें व दोन वस्त्रें हा पुरुषाचा पोषाक असे स्त्रिया व पुरुष उत्तरीय वस्त्र वापरीत सोनें, चांदी व रत्नें याचे अलंकारहि असत. बाजूबंद, तोरड्या, कुंडलें, मुकुट, बाहुभूषणें, उरोभूषणें, रत्नमाला, हेमसूत्र, कमरपट्टा, आंगठ्या इत्यादि अलंकार त्यावेळी होते. निष्क या नावाचे सोन्याचे नाणें प्रचारांत होते. वैद्यशास्त्र, ज्योतिषशास्त्र व वनस्पतिशास्त्र यांची जी माहिती रामायणांत आढळते, तीवरून हीं शास्त्रें चांगलीच प्रगतीला पोंचली होतीं असें दिसतें. सर्व-सामान्य समाजामध्यें मुद्दा ज्योतिषाचें व वैद्यकाचें ज्ञान बरेंच होतें व्यावहारिक औषधोपचार सर्वांना माहित होते. फलज्योतिष, शकुन, नवस, शुभाशुभ स्वप्नें, शपथ यांच्या कल्पना रामायणांत आढळतात रामायणामध्यें अनेक पशु-पक्ष्यांची नांवें आढळतात उंट, घोडे, बैल, हत्ती यांचा वाहतुकीस उपयोग होई. हत्ती व घोडे यांचा उपयोग युद्ध व मिरवणूक यावेळीं होई. खेटक, ग्राम, पुरी, नगर अशा चार श्रेणी होत्या पुरी व नगर यांच्याजवळ दुर्ग असत नगरांमध्यें तळीं, विहिरी, पुष्करिणी, सरोवरें असत. पिण्याच्या पाण्याची सोय काळजी-पूर्वक केली जाई. मेंढ्या, बकरी, गाई, बैल व इतर पशु यांचा व्यापार नगरांत व परदेशामध्यें होई नगरांमध्ये मंत्री, बल, कोश, सैन्य यासंबधीं कार्यालयें असत व न्यायालयेंहि असत. चतुरंग सैन्य हे युद्धशास्त्रांत मुख्य असे. युद्धाचें मुख्य शस्त्र बाण होतें. शैव, शूलवन्, ऐषिक, ब्राह्म, पैशाक, नारायण, आग्नेय अशीं अनेकविध अस्त्रांची नांवें आहेत विविध बाण मंत्रांनीं अभिमंत्रित करून सोडले की त्यांना अस्त्रें असें संज्ञा प्राप्त होई. मोठमोठे पाषाण फेकण्याचीं यंत्रें किल्ल्यांच्या तटावर ठेवीत. शतघ्नी नांवाच्या तोफाहि होत्या. सर्व प्रकारचीं युद्धसामुग्री रथांतून नेण्यांत येई मोठी आयुधें, तोफा इत्यादि ठेवण्याचे रथ निराळे असत. युद्धप्रसंगाचें चिन्ह म्हणून रथावर ध्वजा असत त्या ध्वजावर कांहीं मूर्ण असे, त्यावरून रथी कोण आहे हें कळे. बाहुयुद्धाची पद्धति होती.

**स्त्रियांची स्थिति**—रामायणकालीं स्त्रियांची स्थिति वैदिक कालापेक्षा कोणत्याहि दृष्टीनें कमी नव्हती अहल्या, सीता, तारा, मंदोदरी या स्त्रीरत्न-

पंचकांतील स्त्रिया या वेळीं विद्यमान होत्या. यांच्याच जोडीच्या कौसल्या, सुमित्रा, अनसूया या स्त्रिया होत्या. कैकेयीसारखी एकादी स्त्री सोडून दिल्यास बाकी सर्व स्त्रियांचें चारित्र्य आदर्शभूत आढळतें. सीतेवर किती तरी संकटें आलीं, परंतु तिचें पातिव्रत्य अगदीं दृढ होतें. पतीनें तिचा एकदां सर्वांसमक्ष अपमान केला व एकदां तर लोकापवादास्तव त्याग केला. तथापि कोणत्याहि स्थितींत तिचें पतीवरील प्रेम कमी झालें नाहीं, ही मोठी महत्त्वाची व आश्चर्याची गोष्ट होय. रामायणामध्यें सीतेप्रमाणें इतर स्त्रियांचीं चरित्रें पुढें आलेलीं नाहींत. तथापि जीं आलीं आहेत त्यांवरून सर्व स्त्रिया त्याकाळीं महान् पतिव्रता होत्या असें म्हणतां येतें.

**स्त्रिया व वेदाध्ययन**--रामायणकालीन स्त्रिया अशिक्षित नव्हत्या. सर्व स्त्रिया घरगुती पद्धतीनें सुसंस्कृत होत होत्या. कारण ऋषींच्या आश्रमांत मुलांप्रमाणें मुलींच्या शिक्षणाची सोय नव्हती. स्त्रिया त्याकाळीं वेदाध्ययन करीत व संध्यादि करीत असत असे उल्लेख रामायणांत आहेत.

**संध्या कालमनाः श्यामा ध्रुवमेष्यति जानकी।**
**नदीं चेमां शुभजलां संध्यार्थे वरवर्णिनी ॥** —५।१४।१९

'संध्या करावयाची वेळ झाली आहे, हें मनांत आणून ती श्रेष्ठ स्त्री जानकी संध्या करण्यासाठीं या निर्मळ पाण्यानें युक्त असलेल्या नदीवर खात्रीनें येईल.'

**ततः स्वस्त्ययनं कृत्वा मंत्रवित् विजयैषिणी।** —४।१६।१२

'आपला पति जो वाली त्याला जय प्राप्त व्हावा म्हणून त्या मंत्रवेत्या तारेनें त्याचें स्वस्त्ययन केलें.' यावरून स्त्रियांचीं उपनयनें होत व त्या वेदवेत्या असत असें सिद्ध होतें. पुरुषांप्रमाणें स्त्रियांच्या शिक्षणाची स्वतंत्र सोय नव्हती. म्हणून त्यावेळीं एकंदरींत विदुषी स्त्रिया कमी दिसतात. तथापि सुसंस्कृतता व नीतिमत्ता या क्षेत्रांत त्या फार श्रेष्ठ होत्या यांत संदेह नाहीं.

**सहगमन**—रामायणकालीं स्त्रियांना पडदा होता असें दिसत नाहीं व त्या अगदीं उघडपणें वावरत असेंहि दिसत नाहीं. युद्ध, संकट, विपत्ति, लग्नसमारंभ, उत्सव व यज्ञ इत्यादि प्रसंगीं स्त्रियांनीं समाजांत येण्यास हरकत नव्हती. अर्थात् अशा वेळीं स्त्री-पुरुष समाज एकत्र जमत असे. परस्त्रीकडे पाहूं नये असा निषेध शास्त्रांत आहे. पण त्याला वरील प्रसंग हे अपवाद.

होत पतीच्या पश्चात् जिवत राहाणें अशक्य व अनुचित अशी स्त्रियांची समजूत होती म्हणून त्या पतीबरोबर सहगमन करीत असत पतीमागें जिवत राहून आपलें आयुष्य परोपकारार्थ व ईशसेवेंत घालविण्याचा दुसरा मार्गहि त्या काळीं धर्मसंमत होता परंतु या पुण्यसंपादनाच्या मार्गापेक्षा पतिव्रतांना सहगमनच प्रिय वाटे.

**दासींची चाल**—सांप्रत रूढ नसलेली दास व दासी यांच्या दानाची चाल त्या वेळीं होती. रामानें वनांत निघतेवेळीं जीं अनेक दानें केलीं त्यांत कित्येक ब्राह्मणांना दास व दासी यांचीं दानें केल्याचें वर्णन आहे यजमानाचें हित रक्षण करण्यांत हा दासदासींचा वर्ग कसा तत्पर असे हें मंथरेच्या चरित्रावरून उघड होतें दासीचें दान म्हणजे तिला पोस णारा यजमान बदलणें येवढाच अर्थ दिसतो अशा काहीं चाली असल्या तरी स्त्रियांची योग्यता पुरुषांबरोबरीची आहे असा समज रूढ होता. राम वनांत निघतेवेळीं रामाचे अभावीं त्याचा आत्मा स्त्री म्हणजे सीता हिला राज्या भिषेक करावा अशी कल्पना वसिष्ठांनीं सुचविली आहे

आत्मा हि दारा सर्वेषां दारसंग्रहवर्तिनाम् ।
आत्मेयमिति रामस्य पालयिष्यति मेदिनीम् ॥ —२।३७।२४

इत्यादि कल्पनांवरून रामायणकालीं स्त्रियांचें स्थान तत्कालीन समाजांत फार वरच्या तऱ्हेचें होतें असें म्हणण्यास अडचण वाटत नाहीं

**उपसंहार**—याप्रमाणें रामायणकालीन लोकांची राजकीय धार्मिक, आणि सामाजिक संस्कृति होती लोकांचे व्यवसाय धर्मनिष्ठा, आचार, त्यांच्या सम जुती व चालीरीति यांचें यथार्थ ज्ञान याप्रमाणें रामायणावरून होतें रामायण ग्रंथाचें सूक्ष्म विवेचन करण्याचें हें स्थळ नव्हे म्हणून अगदीं त्रोटक माहिती दिली आहे रामायणांत ज्यांचे संबंध आले आहेत असे वानर व राक्षस हे दुसरे समाज होत यांची संस्कृति व लोकस्थिति कशी होती हें सुद्धां पाहाण्यासारखें आहे मनुष्यसमाजाची स्थिति येथवर दाखविली आहे अर्थात् तिच्या जवळ जवळ कांहीं अपवाद सोडून वानरसमाजाची स्थिति होती राक्षससमाज सर सोडून चालून आसुरी संपत्तीचाच भोक्ता होता त्या समाजाच्या संस्कृतीचा आर्यसंस्कृतीवर अनिष्ट परिणाम होऊं नये म्हणूनच राम-रावण युद्ध झालें व राक्षससंस्कृतीचा नाश झाला रामायणावरून त्या कालच्या संस्कृतीचा आढावा घेतल्यावर महाभारतामध्यें आर्यसंस्कृतीचें स्वरूप कसें दिसतें हें आतां पाहू.

# प्रकरण ४ थें

---

## भारतकालीन आर्यसंस्कृति

**भारताची श्रेष्ठता**—गेल्या प्रकरणांत रामायणकालीन आर्यसंस्कृतीचें स्वरूप किती वरच्या पायरीचें होतें हें आपण पाहिलें. रामायणानंतर महाभारत या ग्रंथावरून आर्यसंस्कृतीचें स्वरूप कसें दिसतें हें आतां पाहिलें पाहिजे. महाभारत हा ग्रंथ व्यास महर्षींनी जगदोद्धारार्थ लिहिला. या ग्रंथाची संस्कृत भाषा सोपी असून त्यामध्यें संस्कृत भाषेचें जिवंत स्वरूप आढळतें. एक लक्ष श्लोकांच एवढा मोठा विस्तृत ग्रंथ संस्कृत भाषेवाचून अन्य भाषेत नाहीं. या ग्रंथात चतुर्विध पुरुषार्थांचें प्रतिपादन केलें असून सर्व स्त्री-पुरुषांना कर्तव्याचा मार्ग निश्चित व सुस्पष्ट दाखविला आहे. वेदाच्या खालोखाल महाभारताची ऐतिहासिक दृष्टया योग्यता आहे. या ग्रंथात धर्म, तत्वज्ञान, व्यवहार, राजनीति इत्यादि विषयाविषयीं इतकें विस्तृत विवेचन आहे कीं त्यावरून 'व्यासोच्छिष्टं जगत्त्रय' अशी म्हण पडलेली आहे.

यदिहास्ति तदन्यत्र यन्नेहास्ति न तत् क्वचित् ।

अशी या ग्रंथाची योग्यता असून हा ग्रंथ एकंदर संस्कृत वाङ्मयास आधारभूत आहे. या ग्रंथाबद्दल प्रत्येक भारतीय आर्यांची अतिशय पूज्यबुद्धि आहे.

सूर्यवंशातील काहीं राजांची नांवें जशी ऋग्वेदामध्यें आढळतात तशीच सोमवंशीय राजांचींहि नांवें ठिकठिकाणी येतात. त्यावरून चंद्रवंशीय काहीं राजे हे वेदसमकालीन असावेत असें दिसतें. महाभारतकाळीं कुरुक्षेत्रांत कौरव, गंगेच्या किनारीं पंचाल, यमुनेच्या किनाऱ्यावर यदु, शूरसेनी व भोज, यमुनेच्या दक्षिणेस चेदि, अवंति भागांत भोज अशी सोमवंशी क्षत्रिय घराणीं अस्तित्वांत होती. या सर्व क्षत्रिय घराण्यांतील कर्त्या पुरुषांच्या हालचालींचा संक्षेप महाभारतांत आलेला आहे. हा ग्रंथ प्रथमतः व्यासांनी निर्माण केला. त्याचें पहिलें नांव 'जय' असें होतें. या ग्रंथाचें भारत वैशंपायनांनीं बनविलें व भारताचें महाभारत हें पुढें सौतीनें केलें असा या ग्रंथाचा इतिहास आहे. रामायणाप्रमाणें महाभारतांतहि पुष्कळच भाग प्रक्षिप्त असावा असा विद्वानां

समज आहे इतका प्राचीन व इतका विस्तृत ग्रंथ आज बव्हंशीं मूळच्या शुद्ध स्वरूपांत पाहावयास मिळणें कठीण आहे. तथापि हा ग्रंथ म्हणजे तत्कालीन आर्यसंस्कृतीचा एक इतिहास असें म्हणण्यास हरकत नाहीं

**भारतीय युद्धाचा काळ**--महाभारत हा ग्रंथ भारतीय युद्धानंतरचा आहे यांत संशय नाहीं. हें मोठें युद्ध झाल्यानंतर थोडक्याच दिवसांत हा ग्रंथ लिहिला गेला आहे भारतीय युद्धकाल म्हणजे आर्यसंस्कृतीच्या वैभवाचा माध्यान्हकाळ होय. वेदकालापासून भारतीय युद्धापर्यंत व भारतीय युद्धापासून पाणिनीकालापर्यंत आर्यसंस्कृतीची उत्कर्षस्थिति दिसत या उत्कर्षकालाचा मध्य भारतीय युद्ध हा असून या युद्धकालासंबधीं विद्वानांमध्यें अद्याप एकवाक्यता नाहीं हें युद्ध शकपूर्व ३१०० या सुमारास झालें असें एक मत आहे तर दुसरें शकपूर्व दोन हजारच्या सुमारास हें युद्ध झालें असें मत आहे. तिसरें एक मत हें युद्ध शकपूर्व दीड हजार या सुमारास झालें असें असून प्रत्येक मतांत हजार पांचशें वर्षांचें अंतर आहे त्यामुळें हा काल निश्चित ठरत नाहीं व्याकरणकार पाणिनीचा काल खिस्तपूर्व आठशें वर्षे हा असून ऋग्वेद संहितेचा काल खिस्तपूर्व चार हजार वर्षांच्याही पलीकडे आहे ऋग्वेद संहितेपासून पाणिनीपर्यंत जो तीन चार हजार वर्षांचा काळ आहे, त्याचा मध्य भारतीय युद्धकाल असावा अशी आमची समजूत आहे. इतक्या प्राचीन कालची संस्कृति महाभारतग्रंथांत पाहावयास सांपडते. या ग्रंथाचीं जरी अनेक संस्करणें झालेलीं असलीं तरी मूळच्या संस्कृतीचा बराचसा भाग या ग्रंथांत आहे असें म्हणतां येईल

**रामायण व भारत यांची तुलना**—रामायण व भारत हे दोन्ही ग्रंथ भारतीय आर्यांना सूर्यचंद्राप्रमाणें पूज्य आहेत हे ग्रंथ ऐतिहासिक आहेत तथापि वाल्मीकि व व्यास या दोन ग्रंथकर्त्यांची भूमिका अगदीं भिन्न भिन्न आहे वाल्मीकीचें उद्दिष्ट वैयक्तिक सद्‌गुणांचा सर्वोत्कृष्ट आदर्श वाचकांपुढें ठेवणें हें आहे. म्हणून तेथें प्रत्येक व्यक्तीच्या गुणांची पराकाष्ठा अन्यनिरपेक्ष अशीच दाखविली आहे परंतु व्यासांना भारतांत हें दाखवावयाचें नव्हतें. समाजसापेक्ष, कुटुंबसापेक्ष अर्थात् अन्यसापेक्ष तत्त्वनिष्ठा साक्षात् व्यवहारांत किती राहूं शकेल हें व्यासांना दाखवावयाचें होतें म्हणून महाभारतांतील नायकांच्या भूमिका व्यासांनीं तशा रंगविल्या आहेत धर्म, द्रौपदी,

भीम, अर्जुन, कुंती यांची धर्मनिष्ठा व धर्मपरता राम, सीता, लक्ष्मण, भरत, सुमित्रा यांच्यापेक्षा कमी होती असें आपणांस केव्हांहि म्हणतां येणार नाहीं. धर्मराजाला स्वत पुरत सत्त्वगुणाचें व सत्यनिष्ठेचें कितीहि प्रेम असलें तरी त्याचा परिणाम माता, पत्नि, बंधु व पुत्र यांच्यावर काय होईल याचा विचार टाळणें अशक्य होतें. म्हणून त्याच्या वर्तनाला मर्यादा येऊन बसली. अशी मर्यादा आखून दिल्यावर कोणत्याहि सद्गुणाची मजल त्या मर्यादेच्या पलीकडे जाऊ शकत नाहीं समाजात वावरणाऱ्या व्यक्तीला आपलें वर्तन अन्यसापेक्ष ठेवावें लागतें. सामाजिक व व्यावहारिक बंधनें पाळून आपला व्यवहार किती नमुनेदार व किती उच्च कोटीचा करितां येईल हें **महाभारत** ग्रंथात दाखविलेलें आहे. हा ग्रंथ व्यवहार, समाज व नीति यांचा बोध करणारा असल्यामुळें त्यांत अनेक प्रसंग असे वर्णिले आहेत कीं; एका वेळीं एका कर्तव्याचा दुसऱ्या कर्तव्याशीं विरोध यावा, आणि कर्माकर्मविचिकित्सा उत्पन्न होऊन एखाद्या व्यक्तीकडून घडलेल्या आचरणाबद्दल संशय उत्पन्न व्हावा! परंतु रामायणांत हे प्रसंग नाहींत त्याचें कारण त्या ग्रंथाचा हेतु भिन्न आहे रामायण व भारत या ग्रंथाच्या हेतूमध्यें फरक असल्यामुळें रामाची सत्यनिष्ठा धर्माच्या सत्यनिष्ठेपेक्षा जाज्वल्य दिसते याचें कारण धर्माला आपल्या सत्यनिष्ठेचा परिणाम समाजावर काय होईल याचा विचार करावयाचा होता. पण रामाला या विषयीं कांहींच कर्तव्य नव्हतें. द्रौपदी व सीता या दोघींची पतिनिष्ठा सारखीच होती. परंतु एकाला आपलें व्रतच पाळावयाचें होतें तर दुसरीला पताबद्दल आदर ठेवून त्याच्या असावधपणानें झालेल्या चुकाबद्दल त्याला सावध करून दुर्धर प्रसंगांतून बाहेर पडण्याबद्दल सारखी टोचणी करावयाची होती लक्ष्मणाला भ्रातृआज्ञा प्रमाण होती तशीच ती भीमालाहि होती. पण आपण होऊन ओढून घेतलेल्या आपत्तीचें मूळ धर्मराजाच्या भोळसटपणात आहे हें पाहून भीम धर्माचे हात जाळण्यास तयार झाला. सारांश, भारताचा उद्देश व पर्यवसान हीं रामायणाहून भिन्न असल्यामुळें त्यात अनेक कथा, उपकथा, आख्यानें, उपाख्यानें ग्रंथकर्त्यांनीं सांगितलेलीं आहेत कर्त्या पुरुषाच्या उलाढाली, धोरणें, राजकारण, धर्मकारण, सावधानता, महती या सर्वांचा दरवें महाभारतात दाखविलीं आहेत. म्हणजे मानवी अंत करणात जेवढे कांहीं विकार व विचाराचे तरंग असतील ते सर्व कार्यरूपानें दाखविलेले आहेत. महाभार-

तांतील अन्यसापेक्ष कृत्याची शास्त्रशुद्ध लागती लावण्याकरितां गीता या ग्रंथाचा अवतार झाला आहे गीता हें कर्मयोगाचें, कार्याकार्यविचिकित्सेचें व कर्तव्याकर्तव्यविवेकाचें शास्त्र महाभारतांत अवतरलें, यावरून्च त्या वेळचा व्यवहार किती जटिल, वादग्रस्त व गुतागुतीचा झालेला होता हें दिसून येतें.

**गीतेचा अल्प परिचय**—श्रीमद्भगवद्गीता हा संस्कृत वाङ्मयातील कोहिनूर हिरा आहे प्रत्यक्ष भगवताच्या तोंडचे उद्गार सोप्या व स्फूर्तिदायक भाषेत सांगितले असल्यामुळें गीता हा प्रगल्भ व प्रासादिक ग्रंथ झालेला आहे. श्रीमद्भगवद्गीता ही युद्धाच्या प्रारंभीं कथन केला असून ती महाभारतांत आहे, हेंच तिचें वैशिष्ट्य आहे. कर्मयोगशास्त्राचा हा प्रधान ग्रंथ असून त्यांत सांख्य, योग, वेदांत व भक्ति हे विषय कर्मयोगाला पोषक म्हणून आलेले आहेत गीता ही व्यक्तिनिष्ठ नसून तत्त्वनिष्ठ आहे अमुक एक ग्रंथ, अमुक एक देव, अमुक एक साधु मानावा असें गीता सांगत नसून इष्ट देवतेच्या भक्तीत अहेतुकता व जें कर्म चांगलें करितां येईल, त्यांत निष्कामता पाहिजे असें गीतेचें म्हणणें आहे. पाहिजे त्या देवतेची निर्हेतुक उपासना करण्यास सांगणारा आणि पाहिजे तें कर्म निष्कामबुद्धीनें करण्याची आज्ञा करणारा हा जगातील पहिलाच ग्रंथ आहे. आपापलें कर्तव्य ईश्वरार्पणबुद्धीनें करावें, परमेश्वराची आज्ञा आहे, प्रेरणा आहे, अशा उत्साहानें फलावर नजर न ठेवता करावें, असें सांगणारा व मनुष्याचा उत्साह आणि धैर्य ही टिकवून कर्तव्याचा योग्य मार्ग दाखविणारा हा ग्रंथ आहे

गीतेंत कर्म व ज्ञान यांचा समुच्चय आहे म्हणून पूर्वमीमांसा व उत्तरमीमांसा यांना गीतेंत स्थान आहे गीतेंतील तत्त्वज्ञान हें वैदिक तत्त्वज्ञान असल्यामुळें तिनें द्वैताद्वैताचा उत्तम मेळ घातला असून निर्द्वंद्वाचें विवेचनहि उत्तम केलें आहे. गीतेनें गृहस्थाश्रमाला गौण ठरविलें नसून कर्मफलाचा न धरितां जो कर्म करितो तो सन्यासी व योगी होय असें म्हटलें आहे गीतेच्या काळीं जे कोणी कर्माच्या एका टोंकाला गेले होते व जे ज्ञानाच्या दुसऱ्या टोंकाला गेले होते, त्या दोघांना एका केंद्राकडे खेंचून कर्मठाला ज्ञान व ज्ञानठाला कर्म लावण्याचें महत्कार्य गीतेनें केलें हें कार्य साधण्याकरितां गीतेनें कोणाच्या आड न येणारी एक भक्ति उत्पन्न केली म्हणून गीतेची लोकप्रि

युक्तिशुद्ध व न्यायशुद्ध आहे. गीतेचें ब्रह्मनिर्वाण हें वैदिक निर्द्वंद्वतत्त्वज्ञानाला धरून आहे.

जगामध्यें प्रवृत्तिनिवृत्तींचीं आंदोलनें चक्रनेमिक्रमानें होत असतात. निवृत्तीचा किंवा प्रवृत्तीचा अतिरेक झाला कीं समाजाचा अपकर्ष होतो असा नियम आहे. हा अतिरेक टाळून प्रवृत्तिनिवृत्तींचें योग्य सेवन कसें करावें, तसेंच अहिंसा, सत्य, अस्तेय इत्यादि गुणाच्या अतिरेकानें धर्मापेक्षा अधर्मच घडतो म्हणून कसें वागावें, अनेक कर्तव्यें एका काली दत्त म्हणून पुढें उभी राहिलीं तर त्यांत श्रेयस्कर जें असेल तेंच कसें करावें, याचा मार्गदर्शक गीता ग्रंथ आहे. गीता ग्रंथाची शिकवण जोंवर समाजात सुरली होती, तोंवर त्याचा उत्कर्ष होता; पण गीताशास्त्राच्या सिद्धांताकडे व उपदेशाकडे जेव्हांपासून दुर्लक्ष होऊं लागलें तेव्हांपासून आर्यसंस्कृतीचा अपकर्ष होऊं लागला असें विचारांतीं सिद्ध होतें. पण हें विवेचन प्रस्तुत कर्तव्य नसल्यामुळें महाभारतावरून तत्कालीन परिस्थितीची व आर्यसंस्कृतीच्या विविध अंगांची कशी स्थिती होती तें पाहूं.

**भारतीय वैद्यशास्त्र**–भारतकालीं आयुर्वेद्यक चांगल्या स्थितींत होतें. चरक, अगस्ति, जाजली, काशिराजा, धन्वंतरी यांच्यासारखे राजे व ऋषि या शास्त्रांत चांगले निष्णात होते. पुढील काळच्या ग्रंथामध्यें व त्यांवरील टीकाग्रंथामध्यें वरील वैद्यशास्त्रवेत्त्यांनीं लिहिलेल्या ग्रंथांचे उल्लेख आलेले आहेत.

**नागलोक**—नाग लोकांचा संबंध भारतांत आलेला आहे. हे खांडव वनांत राहात होते. तें जाळून त्यांचें उच्चाटन करण्याचा यत्न अर्जुनानें केल्यामुळें तक्षकाचें व त्याचें वाकडें पडलें, तक्षकाचें पारिपत्य अर्जुन करूं शकला नाहीं. भारतीय युद्धांत अश्वसेन नाग कर्णाकडे गेला होता. पण त्याच्या मदतीचा विशेष उपयोग झाला नाहीं. हे नाग लोक शापाप्रमाणें दावा धरणारे होते. म्हणूनच तक्षकानें परिक्षितीच्या महालांत शिरून त्याचा खून केला. त्याचा सूड घेण्याकरितां जनमेजयानें नागराजधानी तक्षशिला ही जिंकून सर्पसत्र आरंभिलें. तेव्हां भयभीत होऊन तक्षक इंद्राच्या आश्रयास गेला. जनमेजयाचा कोपानल आस्तिक ऋषीनें नागांची तरफदारी करून शांत केला. तथापि त्यांना उत्तरेकडे राहणें अशक्य होऊन ते दक्षिणेंत आले. नाग व आर्य यांचे विवाहसंबंध होत होते. जरत्-

**सैन्य व युद्ध**—सैन्यांतील शिपायांना पगार किंवा धान्य नक्त देत असत रणांत मेलेल्या वीरांच्या कुटुंबांच्या पोषणाची तजवीज राजाकडून होई चतुरंग सेना म्हणजे रथ, हत्ती, घोडदळ, पायदळ असें असे लढतां लढतां हाताघाईवर युद्ध आलें म्हणजे घोडेस्वार एकमेकांस घोड्यावरून खालीं पाडीत हिमालयाच्या आसपासचे लोक हत्तींच्या युद्धांत, मथुरेकडील लोक बाहूंच्या युद्धांत व दक्षिणेंतील लोक तरवार चालविण्यांत कुशल असत मोठमोठे मल्ल हत्तींच्या पोटाखालीं चपलतेनें घुसून त्यास बुक्या मारून त्यांचा प्राण घाबरा करीत हत्तींशीं झुजणारे मल्ल त्याकाळीं प्रसिद्ध होते. त्यावेळचा रथी म्हणजे हल्लींचा मुख्य सेनापती होय शस्त्रास्त्रांत धनुष्य व बाण यांचा नंबर पहिला होता. धनुर्विद्येचा अभ्यास फार होत असे अर्जुनानें रात्रंदिवस या विद्येचा अभ्यास केला होता. अस्त्रें किंवा शक्ति ही अभिमंत्रण करून शत्रूवर फेकीत असत अस्त्राचा उपसंहार करण्याचें सामर्थ्य अस्त्र टाकणाराच्या ठिकाणी असे हल्लीं रथाचीं चक्रें चित्रांमध्यें चार दाखवितात. परंतु त्यास त्या वेळीं दोनच चाकें असत त्यावेळचे धर्मयुद्धाचे नियम हल्लींच्या काळीं युद्धांत पाळण्यासारखेच आहेत. विमानांतूनही शत्रूवर स्वाऱ्या करीत असत सैन्याची रचना निरनिराळ्या व्यूहांमध्यें करीत. पत्ति, सेनामुख, गुल्म, वाहिनी, पृतना, चमू, अनीकिनी, अक्षौहिणी असे चढत्याचढत्या संख्येचे सेनावाचक शब्द होते, सैन्याबरोबर बाजार बुणगेही असत

केलेली असे व्याजाचा दर शेंकडा १ रुपाया होता शिल्पशास्त्र म्हणजे बांधकाम हें परशियन अर्थात् असुर लोक चांगलें करीत.

**राजकीय स्थिति**—महाभारतकाळीं दिल्लीनजीक कुरु, कनोजाजवळ पांचाल, अयोध्येजवळ कौसल, पेशावराजवळ गांधार, पंजाबांत मद्र, मध्यहिंदुस्थानांत अवंती, पूर्व समुद्राच्या किनाऱ्यावर उत्कल, कलिंग, आंध्र, चोल, द्रविड व दक्षिणेंत केरल, कर्नाटक अशीं अनेक लहान मोठीं राज्यें होतीं राजसत्ता जरी होती तरी प्रजेचें मत विचारांत घेण्यांत येई. युधिष्ठिरानें युद्धानंतर ब्राह्मणाच्या व राजे लोकांच्या अनुमतीनें अभिषेक करून घेतला होता. तथापि एकंदरीत राजसत्ताक राज्यपद्धतीकडेच लोकांचा कल होता इतर राजांना जिंकून मांडलिक करून साम्राज्य स्थापन करण्याचा कल्पना आणि महत्त्वाकांक्षा सर्व राजांस असे. राजसूय यज्ञ करून सम्राट् पदवी मिळे इतर राजांचीं राज्यें खालसा करण्यांत येत नसत. मुलगा नसेल तर मुलीला किंवा तिच्या मुलाला राज्याभिषेक करण्यांत येई $\frac{1}{6}$ भाग प्रजेनें राजास द्यावा व राजानें प्रजेचें संरक्षण करावें, अशा तऱ्हेचा राजा आणि प्रजा यांच्यामध्यें निर्बंध झालेला होता धर्मबंधनामुळें राजाला अनियंत्रित अधिकार गाजविण्यास वाव नसे. अराजकत्वाचे दुष्ट परिणाम कसे भोवतात याची जाणीव लोकांना चांगली असल्यामुळें ते दुष्ट राजाचा जुलमही सहन करण्यास तयार असत. बृहस्पतिनीतिशास्त्र म्हणजे राजकारणशास्त्र आहे. त्यांत धर्म, नीति, दंड, षाड्गुण्य, साम, दाम, दंड, भेद, अमात्य, राष्ट्र, दुर्ग, बल, कोश, रथ, गज, अश्व, पदाति, नौका, चार, शत्रु मित्र, उदासीन, युद्ध, वाद्य, ध्वनि, अशा अनेक विषयांचें इतकें सांगोपांग विवेचन आहे कीं, तें अर्वाचीन सुधारलेल्या राजकारणशास्त्रासही शोभावें आणि चिंतनीय असें आहे. सभापर्वांतील कच्चित् प्रश्नावरून राजा व प्रजा यांचा संबंध आणि मुलकी कारभार इत्यादींची माहिती मिळते. जमीनीची मोजणी, अरण्य, अबकारी, वेठबिगार, दिंड, आणि कर, यांसंबंधाचे नियम अमलांत होते. ग्रामरचना चोरीत होत्या. सोटें बहुधा आपापसांतच होईल पण, निष्क, दीनार अशीं नाणीं व्यवहारांत होतीं. परराष्ट्राशीं वागण्याचे नियमही ठरलेले होते लोकांचें राज्यावर अहर्निश प्रेम असे. भीष्म, श्रीकृष्ण आणि धर्मराज यांचें वर्तन आणि राजकारण ज्ञाताग आदर्शभूत असें आहे

**सैन्य व युद्ध**—सैन्यांतील शिपायांना पगार किंवा धान्य नक्त देत असत त्यांत सेनेच्या वीरांच्या कुटुंबांच्या पोषणाची तजवीज राजाकडून होई चतुरंग सेना म्हणजे रथ, हत्ती, घोडदळ, पायदळ असें असे लढतां लढतां हातघाईवर युद्ध आलें म्हणजे घोडेस्वार एकमेकांस घोड्यावरून खालीं पाडीत हिमालयाच्या आसपासचे लोक हत्तींच्या युद्धांत, मथुरेकडील लोक बाहूंच्या युद्धात व दक्षिणेंतील लोक तरवार चालविण्यांत कुशल असत मोठमोठे मल्ल हत्तींच्या पोटाखालीं चपलतेनें घुसून त्यास बुक्क्या मारून त्याचा प्राण घाबरा करीत हत्तीशीं झुंजणारे मल्ल त्याकाळीं प्रसिद्ध होते. त्यावेळचा रथी म्हणजे हल्लींचा मुख्य सेनापती होय शस्त्रास्त्रांत धनुष्य व बाण यांचा नंबर पहिला होता. धनुर्विद्येचा अभ्यास फार होत असे अर्जुनानें रात्रंदिवस या विद्येचा अभ्यास केला होता. अस्त्रें किंवा शक्ति ही अभिमंत्रण करून शत्रूवर फेंकीत असत अस्त्राचा उपसंहार करण्याचें सामर्थ्य अस्त्र टाकणाराच्या ठिकाणीं असे हल्ली रथाचीं चक्रें चित्रांमध्यें चार दाखवितात. परंतु रथास त्या वेळीं दोनच चाकें असत त्यावेळचे धर्मयुद्धाचे नियम हल्लींच्या काळीं सुद्धां वाखाणण्यासारखेच आहेत. विमानांतूनही शत्रूवर स्वाऱ्या करीत असत सैन्याची रचना निरनिराळ्या व्यूहांमध्यें करीत. पत्ति, सेनामुख, गुल्म, वाहिनी, पृतना, चमू, अनीकिनी, अक्षौहिणी असे चढत्याचढत्या संख्येचे सेनावाचक शब्द होते, सैन्याबरोबर बाजार बुणगेही असत

**समाजव्यवस्था**—महाभारतकाळीं चातुर्वर्ण्यव्यवस्था होती ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र हे चार वर्ण असून त्यांचे धंदेहि ठरलेले होते ही वर्णव्यवस्था जन्म, कर्म, गुण व रंग यांचा विचार घेऊन केलेली होती वरच्या वर्णांस खालच्या वर्णांतील स्त्रियाशीं लग्नें लाविशी येत असत प्रतिलोम संकराबद्दल कडक निर्बंध होते. कारण संकराची भीति आर्यांना वाटे. यावेळीं ब्राम्हणांची योग्यता मोठी होती शांति, दया, दान, सत्य, तप, धर्म हीं ब्राह्मणाचीं लक्षणें सांगण्यांत येत प्रत्येक वर्णाचीं लक्षणें बहुतेक निरपवाद असत ब्राह्मणवर्णाचे गुण ब्राह्मणांत, क्षत्रियांचे गुण क्षत्रियांत स्वभावसिद्ध असले पाहिजेत अशी आर्यांची समजूत होती. सत्यकाम जाबालाच्या उदाहरणावरून ब्राह्मणाच्या सत्यवादित्वाविषयीं किती उदात्त कल्पना होती याचें प्रत्यंतर येतें वर्णसंकर म्हणजे स्वभावसंकर असें समजून आर्य संकराचा निषेध करीत. पठणपाठण, सपत्याग,

इंद्रियदमन या गुणांमुळें ब्राह्मणाबद्दल आदर असे. सदाचरण व तप यांत कांही विलक्षण सामर्थ्य आहे अशी समजूत होती. कण्वऋषींच्या आश्रमाचें जें आदिपर्वांत वर्णन आहे, त्यावरून ब्राम्हणसमाजाच्या राहणीची कल्पना येते वसिष्ठाचें ब्रह्मतेज पाहून विश्वामित्रानें " धिग्बलं क्षत्रियबलं ब्रह्मतेजो बलं बलम् " असे उद्गार काढले. ब्राम्हणाचा मुख्य धंदा अध्ययन अध्यापनाचा होता ब्राह्मण वेदाबरोबर इतर विद्या, कला व शास्त्रें यांचाहि व्यासंग करीत निरनिराळ्या वर्णांच्या धंद्यास लागणाऱ्या सर्व विद्या ब्राम्हण शिकत व त्या सर्व वर्णांना शिकवीत. विद्यादानाचें महत्त्वाचें काम ब्राह्मणांनीं आपल्या शिरावर घेतलेलें होतें कैकेय राजा म्हणतो 'माझ्या राज्यात अविद्वान् व यज्ञ शील नसलेला एकहि ब्राह्मण नाहीं' ( शांतिपर्व अ. ७६ ) यावरून अग्नि ठेवून यजन करणारे गृहस्थाश्रमी ब्राम्हण त्या काळीं बहुतेक होते असें दिसतें. अध्यापन, प्रतिग्रह व याजन यांवर ब्राम्हणाची उपजीविका चाले. द्रोणाचार्य कौरवांना धनुर्विद्या शिकवीत होते, हें इतर वर्णांस त्या त्या वर्णांची विद्या शिकवीत असत याबद्दलचें प्रसिद्ध उदाहरण आहे. पुजारी, ज्योतिषी, पुरोहित, मंत्री, दूत, वार्ताहर, इत्यादि धंदे ब्राम्हण करीत राष्ट्रामध्यें ब्राह्मण चोरी करू लागला म्हणजे तो राजाचा अपराध मानीत. आपत्कालीं वरच्या वर्णांनीं खालच्या वर्णांचे धंदे करण्यास शास्त्राची परवानगी होती. क्षत्रियांचा मुख्य धंदा म्हणजे

न्मला होते असा कल्पना दिसतात. तथापि महाभारतकाळीं जातिनिर्बंध कडक होते. चार वर्ण जन्मसिद्ध आहेत अशीच समजूत होती. तथापि जन्माला प्राधान्य नाहीं, शील व सद्गुणांवरच वर्णभेद अवलंबून आहे, असेंहि उल्लेख भारतांत ३।४ ठिकाणीं आहेत. त्यांच्या बाहेर लग्न व जातीच्या बाहेरचा धंदा करूं नये असा कडक निर्बंध होता संकरजातींचे उत्पत्तिसिद्ध विविध धंदे महाभारतांत सांगितले आहेत

**गोत्र, प्रवर व शिक्षण**—जातिसंस्थेशीं संबद्ध असा गोत्राचा विषय आहे. मूळचीं आंगिरा, कश्यप, वसिष्ठ, भृगु अशीं चार गोत्रें होतीं, त्यापासून पुढें अन्य गोत्रें उत्पन्न झालीं त्रैवर्णिकामध्ये गोत्रपरंपरा रूढ होती वर्णव्यवस्थेप्रमाणें आश्रमव्यवस्था ही एक धर्माची बाबच गणली गेली होती. गृहस्थाश्रम हा मुख्य आश्रम असे या आश्रमांत अध्यापन, अग्निसेवा व मातापितृसेवा हीं मुख्य कर्मे चालत. ब्रह्मचर्याश्रमांत विद्यार्जन करावें लागे, क्षत्रिय वैश्यांचीं मुलें विद्यार्जनास्तव गुरुगृहीं जात असत किंवा नाहीं हें भारतावरून स्पष्ट समजत नाहीं तथापि त्रैवर्णिकांना शिकलेंच पाहिजे असा नियम वर्णव्यवस्थेंत दिसतो. भिक्षा मागून गुरुसेवा करून विद्यार्जन करावें लागे. उपनयन व समावर्तन या संस्कारांना मोठें उदात्त व पवित्र स्वरूप होतें गुरुशुश्रूषेवांचून विद्या मिळत नाहीं असा समज होता गुरु हे शिष्यांची चांगली कमोगी पहात असत. विद्यादान मोफत असे. वेदाशिवाय अन्य विद्या शिकण्याकरितां शूद्र विद्यार्थी गुरुगृहीं जात असत अध्ययन संपल्यावर गुरुदक्षिणा सामान्यतः दोन गाई देण्यांत येत असे एका गुरूच्या गृहीं पांच पन्नास विद्यार्थी असावेत परंतु कण्वकुलपतीच्या आश्रमासारख्या ठिकाणी पुष्कळच विद्यार्थी असले पाहिजेत असें दिसतें कलाकौशल्याचें शिक्षण व धनुर्शिक्षण हें कारागिरांना राजाश्रयानें मिळत असे.

**भारतीय स्त्रियांची स्थिति**—भारतांतील अनेक कथांवरून व उदाहरणावरून आर्यस्त्रियांच्या पातिव्रत्याविषयीं उत्कट कल्पना आढळतात. "प्राणाऽऽर्यस्वभावानां पतिरेकोऽपि दैवतम्" ( आर्यस्त्रियांचे पति हेंच दैवत ) अशी समजूत त्या वेळीं होती. सावित्रीचें आख्यान म्हणजे पातिव्रत्यधर्माचा मूर्तिमंत आदर्श होय. पातिव्रत्याच्या उच्च कल्पनेमुळें नियोगाची चाल बंद पडली असावी व पुनर्विवाहावरही निषेध पातिव्रत्याच्या उच्च कल्पनामुळेंच झाला असावा.

भारतकाळीं त्रैवर्णिकांशिवाय इतर स्त्रियांमध्यें पुनर्विवाह रूढ होता स्त्रिया विवाहाच्या वेळीं प्रौढ असत विवाहाचे दिवशीं पतिपत्नींचा समागम होण्याची चाल होती. स्वयंवर व गांधर्व विवाह हे त्या वेळीं होत असत. त्यावरून स्त्रियांचीं लग्नें प्रौढपणींच होत हें स्पष्ट होतें !

**एकपत्नीधर्माचा अभाव**—पतिव्रताधर्माच्या उच्च कल्पना जशा भारतीय आर्यांत होत्या तशा एकपत्नीव्रताच्या नव्हत्या. एका पुरुषास अनेक स्त्रिया करितां येतात ही कल्पना त्या वेळीं व्यवहारात होती. धर्माशिवाय इतर चार पांडवांना द्रौपदीव्यतिरिक्त कित्येक स्त्रिया होत्या. श्रीकृष्णाला आठ पट्टराण्या असून हजारों असंख्य स्त्रिया होत्या. दुर्योधन, दुःशासन प्रभृतींना अनेक स्त्रिया होत्या. स्त्रीपर्वामध्यें त्यांच्या शोकाचें वर्णन आलेलें आहे. एकंदरींत अनेक स्त्रिया असणें हें मोठें भूषण असें त्या वेळीं समजलें जाई. विवाहाचे ब्राह्म, क्षात्र, दैव, प्राजापत्य, गांधर्व, आसुर, राक्षस व पैशाच हे आठ प्रकार रूढ होते. स्त्रियांना स्वातंत्र्य होतें. त्यांच्याविषयीं कुटुंबांत आदर वसत असे

**द्रौपदीचें चारित्र्य**—भारतीय स्त्रियांपैकीं मुख्य नायिका द्रौपदी घेतली तर तिच्या चरित्रावरून इतर स्त्रियांची योग्यता कळण्याजोगी आहे. द्रौपदी विवाहकाळीं प्रौढ होती. स्वयंवरसमयीं ती निर्भयपणें वागली. द्यूतप्रसंगीं तिनें धैर्य सर्वच सोडिलें नाहीं तिला धर्मशास्त्राची माहिती होती. ती ब्रह्मवादिनी व पंडिता होती पतींबरोबर वनवासांत ती निःशंकपणानें गेली. राजकीय व सामाजिक विषयांवर तिनें पतींशीं अनेक वेळां चर्चा केली. तप व तेज यांच्या योगानें तिनें अज्ञातवासांत आपलें वर्तन बाणेदारपणाचें ठेविलें. युद्धांत जय मिळाल्यावर पतींना राज्य करण्याविषयीं प्रोत्साहन दिलें. पातिव्रत्याच्या उच्च कल्पनेनें पतिपत्नींचें नातें अभेद्य समजलें जाई असें द्रौपदीचें चरित्र सांगतें.

भारतीय स्त्रियांचें समाजांत स्थान कसें होतें हें समजण्यास द्रौपदी, दमयन्ती, सीता, कुन्ती, विदुला, गार्गी, मैत्रेयी यांचीं चरित्रें हीं प्रमाणें होत. हीं चरित्रें इसवीसनपूर्व विस्तारलेलीं असावीं तथापि त्यावरून हि बरेच पुरावे सांपडतात. सांप्रत उपलब्ध असलेल्या हारितधर्मसूत्रामध्यें ब्रह्मवादिनी स्त्रियांचा उल्लेख आहे. द्रौपदी व सत्यभामा यांचा जो संवाद वनपर्वांत आला आहे, तो तत्कालीन परिस्थितीचा आदर्शच होय. द्रौपदी सत्यभामेला सांगते कीं, " मी घरांतील सर्व कारभार पाहातें, उत्कृष्ट भाजी पाहतें, चांगला स्वयंपाक करतें, वेळचे वेळीं जेवावयास

वाढतें, गोवाऱ्यांपासून तों वरच्या सर्व नोकरावर देखरेख ठेवितें, राज्याचा आय व्यय व संचय सर्व मीच पाहातें, देवधर्म, हव्यकव्य हीं सर्व उपाध्याकडून करवून घेतें " यावरून घरात गृहपतीचें काम ½ होतें तर गृहपत्नीचें काम ½ होतें असें सिद्ध होतें. गृहाची स्वामिनी हीच मोठी तिच्यांचून घर नाहीं व घरावांचून समाज नाहीं माता, गृहिणी व पतिव्रता या सर्व नात्यानीं स्त्रिया घरामध्यें व समाजामध्यें वावरत आणि समाजामध्यें स्त्रीदाक्षिण्यही विशेष असे.

**सहगमन**—पातिव्रत्याच्या उच्च कल्पनेची साथ म्हणजे स्त्रियांचें सहगमन होय. महाभारतांत पाडूबरोबर माद्री सती गेल्याचें वर्णन आहे तसेंच श्रीकृष्णाच्या कित्येक स्त्रिया इद्रप्रस्थात सती गेल्याचे उल्लेख आहेत. त्यांवरून सतीची चाल त्या वेळीं होती असें म्हणता येतें

**अनेक पति करण्याची चाल**—एका पुरुषानें अनेक स्त्रिया करण्याची चाल भारतकाळीं होती. परतु एका स्त्रीनें अनेक पति करण्याची चाल फक्त चद्रवंशी आर्यांत होती, असें द्रौपदीच्या उदाहरणावरून म्हणता येतें ही चाल अद्याप हिमालयातील पहाडी लोकात रूढ आहे. या चालीचा विशेष असा कीं अनेक पति एकाच कुटुबातील सख्खे भाऊ असत द्रौपदीनें पाच पति कसे केले असा प्रश्न भारतात आला आहे त्याचें उत्तर भारतकारांनीं कांहीं समाधानकारक दिलेलें नाहीं. धर्मानें तोंडीं पूर्वकाळीं असे विवाह होत असत त्याची दोनतीन उदाहरणें घातली आहेत पण तें समर्थन लगडेंच दिसतें.

**पडदा**—भारतांतील क्षत्रिय स्त्रियांचीं वर्णनें वाचली तर क्षत्रिय राजांच्या स्त्रिया पडद्याशिवाय नि शकपणें वावरत असत व उत्सवसमारंभामध्यें भाग घेत असें म्हणतां येतें. पण इतर कांहीं भागावरून त्या वेळीं स्त्रियांना पडदा होता निदान त्या काळीं त्याचा प्रारभ झाला होता असें अनुमान संभवतें

**स्त्रीशिक्षण**—महाभारतकाळीं उच्चवर्णी स्त्रियांना शिक्षण देण्याची वहिवाट होती त्यांना लिहिता वाचता येत होतें यांत संशय नाहीं द्रौपदीचें वर्णन '**प्रिया च दर्शनीया च पडिता च पतिव्रता**' असें (वनपर्व अ २७)केलेलें आहे हें शिक्षण घरगुती पद्धतीनेंच मिळे स्त्रियांकरिता शिक्षणाची स्वतंत्र सोय होती असें दिसत नाहीं. ' पित्याच्या जवळ असताना एका ऋषीकडून मी अमुक ऐकिलें तमुक ऐकिलें ' असें द्रौपदी संवादप्रसंगीं म्हणते. त्यावरून वृद्ध, आप्त, येणारे जाणारे, अतिथि, ऋषि यांच्याकडूनच शिक्षण मिळत असावं

स्त्रियाना सहधर्मचारिणी या नात्याने वैदिक कर्मांचा अधिकार होता. परंतु वेदविद्या त्या शिकत असें कुठें वचन आढळत नाही. लिहिणें, वाचणें, पाठ करणें, गोष्टी सांगणें, धर्मकृत्याची माहिती असणें, याशिवाय गायन, वादन, नर्तन इत्यादि विद्या स्त्रीयांना शिकवीत असत. विराटकन्या उत्तरा हिला या विद्या शिकविण्याकरिता बृहन्नडेला नेमिलें होतें. त्यावरून श्रीमंत व राजेरजवाडे लोक आपल्या कन्याना हें शिक्षण घरीं देत असत असें दिसतें. मात्र या कामीं क्लीब शिक्षक नेमण्यांत येत.

**स्त्रियांचे पोषाख व अलंकार**—स्त्रिया उंची उंची दोन वस्त्रें वापरीत. एक नेसावयाचें वस्त्र व दुसरें खांद्यावरून पांघरण्याचें वस्त्र असे. चोळी व कासोटा घालण्याची चाल नसावी. उत्तरेकडील लहंग्याच्या पद्धतीचें नेसणें असे. डोक्यावर पदर घेण्याची चाल होती. स्त्रिया वेणी घालीत व भांग काढीत असत. विशिष्ट तऱ्हेच्या केशांच्या रचनेला 'सीमंत' म्हणत असत. विधवावपनाची चाल नव्हती. विधवा स्त्रिया केशरजनादि वर्ज करीत. एकंदरीत स्त्रियांचा पोषाख सुबक, नीटस, व्यवस्थित व साधा असे. भारतीय स्त्रिया अगावर विविध तऱ्हेचे बहुमोल अलकार घालीत असत. सुवर्ण, मोतीं, रत्नें यांचें वैपुल्य त्या काळीं होतें. मोती व रत्नें यांचे हार गळ्याभोंवतीं घालीत. केयूर व अंगद हीं बाहुभूषणें होतीं. पट्टराणीचे अलंकार सामान्य स्त्रियांपेक्षा निराळे असत. पायांत नूपुरें, कबरेंत पट्टा व गळ्यांत हार इतके अलंकार अगदीं सामान्य स्त्रीसुद्धा वापरीत असे. कानांमध्यें काहीं लोंबतें दागिने असत. परंतु नथेचा उल्लेख मिळत नाही. स्त्रियांचें विनय हें मोठें भूषण असे. त्या वडील माणसांचा मान राखीत असत व त्याकडून आशी र्वाद मिळवीत.

**भूगोल, ज्योतिष व वाङ्मय**—महाभारतांत सप्तद्वीपांचें वर्णन आलेलें आहे. जंबुद्वीपांतील अनेक देशांची माहिती आणि धर्मराजाचे चार बंधु दिग्विजयार्थ चोहों दिशांना गेले असतांना त्यांना लागलेल्या विविध देशांची, नगरांची, तीर्थांची, डोंगरांची, नद्यांची जी माहिती दिली आहे, तीवरून तत्कालीन भूगोलाची कल्पना येते. भीष्मपर्व अ. ९ मध्यें सुमारें १६० नद्यांचीं नांवें दिलेलीं आहेत. महाभारतांत एकंदर सुमारें तीनशें देशांच्या नांवांचा उल्लेख आहे. भारतकाळीं ज्योतिषशास्त्राची वाढ बरीच झालेली होती. नक्षत्रें,

महिने, वार, अयनें, ऋतु, युग, कल्प, व इतर इत्यादि विषयांबद्दल भारतीय आर्यांचे विचार निश्चित झालेले होते. ग्रहांच्या कल्पना व त्यांची फळें यांचे ठोकताळे ठरलेले होते. भारतकाळीं प्राकृत भाषांचा उद्भव झालेला नव्हता. संस्कृत भाषा हीच या काळांत बोलली जात असावी. सभोंवतालच्या अनार्यांच्या म्लेच्छ भाषाही बोलण्यांत येऊन त्या भाषांतील शब्द संस्कृत भाषेमध्यें घुसत होते. विदुरानें युधिष्ठिरास लाक्षागृहाविषयी म्लेच्छ भाषेत भाषण करूनच सुचविलें आहे. वेदवेदांगें, इतिहासपुराण, न्याय, धर्मशास्त्र, नीति व इतर सर्व वाङ्मय संस्कृतांतच प्रचलित होतें.

**तत्त्वज्ञान व मतमतान्तरें**—महाभारतकाळीं धर्म, नीति व तत्त्वज्ञान यांची वाढ बरीच झाली होती. स्नान, संध्या, होम, हवन, शिव, विष्णु, दत्तात्रय, दुर्गा इत्यादि देवतांचें पूजन, श्राद्धपक्ष, हव्यकव्य, दान, जप, सामान्य धर्म, विशेषधर्म, आचार, व्यवहार, व प्रायश्चित्तधर्म, षोडश संस्कार, स्वर्गनरकादि कल्पना हे विषय लोकांच्या व्यापक धर्मकल्पनांमध्यें अंतर्भूत झालेले होते. यांशिवाय वेदांततत्त्वज्ञानाचीही पुष्कळ वाढ झाली होती. जीव, जगत्, आत्मा, पंचमहाभूतें, पंचज्ञानेंद्रियें, पंचकर्मेंद्रियें, सांख्याचीं चोवीस तत्त्वें, परमेश्वराचें स्वरूप, आत्म्याचें स्वरूप, पुनर्जन्म, लिंगदेह, कर्मवाद, आत्मस्वातंत्र्य व साक्षात्कार इत्यादि गहन विषयांची चिकित्सा पुष्कळच झालेली दिसते. महाभारतांत पुष्कळ ठिकाणीं वेदांततत्त्वज्ञान व तदनुषंगिक इतर विषय यांचा ऊहापोह आलेला आहे. वेदांत तत्त्वज्ञानाशिवाय सांख्यतत्त्व ज्ञानाचा संबंध यांतेंतच पुष्कळ ठिकाणीं आलेला आहे. सांख्यतत्त्वज्ञानाशिवाय पातञ्जलयोग, पांचरात्रमत, चतुर्व्यूहकल्पना, पाशुपतमत इत्यादि भिन्न मतांची चर्चा आलेली आहे. नरनारायण, विष्णु, शंकर, या देवता, कैलास, वैकुंठ यांचें वर्णन हे विषयहि महाभारतांत आलेले आहेत. भारतांतील भूषणभूत जें गीताशास्त्र त्यावरून समाजाच्या परमोच्च स्थितीची कल्पना येते. भारतांतील श्रेष्ठ पुरुषांच्या उज्ज्वलशीलें शास्त्रशुद्ध विवेचन करणारा कर्मयोगशास्त्राचा मुख्य ग्रंथ जो गीता त्याचा उपदेष्टा जो भगवान् श्रीकृष्ण त्याचें थोडें चरित्र देऊन हें प्रकरण आटपतें घेतों.

**भगवान् श्रीकृष्ण**—भारतीय युद्धाच्या वेळीं यदुकुलोत्पन्न भगवान् श्रीकृष्ण ८३ वर्षांचे होते. १८ व्या वर्षी त्यांनीं कंसवध केला. २५ व्या

वर्षी रुक्मिणीशीं विवाह केला. ६८ व्या वर्षी राजसूय यज्ञाच्या वेळीं अग्र पूजेचा मान मिळविला. भारतीय युद्धाच्या वेळीं त्यानीं जीं राजकारणें केलीं तीं भारतात प्रथित आहेतच. सूर्यवंशातील रामचंद्राप्रमाणें यदुकुलोत्पन्न श्री कृष्णाचें चरित्रहि अत्यंत उदात्त व निर्मळ असें आहे. भारतीय युद्धाचा हा काळ म्हणजे भरतखंडाचा भरभराटीचा काळ होय नर्मदेपलीकडचा सर्व प्रांत आर्यांनीं यावेळी व्यापिला होता तसेंच दक्षिणेंत माहिष्मति, करवीर, वनवासी व रत्नपूर इकडेही आर्यांनीं राज्यें स्थापिलीं होतीं देश सुपीक व सपाट, अन्न रुचकर व सकस, हवा निरोगी आणि उत्साहवर्धक अशी असल्यामुळें आणि पुरुषाना वाटेल तितकीं लग्नें करण्याची मुभा असल्यामुळें प्रजा हां हां म्हणता वाढली म्हणून पृथ्वीला झालेला भार नाहींसा करण्याकरितां आपसात यादवी सुरु झाली. श्रीकृष्णानीं हा भूभार कमी केला दुर्योधनाच्या मानी, लोभी व महत्त्वाकांक्षी स्वभावावरून आर्यांच्या स्वभावाची परीक्षा होते अशा त्यांच्या स्वभावाचा दुष्परिणाम दिसू लागताच बुद्धि, पराक्रम आणि क्षिप्रकारित्व यांनीं सत्याची बाजू सभाळण्यास श्रीकृष्ण पुढें आले. केवळ प्रवृत्तिपरायण झालेल्या समाजास निवृत्तीचा धडा देणें आणि भलत्याच निवृत्तीच्या पुरांत वाहून जाणाऱ्याना योग्य दिशा दाखविणें असें दुहेरी काम श्रीकृष्णांना करावयाचें होतें. प्रवृत्ति-निवृत्तीचे हेलकावे कोणत्याही समाजास खावेच लागतात. भारतीय युद्धकाळीं श्रीकृष्णांनीं समाजाला मध्य बिंदूत आणून सोडलें श्रीकृष्णांवर जे मलभलते आरोप आहेत ते सर्व खोटे आहेत. खऱ्या सन्यासाचा उपदेश करणारा, कर्माकर्मविवेक प्रतिपादन करणारा, दुष्टाचा शास्ता, सुष्टांचा सहाय्य कारी, स्त्री, शूद्र, अत्यजादिकास मोक्ष दाखविणारा, स्वसुखनिरभिलासानें जगास स्वार्गत्यागाचा धडा घालून देणारा, नाना प्रकारच्या तात्त्विक सिद्धातांचें मंथन करून तें लोकांपुढें मांडणारा हा **आर्य वीर जगद्वंद्य** होय.

भारतीय संस्कृतीची कल्पना येथवर दिलेल्या माहितीवरून येइल. भारतीय युद्धानंतर आर्यसंस्कृतीमध्यें कसकशी स्थित्यतरें झालीं व त्यातच तिच्या अपकर्षाचीं बीजें कशीं पेरलीं गेलीं याचें विवेचन पुढील प्रकरणात करूं.

---

# चौथ्या प्रकरणाची पुरवणी

## स्त्रियांचें समाजांत स्थान

भारतीय आर्यांचे स्त्रियांविषयींचे विचार किती उदात्त होते, हें अधीक सुस्पष्ट व्हावें म्हणून मनु व दक्षस्मृतींतील वचनें भारतांतील कांहीं वचनांसह त्यांचा भावार्थ देऊन येथें पुरवणीरूपानें जोडतों. श्लोक साधे व सोपे आहेत म्हणून वाचकांनी पठणार्थ त्यांचा उपयोग केल्यास उत्तम होईल.

### मनुस्मृति

यत्र नार्यस्तु पूज्यंते रमंते तत्र देवताः । अ. ३
यत्रैतास्तु न पूज्यंते सर्वास्तत्राफलाः क्रियाः ।। ५६ ।।
शोचंति जामयो यत्र विनश्यत्याशु तत्कुलम् । अ. ३
न शोचंति तु यत्रैता वर्धते तद्धि सर्वदा ।। ५७ ।।
जामयो यानि गेहानि शपंत्यप्रतिपूजिताः । अ. ३
तानि कृत्याहतानीव विनश्यंति समंततः ।। ५८ ।।
तस्मादेताः सदा पूज्या भूषणाच्छादनाशनैः । अ. ३
भूतिकामैर्नरैर्नित्यं सत्कारेषूत्सवेषु च ।। ५९ ।।
संतुष्टो भार्यया भर्ता भर्त्रा भार्या तथैव च । अ. ३
यस्मिन्नेव कुले नित्यं कल्याणं तत्र वै ध्रुवम् ।। ६० ।।
यदि हि स्त्री न रोचेत पुमांसं न प्रमोदयेत् । अ. ३
अप्रमोदात्पुनः पुंसः प्रजनं न प्रवर्तते ।। ६१ ।।
स्त्रियां तु रोचमानायां सर्वं तद्रोचते कुलम् । अ. ३
तस्यां त्वरोचमानायां सर्वमेव न रोचते ।। ६२ ।।
अस्वतंत्राः स्त्रियः कार्याः पुरुषैः स्वैर्दिवानिशम् । अ. ९
विषयेषु च सज्जन्त्यः संस्थाप्या आत्मनो वशे ।। २ ।।
पिता रक्षति कौमारे भर्ता रक्षति यौवने । अ. ९

रक्षंति स्थविरे पुत्रा न स्त्री स्वातंत्र्यमर्हति ॥ ३ ॥
सूक्ष्मेभ्योऽपि प्रसंगेभ्यः स्त्रियो रक्ष्या विशेषतः । अ. ९
द्वयोर्हि कुलयोः शोकमावहेयुररक्षिताः ॥ ५ ॥
पतिर्भार्यां संप्रविश्य गर्भो भूत्वेह जायते । अ. ९
जायायास्तद्धि जायात्वं यदस्यां जायते पुनः ॥ ८ ॥
अर्थस्य संग्रहे चैनां व्यये चैव नियोजयेत् । अ. ९
शौचे धर्मेऽन्नपक्त्यां च पारिणाह्यस्य वेक्षणे ॥ ११ ॥
यादृशं भजते हि स्त्री सुतं सूते तथा विधम् । अ. ९
तस्मात्प्रजाविशुध्यर्थं स्त्रियं रक्षेत् प्रयत्नतः ॥ ९ ॥
शय्यासनमलंकारं कामं क्रोधमनार्जवम् । अ. ९
द्रोहभावं कुचर्यां च स्त्रीभ्यो मनुरकल्पयत् ॥ १७ ॥
यादृग्गुणेन भर्त्रा स्त्री संयुज्येत यथाविधि । अ. ९
तादृग्गुणा सा भवति समुद्रेणेव निम्नगा ॥ २२ ॥
प्रजनार्थं महाभागाः पूजार्हा गृहदीप्तयः । अ. ९
स्त्रियः श्रियश्च गेहेषु न विशेषोऽस्ति कश्चन ॥ २६ ॥
उत्पादनमपत्यस्य जातस्य परिपालनम् । अ. ९
प्रत्यहं लोकयात्रायाः प्रत्यक्षं स्त्रीनिबंधनम् ॥ २७ ॥
अपत्यं धर्मकार्याणि शुश्रूषा रतिरुत्तमा । अ. ९
दाराधीनस्तथा स्वर्गः पितॄणा मात्मनश्च ह ॥ २८ ॥
आच्छाद्य चार्चयित्वा च श्रुतिशीलवते स्वयम् । अ. ३
आहूय दानं कन्याया ब्राह्मो धर्मः प्रकीर्तितः ॥ २७ ॥
सहोभौ चरतां धर्ममिति वाचानुभाष्य च । अ. ३
कन्याप्रदानमभ्यर्च्य प्राजापत्यो विधिः स्मृतः ॥ ३० ॥

दक्षस्मृति अ. ४

गृहाश्रमात्परं नास्ति यदि भार्या वशानुगा ।
तया धर्मार्थकामानां त्रिवर्गफलमश्नुते ॥ १ ॥

अनुकूला न वाग्दुष्टा दक्षा साध्वी प्रियवदा ।
आत्मगुप्ता स्वामिभक्ता देवता सा न मानुषी ॥ ३ ॥
अनुकूलकलत्रस्य स्वर्गस्तस्य न सशय ।
प्रतिकूलकलत्रस्य नरको नात्र सशय ॥ ४ ॥
स्वर्गेऽपि दुर्लभ ह्येतदनुराग परस्परम् ॥ ५ ॥
गृहवास सुखार्थं हि पत्नीमूल च तत्सुखम् ।
सा पत्नी या विनीता स्याच्चित्तज्ञा वशवर्तिनी ॥ ६ ॥

## महाभारतांतील स्त्रियांसंबंधाचे विचार

अर्धं भार्या मनुष्यस्य भार्या श्रेष्ठतम सखा ।
भार्या मूल त्रिवर्गस्य भार्या मूल तरिष्यत ॥ १।७४।४१॥
आत्मा पुत्र सखा भार्या । १।१५९।११ ।
कल्योत्थानरतिर्नित्य गृहशुश्रूषणे रता ।
सुसमृष्टक्षया चैव गोशकृत्कृतलेपना ॥ १३।१४६।४८
न गृह गृहमित्याहुर्गृहिणी गृहमुच्यते ।
गृह तु गृहिणीहीनमरण्यसदृश मतम् ॥ १२ ।१४४।६
नाऽमृतस्यहि पापीयान्भार्यामालभ्य जीवति ॥ ४ ।१७।१५
नास्तिभार्या सम किंचिन्नरस्यार्तस्य भेषजम् ।१२।१४४।१५
नास्ति भार्यासमो बधुर्नास्ति भार्यासमा गति ।
नास्ति भार्यासमो लोके सहायो धर्मसग्रहे ॥ १२।१४४।१६
पतिर्हि देवो नारीणा पतिर्बन्धु पतिर्गति ।
पत्या समा गतिर्नास्ति दैवत वा यथा पति ॥ १३ ।१४६।५५
पर्जन्य नाथा पशवो राजानो मत्रि बाधवा ।
पतयो बाधवा स्त्रीणां ब्राह्मणा वेद बाधवा ॥५ ।३४।३८
पुत्र आत्मा मनुष्यस्य भार्या दैवकृत सखा ॥ ३।३१३।७२
भर्तव्या रक्षणीयाच पत्नीहि पतिना सदा ॥ ३ ।६९।४१

भार्यायां रक्ष्यमाणायां प्रजाभवति रक्षिता ।
प्रजायां रक्ष्यमाणायामात्मा भवति रक्षितः ॥ ३ ।१२।६९
भार्याहि परमो ह्यर्थः पुरुषस्येह पठ्यते ।
असहायस्य लोकेऽस्मिँलोकयात्रा सहायिनी ॥ १२।१४४।१४
भार्याहीनं गृहस्थस्य शून्यमेव गृहं भवेत् ॥ १२ ।१४४।५
यस्य भार्या गृहे नास्ति साध्वी च प्रियवादिनी ।
अरण्यं तेन गंतव्यं यथारण्यं तथा गृहम् १२ ।१४४।१७
राजानं प्रथमं विंदेत्ततो भार्यां ततो धनम् ।
राजन्यसति लोकस्य कुतो भार्यां कुतो धनम् ॥ १२ ।५७।४१
वृक्षमूलेऽपि दयिता यस्य तिष्ठति तद्गृहम् ।
प्रासादोऽपि तया हीनः कांतार इति निश्चितम् १२।१४४।१२
शाश्वतोऽयं धर्मपथः सद्भिराचारितः सदा ।
यद्भार्यां परिरक्षंति भर्तारोऽल्पबला अपि ॥ ३ ।१२।६८
श्रिय एताः स्त्रियो नाम सत्कार्याभूतिमिच्छता ।
पालिता निगृहीताच श्रीः स्त्री भवति भारत ॥ १३।४६।१५
सा भार्या या प्रियं ब्रूते स पुत्रो यत्र निर्वृतिः ।
तन्मित्रं यत्र विश्वासः स देशो यत्र जीव्यते॥ १२।१३९।९६
स्त्रियो यत्र च पूज्यंते रमंते तत्र देवताः १३।४६।५
पिता रक्षति कौमारे भर्ता रक्षति यौवने ।
पुत्राश्च स्थाविरे भावे न स्त्री स्वातंत्र्यमर्हति ॥ १३।४६।१४

आदिपर्व अध्याय १५८

सहधर्मचरीं दांतां नित्यमातृसमां मम ।
सखायं विहितां देवैर्नित्यं परमकां गतिम् ॥ ३१ ।
पित्रा मात्रा च विहितां सदा गार्हस्थ्य भागिनीम् ।
वरयित्वा यथा न्यायं मंत्रवत् परिणीय च ॥ ३२ ॥

कुलीनाशीलसंपन्नामपत्य जननीमपि ।
त्यामह जीवितस्यार्थे साध्वीमनपकारिणीम् ॥ ३३ ॥
परित्यक्तुं न शक्ष्यामि भार्यां नित्यमनुव्रताम् ।
कुतएव परित्यक्तु सुत शक्ष्याम्यह स्वयम् ॥ ३४ ॥
बालमप्राप्तवयसमजातव्यजनाकृतिम् ।
भर्तुरर्थाय निक्षिप्त न्यास धात्रा महात्मना ॥३५॥
यथा दौहित्रजाँल्लोकानाशंसे पितृभि सह ।
स्वयमुत्पाद्य वा बालाम् कथमुत्स्रष्टुमुत्सहे ॥ ३६ ॥

मनुस्मृति—ज्या ठिकाणी स्त्रियाचा आदरसत्कार केला जातो, त्या घरात देवता नादत असतात जेथें त्याचा आदर व सत्कार केला जात नाही, त्या घरातील सर्व क्रिया निष्फल होतात ज्या घरात स्त्रिया नेहमी दु खित व शोकी असतात त्या कुलाचा नाश त्वरित होतो परतु जेथें त्या आनदात असतात त्या कुलाची वृद्धि होते सत्कार व आदर या या अभावी स्त्रिया ज्या कुलाना शापितात तीं कुले अभिचारहत होऊन धनपशूसह नष्ट होतात म्हणून उत्कर्षेच्छु पुरुषांनीं भूषण व आच्छादन यानीं त्याचा निरनिराळ्या उत्सवप्रसगीं सत्कार करावा ज्या गृहांत पतिपत्नी एका विचारानें व परस्पर संतुष्ट अशीं वागतात तेथें मूर्तिमत कल्याण उभें असतें जर स्त्रीपुरुष परस्पराना प्रमोद देणार नाहींत व एकमेकात प्रेम नसल तर सतति होणार नाही स्त्रिया कुलामध्य सतुष्ट असतील तर तें कुलहि प्रसन्न असतें पण स्त्रीला जर त्या कुलाविषयीं अप्रीति वाटली तर मग काही अर्थ नाही पुरुषानी रात्र दिवस आपल्या माणसांसह कार्यतत्पर असावें अर्थात् त्यामुळें स्त्रिया कार्यंतत होऊन आपल्या स्वाधीन राहातात स्त्रिया या पुरुषांप्रमाण सरक्षणसमर्थ नसतात म्हणून लहानपणीं बाप तारुण्यात नवरा व म्हातारपणी मुल स्त्रियाचें रक्षण करतात मोठ्या बिकट प्रसगीं काय पाहिजे त करून स्त्रियाचें रक्षण केले पाहिजे जर तसें न झालें तर स्त्रियांच्या अरक्षणामुळें त्या दोन्ही कुलाना शोक दायक होतील पति हा भार्येमध्यें प्रविष्ट होऊन गर्भरूपानें पुन जन्माला येतो, म्हणून जिच्यामध्यें तो पुन जन्माला येतो तच तिचें जायात्व होय स्त्रियाना घरातील उपकरणें, स्वैपाक, बिछाना पांघरुण, स्व छता द्रव्यसग्रह, धान्याची

व्यवस्था, आद्याप्रमाणें सर्व, धार्मिक कर्मे, या सर्वांवर नेमावें. स्त्री जशा तऱ्हेच्या पुरुषाची सेवा करील तशाच प्रकारच्या पुत्राला ती जन्म देते म्हणून प्रजाशुद्ध्यर्थ स्त्रीचें रक्षण प्रयत्नानें केलें पाहिजे स्त्रियांच्या ठिकाणीं स्वभावतः कांहीं दोष मनूनें सांगितले आहेत तें लक्षांत घेऊन पुरुषानें वागलें पाहिजे. ( स्त्रीच्या ठिकाणीं जरी दोष असले ) तथापि जशा प्रकारच्या बऱ्या वाईट नवऱ्याशीं स्त्रीचा संबंध येईल तशीच ती बनते उदाहरणार्थ, गोड पाण्याची नदी समुद्राला मिळाली कीं तीहि क्षारजला होते प्रजाशुद्धीकरतां महाभाग्यवान् प्रकाशरूप ज्या स्त्रिया त्यांचा आदरसत्कार करावा, कारण गृहामध्यें स्त्रिया याच गृह लक्ष्म्या आहेत यांत संशय नाहीं. अपत्यजनन, संगोपन व दररोजचा अतिथि, मित्र, आप्त, ह्यांचा भोजनव्यवहार; याला प्रत्यक्ष स्त्रिया याच साधनीभूत आहेत प्रजनन, धर्मकार्ये, शुश्रूषा ही सर्व व्यवस्थित झालीं कीं आनंद होतो. म्हणून गृहस्थाचा व त्याच्या पितरांचा स्वर्ग स्त्रियाधीन आहे असें म्हणतात तें कांहीं खोटें नव्हे. कन्येला न्हाऊ घालून वस्त्र देऊन विद्या व शील-संपन्न वराला बोलावून कन्येचें दान करणें म्हणजे ब्राह्म विवाह होय तुम्हा दोघे धर्माचरण करा, असा आशीर्वाद देऊन व धर्म, अर्थ, काम या पुरुषार्थांमध्यें अतिक्रमण करणार नाहीं अशी शपथ घेऊन जें कन्यादान केलें जातें त्या विवाहाला प्राजापत्य विवाह असें म्हणतात ( दक्षस्मृति )— जर भार्या मनोयोगी व स्ववश अशी असेल तर गृहस्थाश्रमापेक्षा दुसरें कांहीं श्रेष्ठ नाहीं कारण, तिच्या आनुकूल्यानें त्रिवर्गाची प्राप्ती होते अनुकूल, दक्ष, मधुर व प्रियभाषी, संयमी, पतिनिष्ठ अशी जी स्त्री असेल ती प्रत्यक्ष देवताच होय स्त्रियेच्या आनुकूल्यानें स्वर्गप्राप्ती व प्रातिकूल्यानें नरकप्राप्ती होते. पत्नी-पतींचें परस्पर प्रेम व तज्जन्य आनंद हा स्वर्गांतही दुर्लभ होय घरांतील राहाणें हें सुखाकरतां असतें, तें सुख स्त्रीच्या स्वाधीन असतें जी विनीत, चित्तज्ञ व संयमी असते तीच पत्नी होय ( महाभारत ). स्त्री हा पुरुषाचा अर्धा भाग होय भार्या हा श्रेष्ठ मित्र होय. त्रिवर्गाचें मूळ व तरून जाण्याचें मूळ साधन भार्याच होय. आत्मा हा पुत्र व भार्या हा मित्र होय गृह शुश्रूषेमध्यें रत असलेली, सडासंमार्जन करणारी, घरांतील पसारा पाहाणारी अशी स्त्री असावी गृहिणी म्हणजेच घर होय त्याशिवाय तें गृहच नव्हे गृहिणीहीन घर अरण्यासारखें समजावें आर्त व दुःखपीडित मनुष्याला

त्याचें दु:ख नाहींसें करणारें भार्येसारखें दुसरें औषध नाहीं. भार्येसारखा बंधु नाहीं, आश्रय नाहीं व धर्मकार्यांत सहाय्य करणाराहि दुसरा कोणी नाहीं. स्त्रियांचा देव पती, बंधु पती, आश्रय पती, सर्व कांहीं पतीच होय. पती हेच स्त्रियांचे बंधु होत. पतीनें पत्नीचें पोषण व रक्षण करावें. पोषण रक्षणामुळें त्या प्रजा देणाऱ्या होतात. प्रजेच्या रक्षणामुळे आत्म्याचें रक्षण होतें. या असहाय अशा लोकांमध्यें लोकयात्रेला सहाय्य करणारी भार्या हाच पुरुषाचा मोठा आधार असें म्हणतात तें खोटें नाहीं. भार्याहीन गृहस्थाचें घर हें ओसच समजावें. ज्याच्या घरीं साध्वी व प्रियभाषी भार्या नाहीं त्यानें अरण्यांत जावें. कारण त्याचें गृह अरण्यसदृशच असतें. प्रथमत चांगला राजा मिळवावा. नंतर दारा व द्रव्य प्राप्त करून घ्यावें. राजा जर चांगला नसेल (अराजक असेल) तर कोठली भार्या व कोठलें द्रव्य! झाडाखाली सुद्धा गृहस्थाचें घर होऊं शकतें, मात्र तेथें भार्या असली पाहिजे. तिच्याशिवाय राजवाडासुद्धा अरण्यासारखाच वाटतो. दुर्दैव असतांसुद्धा नेहमी स्त्रियांचें संरक्षण करतात. यावरून सज्जनांनी आचरलेला व शाश्वत असा स्त्रियांचें रक्षण करणें हा धर्ममार्गच होय. उत्कर्षेच्छून स्त्रीरूपानें असलेल्या गृहलक्ष्मीचा सत्कार करावा. त्याचें पालनपोषण व सत्कार निग्रहानुग्रह केल्यास स्त्री ही प्रत्यक्ष लक्ष्मीच बनते. जी प्रिय बोलते तीच भार्या होय. स्त्रियांचा सत्कार जेथें होतो तथें मूर्तिमत देवता नांदत असतात. स्त्रिया संरक्षण न असमर्थ, अतएव पिता, पुत्र व नवरा यांनीं त्याचें संरक्षण करावें (आदिपर्व अ. १५८)

एकचक्रा नगरींतील एका कुटुंबवत्सल ब्राह्मणावर बकासुराकडे जाण्याकरितां मनुष्य पाठविण्याची पाळी आली. त्या वेळीं तो स्त्री, पुत्र व कन्या यासंबधानं म्हणतो—हे स्त्रिये, मी तुझा त्याग करूं शकत नाहीं, कारण तू सहधर्मचारिणी, विनयशील, नेहमी मातेप्रमाणें माझें संरक्षण करणारी, श्रेष्ठ असा आश्रय, देवांनी मला दिलेला मित्र, मातापित्यांनीं स्वाधीन केलेली गृहस्थधर्माची सहभागी, यथान्याय मतानें स्वीकार केलेली, कुलशीलसंपन्न, अपत्यजननी, मर्तेंवैकल्यें करणारी अशी तू आहेस म्हणून माझ्या प्राणाच्या संरक्षणा करतां मी राक्षसाकडे तुला कधींहि पाठविणार नाहीं. मग लहान, वयांत न आलेल्या, अद्याप अवयवही स्पष्ट दिसत नाहींत अशा बालकाचा त्याग मी कसा बरें करीन! (स्त्रीचा त्याग करणार नाहीं व मुलाचाही नाहीं, मग कोणी

ह्मणतील मुलीचा त्याग करा तर तेंही शक्य नाहीं ) कारण मुलगा व मुलगी हे माझे डावे व उजवे नेत्र होत मुलगी ही ब्रह्मदेवानें तिच्या नवऱ्याचा अर्थ साधण्याकरता मजजवळ ठेवलेली ठेव आहे तिच्या योगानें दौहित्रजन्य लोकाची मला व पितराना प्राप्ती होणार आहे तेव्हा अशी जी दुसऱ्याची ठेव तिचा त्याग करण्याचें नाहस मी कसें चोरें करीन ? अर्थात् केव्हाही करणार नाहीं

विस्तारभयास्तव येथें थोडेच उतारे दिले आहेत आणि त्याचा भावहि थोडक्यातच सांगितला आहे. त्यावरून स्त्रियांविषयाचे विचार किती उदात्त होते हें स्पष्ट समजत इतर धर्मांमध्यें स्त्री ही पुरुषानतर उत्पन्न झाली ती ईश्वराच्या कुशींतून झाली, असें सांगितलें आहे. परंतु बृहदारण्यकामध्यें स्त्री व पुरुष ही दोघें एकदम उत्पन्न झाली व तीं एकमेकाची पूरक आहेत असें म्हटलें आहे स्त्री-पुरुष ह तुल्यबल व सारख्या योग्यतेचे असले तरी स्त्रियांचें रक्षण पिता, भर्ता व पुत्र यानीच केलें पाहिजे यात शका नाहीं. कारण निसर्गत त्या संरक्षणदुबळ आहेत अथर्ववेदामध्यें गृहपत्नीला सम्राज्ञी म्हटलें आहे व इतर सर्व विचारहि अत्यत उदात्त असे आहेत. मनुस्मृति व दक्षस्मृति यांमध्यें स्त्रियांचें महत्त्व, त्याचें कर्तव्य, त्यांची योग्यता फारच दूरदर्शीपणें विवेचिली आहे सांप्रत जो विवाहविधि आहे त्यात ब्राह्म व प्राजापत्य विधींचे मिश्रण आहे. पण तेथें जी शपथक्रिया सांगितली आहे ती त्रिविध पुरुषार्थी ध्या साधण्याला अत्यत उपयुक्त आहे व बरोबरीच्या हक्काची ती दर्शक आहे. भारतातील स्फुट सुभाषितांमध्यें फारच सुंदर, श्रेष्ठ व उदात्त तत्त्वें गोवलेली आहेत समाजाला प्रारभ घरापासून होतो व घराचें मूळ केंद्र स्त्री ही होय स्त्री शाश्वती असली तरी तेथें घर होतें व तिच्याशिवाय रानवाड्यातहि तं हात नाहीं, यामध्यें समाजशास्त्राचें मोठेंच तत्त्व सांगितलें आहे आर्त, दु खित व पीडितांचा आश्रय स्त्री होय म्हणजे ती सर्वांची माता आहे ईश्वरी प्रेमाची ती प्रतिमा आहे तिच्यामुळेंच जग जगतें असा भाव आहे आदिपर्वातील ब्राह्मणाचे व ऋषिपत्नींचे विचार प्रत्येक पित्यानें हृदयावर कोरून ठेवण्याजोगे आहेत.

---

# प्रकरण पांचवें

---

## बौद्धांचा दुःखवाद

**प्राचीन वाङ्मयावरून संस्कृतीचा बोध**—मागल्या तीन प्रकरणांत आर्य संस्कृतीचें स्वरूप वेद, रामायण व भारतकालीं कसें होतें हें सांगितलें. त्या वाङ्मयाच्या कालासंबंधी अनिश्चितपणा पुष्कळ असला तरी दाशराज्ञ युद्ध, रामरावणयुद्ध व भारतीय युद्ध हीं फारच प्राचीन आहेत, याबद्दल दुमत नाहीं. भारतीय युद्धाचा काल ख्रिस्तपूर्व अडीच हजार जरी धरला तरी त्यापूर्वी पाचशें वर्षें रामरावणयुद्ध व त्यापूर्वी तीन चार शतकें दाशराज्ञयुद्ध झालें हें निश्चित आहे. या तीन युद्धांच्या पूर्वी, युद्धांच्या वेळीं व नंतर जी आर्यसंस्कृतीची परिस्थिति होती ती वेद, रामायण व भारत याच ग्रंथांवरून कळण्याजोगी आहे. आज जें प्राचीन वाङ्मय आपणापुढें आहे, त्यांतील नवीन संस्करणाचा, प्रक्षेपाचा व कमी अधिक भर घातलेला भाग वगळून देखील तत्कालीन संस्कृतीची चांगली कल्पना येते.

**वैदिक आर्यांचा स्वभाव**—आर्यसंस्कृतीच्या उत्कर्षाला ऋग्वेदापासून प्रारंभ झाला, असें ऋक्संहितेंतील विविध विचारावरून म्हणतां येतें. वैदिक आर्य मोठे कर्मयोगी, उत्साही, उद्योगी, तेजस्वी, ओजस्वी तपस्वी, वर्चस्वी, जयस्वी, यशस्वी, जयिष्णु, वर्धिष्णु, व प्रभविष्णु अशा वृत्तीचे दिसतात. स्वर्गजगातील उपभोग्य वस्तूंचे उपभोग, सुंदर स्त्रिया, चपळ दमदार घोडे, सुख इत्यादि मागण्या देवतांजवळ मागणें हा वैदिक आर्यांचा स्वभावच होता. आर्यांच्या या आक्रमशील वृत्तीनेंच त्यांनीं उत्तरध्रुवापर्यंत आपले घोडे नाचविले. संहिताकाल व भारतीय युद्धकाल यांच्या दरम्यान सूर्य व सोमवंशी अनेक पराक्रमी राजे होऊन गेले. त्यांतील उत्कृष्ट उदाहरणें म्हटलीं म्हणजे नल, राम व युधिष्ठिर यांचीं होत.

**आर्यसंस्कृतीचा उत्कर्षकाल**—भारतीय युद्धकालीं आर्यांची सर्वतोपरी भरभराट झालेली होती. सर्व राष्ट्र क्षात्रतेजानें प्रकाशमान झालेलें होतें. क्षात्रतेज, सत्ता, सार्वभौमत्व, स्वराज्यव्यवस्था, उत्तम हवा, स्वादिष्ट व

स्वकर अन्न, पाचक पाणी, उत्कृष्ट आरोग्य आणि धार्मिक व नैतिक सदाचार यामुळें जागतिक पुरुषार्थाच्या क्षेत्रात आर्यसंस्कृति वैभवाच्या पूर्ण शिखरावर विराजमान झाली होती असें म्हणण्यास मुळीच प्रत्यवाय नाही. अशा पूर्ण वैभवाच्या वेळीं आपआपसातील कलहामुळे भारतीय युद्ध उत्पन्न झालें व त्यात प्रमुख क्षात्रतेजें विलीन झालीं आर्यसंस्कृतीचा विजयसूर्य सारखा वर येत येत तो भारतीय युद्धापर्यंत मध्यान्हावर आला होता हा सूर्य बराच कालपर्यंत एका स्थिर स्थितामध्यें होता व तेथून म्हणजे पाणिनीकालानंतर तो पुढें मावळत्या दिशेकडे कलू लागला असें म्हणता येतें.

**उत्कर्षस्थैर्यकाल**—भारतीय युद्धापासून पाणिनीकालापर्यंतचा इतिहास बराच अस्पष्ट आहे. हा काल कांहीं नाहीं तरी दीड दोन हजार वर्षांचा आहे. भारतीय युद्धापूर्वीच्या कालाला उत्कर्षवृद्धीचा काल म्हटला तर पुढच्या कालाला उत्कर्षाचा स्थिरकाल असें म्हणता येईल. या कालांत सूर्य, सोम व अग्निवंशी क्षत्रिय राजे पंजाब, मध्यदेश, अयोध्या, सौराष्ट्र या भागात राज्यें करीत होते. या विविध राजांच्या राजवटींत मोठे राजकीय व सामाजिक विग्रह झाल्याचें अद्याप पुढें आलेलें नाहीं. तथापि क्षत्रियामध्यें शौर्य, ईश्वरभाव व स्वामिभाव हे गुण असल्यामुळें प्रत्येकाला सम्राट होण्याची इच्छा असे. कोणाही क्षत्रियानें सार्वभौमत्वाची खटपट करावी, एकानें दुसऱ्या राजास जिंकण्याचा उपक्रम करावा, असा प्रकार चालू असल्यामुळे अनेक राष्ट्रांत अशा तऱ्हेच्याच राज्कीय उलाढाली होत असत मात्र या कालात संस्कृत पंडिताच्या आणि ब्राह्मणाच्या विचाराचा ओघ अप्रतिहत चालत असावा. श्रौतधर्माखेरीज इतर पारमार्थिक विचाराची उचल याच वेळीं झाली असावी, आणि औपनिषद विचाराचा प्रसारहि सर्वत्र झाला असावा, यामुळें या काळातील बौद्धिक भारतीय इतिहासच उपलब्ध असून राजकीय इतिहास अज्ञात आहे असें म्हणावें लागतें हा काल फार स्वास्थ्याचा असावा म्हणूनच या कालांत विद्या व शास्त्रें या क्षेत्रात संस्कृत पंडितानीं आपली करामत दाखविली. काशी, काश्मीर, कनौज, तक्षशिला, अयोध्या व मिथिला इत्यादि ठिकाणच्या विद्यापीठात हजारों विद्यार्थी अध्ययन करीत असत त्यातूनच पुढें पाणिनीसारखे जगन्मान्य हिरे बाहेर पडले असा पुरावा मिळतो. पाणिनीच्या अष्टाध्यायीमध्यें शाकल्य, गार्ग्य, शाकटायन अशा कित्येक वैय्याकरणाचे उल्लेख आलेले आहेत. त्यावरून भाषाशास्त्राची अभिवृद्धि

किती झाली होती हे कळतें वेद व वेदांगें यांचें वाङ्मय पाणिनीकाली चांगलेंच निर्माण झालेलें होतें. पाणिनीपर्यंत आर्यसंस्कृति विद्या व वैभव यांनीं युक्त होऊन जगात नांदत होती.

**जगत् दुःखमय हें अवनतीचें बीज**—कोणत्याही समाजाची उन्नति एकदम होत नाहीं, आणि अवनतीही एकदम होऊं शकत नाहीं. भोजनास बसल्यावर प्रत्येक ग्रासागणिक तुष्टि, पुष्टि व क्षुधानाश हीं जशीं होतात, तशीच उन्नतीची व अवनतीची स्थिती आहे आर्यसंस्कृतीचा उत्कर्ष अमुक कालापर्यंत भरला होता व पुढें लगेच अपकर्ष होऊं लागला असे रेषा काढून दाखवितां येणार नाहीं. पण इतकें सांगता येईल कीं, अमुक कालापर्यंत अवनतीचीं चिन्हें दिसत नव्हतीं. तीं पुढें जशी उद्भूत होऊं लागलीं तसतशी अवनति होत गेली. प्रस्तुत लेखकाच्या मतें भारतीय युद्धापासून पाणिनीपर्यंतच्या स्वास्थ्याच्या कालात हीं अवनतीचीं बीजें रुजलीं. संतोष व स्वास्थ्य हीं उत्कर्षाचीं कारणें केव्हांही होत नाहींत—म्हणूनच "**असंतोष श्रियो मूलम्**" असा सिद्धांत आहे. उन्नतीचे मागून अवनति, उत्कर्षानंतर अपकर्ष, सुखामागून दुःख असा जगाचा चक्रनेमिक्रम आहे "चढेल तो पडेल" या वाक्यां म्हणींतही मोठा सिद्धांत गोंवलेला आहे आर्यसंस्कृतीत उत्कर्षाचें वैभव कित्येक हजार वर्षे भोगलें. पुढें तीं कांहीं काळ स्थैर्याच्या अवस्थेंत होती आणि त्याच अवस्थेमध्यें निऱ्या अवनतीचीं बीजें रुजलीं. त्या बीजापैकीं जगत् दुःखमय आहे, तें क्षणिक आहे, असार आहे व मिथ्या आहे असा बहुजनसमाजाचा ग्रह ज्या तत्त्वज्ञानाच्या शिकवणीमुळें झाला आहे, तें **तत्त्वज्ञान हें अपकर्षाचें प्रमुख कारण होय** आर्य संस्कृतीच्या अपकर्षाचीं अनेक कारणें असूं शकतील व आहेत. त्या सर्वांचें यथास्थित आलकन प्रस्तुत लेखकाला झालें आहे अशी स्थिति नाहीं व जें झालें आहे त्याचा पक्क विचार प्रस्तुत ग्रंथांत शक्य नाहीं. म्हणून लेखकाला जीं अत्यंत महत्त्वाचीं अशीं कारणें वाटतात तेवढ्याच अपकर्षाच्या कारणाचा विचार तो येथें करणार आहे, हें वाचकांनीं विसरूं नये असो. जग दुःखमय आहे, तें क्षणिक आहे, इत्यादि जें तत्त्वज्ञान सर्वत्र पसत आहे त्याच्या इतिहासाकडे वळूं

**जगापलीकडील वस्तूचा शोध**—§ भारतीय युद्धानंतर उपनिषदांची रचना झाली असें पुष्कळ विद्वानांचे मत आहे. अनेक उपनिषदांपैकीं पुष्कळ एकच उपनिषद संहितेमधील असून बाकीचीं सर्व ब्राह्मणग्रंथांतील आहेत. या मर्यांचा

---

§ **टीप**—या प्रकरणात आलेल्या कांहीं पारिभाषिक शब्दांचे अर्थ वाचकांना सहज समजणार नाहींत म्हणून त्यांचा थोडी फोड करितों. मन्त्र व ब्राह्मण यांना वेद असें म्हणतात. ऋषी हे मंत्रद्रष्टे होते. त्यांना मंत्र जसे स्फुरले तसे ते त्यांनी उच्चारले. त्या सर्व मंत्रांचे एकत्रीकरण म्हणजे संहिता ( जुळणी ) होय. मंत्रांची जुडगी म्हणजे संहिता. चारहि वेदांचे संहिताग्रंथ स्वतंत्र आहेत. संहिताग्रंथ हा वेदाचा मुख्य भाग होय. ब्राह्मण शब्दाचा मूळ अर्थ यज्ञकर्मांवरील एकाद्या याज्ञिकाचें विवेचन असा आहे. कोणत्या मंत्राचा कुठे विनियोग करावा, कोणता मंत्र कुठें म्हणावा हें ब्राह्मण ग्रंथात सांगितलें आहे. थोडक्यात ब्राह्मणग्रंथाला " यज्ञशास्त्रग्रंथ " हें नाव देता येईल. ऐतरेय, कौषीतकी, तैत्तिरीय, शतपथ, ताण्ड्य, षड्विंश, जैमिनीय, गोपथ असे निरनिराळ्या वेदांचे ब्राह्मणग्रंथ आहेत. संहिता व ब्राह्मण याप्रमाणे वेदांचा आरण्यकें व उपनिषदें असा एक भाग आहे. आरण्यकें म्हणजे अरण्यात अध्ययन करण्याचे ग्रंथ. आरण्यकांतील मुख्य विषय म्हणजे यज्ञाची मूल तत्त्वें, त्यातील गूढ व गर्भित अर्थ व तत्त्वज्ञान हा होय. आरण्यकें हीं ब्राह्मण ग्रंथांतीलच एक भाग होत. संन्याशांनी शेवटच्या आश्रमात अध्ययन करण्याची जी धर्मवाक्यें आहेत व त्यांनाच अंती जोडलेली जी तत्त्वज्ञानाची चर्चा आहे तिलाच उपनिषद म्हणतात. उपनिषदाला वेदान्त म्हणजे वेदाचा शेवटचा भाग किंवा वेदाचें अंतिम ध्येय असें दुसरें नाव आहे. उप+नि+सद्=म्हणजे कोणाच्या जवळ बसणें असा याचा धात्वर्थ आहे. गूढ ज्ञानाची शिक्षा घेण्याकरिता गुरूजवळ जाऊन बसणें असा याचा अर्थ आहे. या ग्रंथामध्यें तत्त्वचर्चा हीच प्रमुख आहे. ब्राह्मण, आरण्यक व उपनिषद हीं प्रत्येक वेदामध्यें आहेत. उ. ऋग्वेद–ऐतरेय ब्राह्मण, ऐतरेय आरण्यक व ऐतरेय उपनिषद; ऋग्वेद–कौषीतकी ब्राह्मण, कौषीतकी आरण्यक, कौषीतकी उपनिषद; कृष्ण यजुर्वेद-तैत्तिरीय ब्राह्मण, तैत्तिरीय आरण्यक, व तैत्तिरीय उपनिषद; शुक्ल यजुर्वेद–शतपथ ब्राह्मण, बृहदारण्यक उपनिषद इत्यादि. श्रौतकर्म म्हणजे तीन किंवा अधिक अग्नींशी

काल भारतीय युद्धानंतरचा आहे. भारतीय युद्धांत सर्व प्रमुख क्षत्रिय गारद झाले. त्या वेळीं राष्ट्र संपन्न व सुखी होतें. सुखोपभोगाची रेलचेल, सुबत्तर अन्न, उत्कृष्ट हवापाणी व स्वर्गसुखाला लाजविण्यासारखी समाजाची स्थिति इत्यादि कारणांमुळें पुरुषार्थाच्या क्षेत्रांत कांहींच कर्तव्य राहिलें नव्हतें. जगांतील वैषयिक सुखाची मर्यादा अगदीं शिरोशिरीं आली होती, इतकेंच नव्हे पण प्रवृत्तिप्रधान यज्ञधर्माच्या आचरणामुळें मिळणाऱ्या सुखांची ओसरीहि आली होती. म्हणून जगापलीकडे जें तत्त्व असेल अगर सुख असेल, तें शोधण्याचा प्रयत्न विचारी लोकांकडून होऊं लागला.

**वेदकालीन तत्त्वचर्चा**-ऐहिक जगांतील सर्व सुखें मिळाल्यावर जगापलीकडील वस्तु शोधण्याचा यत्न झाला तर त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. पण ज्या समाजांत ऐहिक सुखें यथातथाच असतात, अशा कोणच्याही समाजांत कांहीं एक प्रकारच्या तत्त्वज्ञानाचे प्रवाह सतत चाललेलेच असतात. ऋग्वेद-संहिता ही अत्यंत जुनी आहे. तथापि तिच्यामध्यें तत्कालीन तत्त्वज्ञानात्मक विविध मतें आलेली आहेत. नासदीय सूक्त, हिरण्यगर्भसूक्त व पुरुषसूक्ताप्रमाणें इतरमही तत्त्वचर्चा आली असून यामध्यें सत्, असत्, अमृत, मृत्यु, ऋत, सत्य, विराट, हिरण्यगर्भ, तमस, ज्योति, असे विषय आलेले आहेत. संहितेमध्यें तत्त्वज्ञानाचे विचार मधून मधून बरेच आले असले तथापि ब्राह्मणग्रंथामध्यें तत्त्वचर्चा बाहुल्यानें आलेली आहे. भारतीय युद्धानंतर पारमार्थिक विचाराची उचल अधिक झाली. कर्माचें महत्त्व कमी झालें आणि उपासना व ज्ञान यांचें महत्त्व वाटलें. उपनिषदांवरून असें दिसतें कीं, त्या कालीं ऋषींप्रमाणें क्षत्रियही गूढ तत्त्वज्ञानाच्या चर्चा करीत व तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत कळलें नवें शाखा पुढें ठेवीत. ज्यांनीं ज्यांनीं या विषयावर प्रश्नोत्तरें केलीं त्यांतील अग्रगण्य जनक व याज्ञवल्क्य हे होत. यांशिवाय ज्यांच्या मतांचा उल्लेख उपनिषद् ग्रंथांत सांपडतो, ते शांडिल्य, सत्यकाम जाबाल, गार्ग्यायण, उद्दालक, श्वेतकेतु, भारद्वाज, नचिकेतस इत्यादि होत. उपनिषदांमध्यें जी तत्त्वचर्चा आहे तिचें सार पुढीलप्रमाणें सांगतां येईल. जगांत व जगाबाहेर ईश्वर आहे तो

---

संबंध असें आमहोत्र व यज्ञयाग. स्मार्तकर्म म्हणजे एकाग्नीवरील कर्म, नित्याचें होमहवन, पंचमहायज्ञ व षोडशसंस्कार हें होय. गृह्यकर्में व स्मार्तकर्में हीं एकच होत.

प्राणिमात्राच्या ठायीं अधिष्ठित आहे. तो सर्व शक्तिमान्, पालनकर्ता, शास्ता व सर्वांतर्यामी असा आहे. तो सर्वत्र आहे हें जाणणें व तो जसा आहे त्या स्वरूपात त्याला ओळखणें हे मनुष्याचें कर्तव्य होय. नदीचें पाणी जसें सागरांत मिसळून जातें, त्याप्रमाणें जीवात्मा हा परमात्म्यामध्यें विलीन होतो व फक्त स्वतःशिवाय इतर गोष्टींची जाणीव नाहींशी होऊन तो संवेदनारहित होतो, हाच मोक्ष होय.

**उपनिषदांतील यज्ञनिंदा**—उपनिषत्कालीं वैदिक प्रवृत्तिपर धर्मावरील विश्वास डळमळूं लागला होता. विस्तारपूर्वक सांगितलेले यज्ञ, त्यांतील प्राणिहिंसा, यज्ञकर्मांतील खटाटोप, कर्मांत न्यूनता आल्यास प्रायश्चित्तें, यामुळें इष्ट फल मिळेल काय, अशी शंका कर्ममार्गीयांनाहि येऊं लागली होती. यज्ञ हे खर्चाचे झाल्यामुळें लोकांना नकोसे झाले होते. यज्ञ करणाऱ्या ऋत्विजांमध्यें भांडणें उत्पन्न होऊन बारीक बारीक फरक उत्पन्न करणारीं शाखांतरें उद्भूत झालीं. ऋत्विजांच्या भांडणांचा सामान्य लोकांना कंटाळा आला. त्यामुळें पुरोहित वर्गाला श्रौतधर्म पुढें बंद करण्याचा प्रसंग आला व अध्ययन टिकविण्याकरितां गृह्यकर्में उत्पन्न करावीं लागलीं. यज्ञकर्मांचा तिटकारा लोकांना आलेलाच होता. तो तत्त्वविचार करणाऱ्या ब्रह्मवेत्त्यांनी दृढ केला. अर्थात अतींद्रिय सुख श्रेष्ठ आहे, तें मिळविणें हें मनुष्यजन्माचें ध्येय आहे, त्याची प्राप्ति यज्ञकर्मानें होत नाहीं, म्हणून परविद्येचा आश्रय केला पाहिजे असें ब्रह्मवेत्त्यांचें मत असे. उपनिषदांमध्यें जी यज्ञकर्माची निंदा आढळते, तीवरून यज्ञसंस्थेपासून समाजास परावृत्त करण्याचें कार्य ब्रह्मवेत्त्यांनी सुरू केल्याचें दिसतें. कल्पना यावी म्हणून मुण्डकोपनिषदांतील काहीं मंत्र येथें देतो.

प्लवा ह्येते अदृढा यज्ञरूपा अष्टादशोक्तमवरं येषु कर्म ॥ एतच्छ्रेयो येऽभिनन्दन्ति मूढा जरामृत्युं ते पुनरेवापि यन्ति ॥ ७ ॥ अविद्यायामन्तरे वर्तमाना: स्वयं धीरा: पंडितंमन्यमाना: । जङ्घन्यमाना: परियन्ति मूढा अन्धेनैव नीयमाना यथान्धा: ॥ ८ ॥ अविद्यायां बहुधा वर्तमाना वयं कृतार्था इत्यभिमन्यन्ति बाला: । यत्कर्मिणो न प्रवेदयन्ति रागात्तेनातुरा: क्षीणलोकाश्च्यवन्ते ॥ ९ ॥ इष्टा-

पूर्त मन्यमाना वरिष्ठं नान्यच्छ्रेयो वेदयन्ते प्रमूढा ॥ नाकस्य पृष्टे ते सुकृतेऽनुभूत्वेम लोक हीनतर या विशन्ति ॥ १० ॥

प्रथम मुंडक, द्वितीय खंड

**अर्थ**—ज्याच्यामध्ये निकृष्ट कर्म सांगितलें आहे ते हे अठरा यज्ञरूप अदृढ़ विनाशी आहेत, पण जे मूढ हेंच श्रेय आहे असें म्हणून त्याचें अभिनंदन करितात ते पुनरपि जरा व मृत्यु यास प्राप्त होतात (७) अविद्येमध्ये राहणारे व स्वतःला मोठे बुद्धिवान् पंडित मानणारे मूढ अंधाकडून नेल्या जाणाऱ्या अंधाप्रमाणें पीडित होत्साते भ्रमण करितात (८) अविद्येमध्यें बहुधा असणारे ते मूढ आम्ही कृतार्थ आहों, असा अभिमान धरितात ज्या अर्थी अशा रीतीने कर्मठ लोक कर्मफलविषयीच्या कामनेमुळें तत्त्व जाणत नाहींत, त्याअर्थी ते दुःखात होऊन ज्यांचें कर्मफल क्षीण झालें आहे, असे होत्साते स्वर्गांतून च्युत होतात (९) इष्टापूर्त कर्मास श्रेष्ठ मानणारे जे अत्यंत मूढ त्याहून दुसरें कांहीं श्रेयस्कर आहे असें समजत नाहींत ते स्वर्गावरील उत्कृष्ट शरीरांत कर्मफलाचा अनुभव घेऊन या किंवा याहून अत्यंत हीन लोकांत प्रवेश करितात (१०)

या मतांत यज्ञ या फुटलेल्या नावा आहेत, त्यांचा आश्रय करूं नये. कर्मरूपी अविद्येमध्यें जे सतत गढलेले आहेत, ते पंडितमन्य जरी असले तरी आंधळे होत कर्म करण्यांत कृतार्थ मानणारे लोक पुण्य सपल्यानंतर हीन लोकांप्रत जातात, अशा प्रकारचे नेमके यज्ञकर्माला दोष दिलेले आहेत, ते पाहिले म्हणजे त्या काळीं संसाराचा त्याग करून अरण्यांत जाऊन राहण्याची वृत्ति वाढत होती असें स्पष्ट दिसतें.

**संन्यास हेंच सुखाचें साधन**—प्रवृत्तिपर कर्मांनीं अतींद्रिय सुखाची प्राप्ती होणें अशक्य म्हणून सर्वसंगपरित्याग करून शांतपणें तत्त्वचिंतन करणें हेंच योग्य सर्व कर्में सदोष म्हणून सर्व कर्मांचा संन्यास करावा व आत्मज्ञानानें खरें शाश्वत सुख प्राप्त होतें म्हणून तें मिळविण्याकरितां एकाकी, अपरिग्रही व संन्यासी असावें अशीं समजूत उपनिषदांमध्यें पुष्कळ स्थळीं दिसते

"तमात्मानं विदित्वा ब्राह्मणा पुत्रैषणायाश्च वित्तैषणायाश्च लोकैषणायाश्च व्युत्थायाथ भिक्षाचर्यं चरन्ति । या ह्येव पुत्रैषणा सा

वित्तैषणा या वित्तैषणा सा लोकैषणोभे ह्येते एषणे एव भवतस्त-स्माद्ब्राह्मणः पांडित्यं निर्विद्य बाल्येन तिष्ठासेत्। बृ. आ अ. ३ ब्रा. ५

तसेंच "एतमेव प्रव्राजिनो लोकमिच्छंतः प्रव्रजन्ति एतद्ध स्म वैतत्पूर्वे विद्वांसः प्रजा न कामयन्ते। किं प्रजया करिष्यामो येषां नोऽयमात्मायं लोक इति ते ह स्म पुत्रैषणायाश्च वित्तैषणायाश्च लोकैषणायाश्च व्युत्थायाथ भिक्षाचर्यं चरन्ति। बृ. आ. अ. ४ ब्रा. ४"

त्या आत्म्याला जाणून ब्रह्मवेत्ते पुरुष पुत्र, वित्त व लौकिक याच्या इच्छांचा त्याग करून भिक्षावृत्तीनें राहातात. कारण जी पुत्रैषणा तीच वित्तैषणा व तीच लोकैषणा (कारण पुत्राकरिताच पुढें द्रव्य व लौकिक असावा असें वाटतें) याच त्या सर्व्या दोन इच्छा होत म्हणून ब्रह्मवेत्त्यानें पांडित्याचा कंटाळा करून बालभावानें राहावें.(बृ. आ अ. ३ ब्रा ५)

या ब्रह्मलोकाची इच्छा करणारे संन्यासवृत्तीचे लोक संन्यास घेतात. याच परमब्रह्माच्या प्राप्तीकरिता पूर्वीच्या ज्ञात्यानी प्रजेची इच्छा केली नाही ते म्हणत - "ज्यात आत्मप्राप्ती नाही, आत्मलोक नाही, अशी प्रजा घेऊन काय करावयाचें आहे?" म्हणून ब्रह्मवेत्ते पुत्र, वित्त व लौकिक यांच्या वासनाचा त्याग करून भिक्षावृत्तीनें राहातात. (बृ. आ. ३।४ ब्रा ४.)

बृहदारण्यकोपनिषदांतील वरील दोन्ही उताऱ्यावरून लोकैषणा, वित्तैषणा पुत्रैषणा यांचा त्याग करून भिक्षाचर्येचा अवलंब करून जगापलीकडील वस्तूच्या शोधांत काळ घालविण्याचा उपक्रम विचारी लोकात चालू झाला होता असें दिसतें. निर्विकार मनानें उपनिषदाचा अभ्यास केल्यास जगापलीकडील अतींद्रिय वस्तूचा शोध, त्या शोधाकरिता सर्वसंगपरित्याग, अतएव जगांतील ऐहिक पुरुषार्थांकडे पूर्ण दुर्लक्ष आणि भिक्षाचर्य ही त्यांतील शिकवण स्पष्ट दिसते.

**तत्त्वज्ञानाचे विविध पंथ**—जगापलीकडील वस्तूचा शोध करण्याची प्रवृत्ति जी एकदां समाजात सुरू झाली ती कांहीं काल वेद म्ह (पूर्वपरंपरा) प्रमाण मानून चालू झाली पण एकदा बुद्धि व तर्क याना प्राधान्य आल्यावर वेदाना मानून किंवा न मानूनही तत्त्वशोध करण्याची परंपरा सुरू होणें स्वाभाविक होतें. त्यांनाच पुढें आस्तिक, नास्तिक, वैदिक, अवैदिक अशी नांवें मिळाली या वर्गांमध्ये मुंडक, तापस, परिव्राजक, श्रमण आणि ब्राह्मण यांचा

समावेश झालेला होता यांपैकी कित्येक ईश्वर व वेद मानणारे होते, तर कित्येक ते न मानता नैतिक उन्नति घडवून आणण्यात व व नीतिविषयक गोष्टींचा खल करण्यात निमग्न झाले होते कपिलसांख्याचा उल्लेख श्वेताश्वेतर उपनिषदामध्यें

**ऋषिं प्रसूतं कपिलं यस्तमग्रे ज्ञानैर्बिभर्ति जायमानंच पश्येत् ॥**

( अ. ५ ) असा आला आहे त्यातच त्याचें सांख्य तत्त्वज्ञानहि आलें आहे. कपिल सांख्य हा बुद्धि व तर्क यांच्या साह्यानें स्वतंत्र विचार करणारा होता. म्हणून यातूनच फाटा फुटून नास्तिक सांख्यतत्त्वज्ञान निघालेलें दिसतें आस्तिक सांख्यतत्त्वज्ञानाची छाप जशा गीतेवर पडलेली आहे तशी नास्तिक सांख्याची छाप जिन व बुद्ध यांवरहि पडलेली असावी. कपिल सांख्याची तर्कपरंपरा पुढें कणादासारख्या वैशेषिकांनी व गौतमासारख्या नैय्यायिकांनी चालविली हें प्रसिद्धच आहे. तात्पर्य, उपनिषत्काली श्रद्धा व परंपरा यांना आहान लागलें होतें आणि तर्क व बुद्धि यांना भरता येऊं लागली होती असें उपनिषदांवरून्च म्हणता येतें. एकदां जगापलीकडील वस्तु शोधण्याचा यत्न चालू झाला व तो तर्क, बुध्दि यांच्या आश्रयानें सुरू झाला म्हणजे मग त्याला निर्बंध घालणें अशक्य असतें त्याचा परिणाम भिन्न विचारसरणींत होतो व त्यामुळें अनेक पंथ उत्पन्न होत असतात त्याप्रमाणें जिन व बुध्द यांपूर्वी त्यांच्या मतांचवळचे असे तत्त्वज्ञानमूलक अनेक पंथ अस्तित्वांत आलेले होते.

आत्म्याचें स्वरूप काय, आत्मा व जग यांचा संबंध काय, मृत्यूनंतर आत्म्याचें काय होतें, ईश्वर, आत्मा व जग यांचे परस्पर संबंध काय आहेत इत्यादि प्रश्नांचा विचार त्या वेळीं लोकांमध्यें चालत असे. आणि ज्याचा जसा कल असेल त्या मानानें तो कालवादी, ईश्वरवादी, आत्मवादी, नियतिवादी, किंवा स्वभाववादी बनत असे विचारसरणीच्या भिन्नत्वामुळें तत्त्वज्ञानमूलक अनेक मतें त्यावेळीं अस्तित्वांत आलीं काहीं मतें वैदिक परंपरेचीं होतीं तर काहीं अवैदिक परंपरेचीं असत त्याप्रमाणें सांख्याच्या अनुयायांमध्यें भिन्नभिन्न ६० मतें प्रचलित होतीं पाणिनीनंतर दों दोनशें वर्षांत सुमारें ३६३ मतें अस्तित्वांत आलीं असें जैन ग्रंथावरून म्हणतां येतें. या ३६३ मतांपैकीं १८० क्रियावादी, ८४ अक्रियावादी, ६७ अज्ञानवादी व ३२ विनयवादी असें वर्गीकरण नंदीसूत्रांत केलेलें आहे बौद्धांच्या ब्रह्मजाल सूत्रांतही एकंदर ६२ मतें आलीं असून त्यांचें वर्गीकरण अवांतर अठावभागामध्यें केलें

आहे. महावीराच्या पूर्वी तेवीस तीर्थंकर झाले व बुद्धापूर्वी बुद्धमताचे बरेच आचार्य झाले, अशा समजुती आहेत. त्या समजुतींमध्यें सत्याचा अंश फारसा नसला तरी तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत त्या वेळीं वैचारिक खळबळ प्रचंड झाली होती एवढे निश्चित आहे. बुद्धाच्या जन्मापूर्वी आजीवक या नावाचा एक पंथ अस्तित्वात होता. या पंथातील भिक्षु गोवत्साची विष्ठा भक्षण करीत, शरीरें धुळीनें माखीत, केव्हा केव्हा तापलेल्या काजी पिऊन सदा नग्न स्थिती-मध्यें असत, अशी माहिती मिळते. बौद्ध ग्रंथामध्यें उद्दक, रामपुत्त आणि आळारकालाम असे गौतम बुद्धाचे गुरु होते असें सांगितलें असून बुद्धसमकालीन अशा आणखी सहा आचार्यांचा नामनिर्देश आहे. ते आचार्य म्हणजे (१) पूरण-काश्यप (२) मस्करीगोशाल (३) अजित केशकंबल (४) कुकुदकात्यायन (५) संजय-बेलट्ठीपुत्त आणि (६) निर्ग्रंथ ज्ञातृपुत्र हे होत. हे सर्व आचार्य नग्न असत. ज्यानें पाप केलें असेल त्यास लाज वाटत व लाज झाकण्याकरिता कपडे पाहिजेत; पण मला पाप नाहीं मग कपडे कशाला ? असें पहिल्या आचार्याचें मत होतें. वरील चौथा व सहावा आचार्य थंड पाणी पिणें ही हिंसा आहे असें म्हणे, कारण थंड पाण्यात लहान आत्म्यांचे कण असतात म्हणून तें पाणी पिऊं नये. अजितकेशकंबल हा केशलुंचन, धूम्रपान व पंचाग्निसाधन याचा पुरस्कर्ता होता. कांहीं आचार्य प्रत्येक धार्मिक सिद्धांताला अस्तिनास्तिपक्षी द्विधा उत्तरें देत असत.

**उपासनापंथांचा कर्मावर आघात**—पाणिनीनंतर अवैदिक मताचा जसा सुळसुळाट झाला होता तसा वैदिक धर्मांचा व उपासनांचाहि प्रचार पुष्कळ झालेला होता. उपनिषदांमध्ये **इतस्ततः पसरलेल्या ईश्वर-विषयक कल्पनांतून** अनेक उपासनासंप्रदाय निघाले. यांतूनच पुढें भागवत धर्मांचा उदय झाला. गीतोपदिष्ट भागवत धर्माचें मूळचें नांव नारायणीय धर्म असें होतें. भागवत धर्माचेंच सात्वत धर्म असें दुसरें नांव आहे. या सर्व उपासनासंप्रदायांना या वेळीं व्यवस्थित स्वरूप जरी नसलें तरी त्या काळी उपासना व तत्त्वज्ञान यांनी वैदिक प्रवृत्तिपर धर्मानें महत्त्व पुष्कळ कमी केलें होतें. यांत दावा नाहीं धर्म सदोष म्हणून त्यांचा त्याग करावा. जगापलीकडील वस्तूचा शोध सर्वसंगपरित्यागपूर्वक करावा अशी जी विचारपरंपरा भारतीय बुद्धानंतर उपनिषदांतून सुरू झाली ती बुद्धपूर्वकाळीं अतिशयच

वाढली होती याच विचारपरंपरेतून मात्यक्षत्रियामध्यें उत्पन्न झालेल्या बुद्ध व जिन या व्यक्तींनी आपले धर्म लोकांपुढें ठेवून लोकांना अगदी भारून सोडलें, याच धर्मातून जग दुःखमय आहे, क्षणिक आहे व शून्य आहे, असें तत्वज्ञान निर्माण झालें।

**मात्यक्षत्रिय वैदयांचा इतिहास**—वर मात्यक्षत्रिय व मात्यवैश्य यामध्यें बुद्ध व जिन उत्पन्न झाले असें म्हटलें, त्याचा अर्थ समजण्याकरिता त्या कालच्या सामाजिक स्थितीचा थोडा विचार केला पाहिजे तो असा–

" पाणिनीच्या काळी चातुर्वर्ण्य संस्था होती, पण ती सैल असल्यामुळें अनुलोम विवाहपद्धति त्या काळीं होती. जातिसंस्था अद्याप अस्तित्वात नव्हती म्हणून पितृसावर्ण्याचीच चाल व्यवहारात होती स्त्री कोणत्याहि वर्णातली असली तरी तिच्यापासून झालेलें अपत्य पितृजातीय समजण्याची जी पुरातन चाल होती ती या वेळा अस्तित्वात होती विवाहाच्या बाबतींत अपत्य मोजण्याची ही चाल शूद्रेपासून झालेल्या संततीला त्रैवर्णिकानी लावल्यामुळें तिचा परिणाम समाजांत फार विलक्षण झाला त्रैवर्णिकांच्या घरी शूद्राजन्य बरीच संतती झाली त्या मुलांना माहेरच्या शूद्रसंगतानें शूद्रांचेच आचार, उच्चार व संस्कार जडू लागले. त्रैवर्णिकससर्गामुळें जरी त्या मुलात थोडा फरक पडला, तथापि शूद्र स्त्रीपासून झालेल्या संततीचा काळा वर्ण कांहीं केल्या बदलत नसे. म्हणून त्रैवर्णिकांमध्यें शुभ्रभास्करवर्ण संतति व कृष्णवर्ण संतति असे दोन ठळक विभाग पडले. कालांतरानें या दोन वर्गांत मत्सर, प्रतिकार व स्पर्धा उत्पन्न झाली या स्पर्धेचें सर्वप्रसिद्ध उदाहरण म्हणजे वैशंपायन व याज्ञवल्क्य यांचें होय. वैशंपायन हा कृष्णवर्णी त्रैवर्णिकांचा पक्षपाती होता व याज्ञवल्क्य शुभ्रवर्ण त्रैवर्णिकांचा पक्षपाती होता. पाणिनीपूर्वकालीं हा तंटा विकोपास जाऊन या दोन पक्षांत शरीरसंबंध होतनासे झाले. शुभ्रभास्करवर्णी त्रैवर्णिक हे कृष्णवर्णी त्रैवर्णिकाची शूद्रोत्पन्न म्हणून थट्टा करात. ती सहन न होऊन कृष्णवर्णी त्रैवर्णिकांनीं शुभ्रवर्णी त्रैवर्णिकाच्या धर्माची, आचाराची, यज्ञाची, श्राद्धाची, संस्कृत भाषेची, वेदाची आणि देवाची निंदा करण्यास प्रारंभ केला. इतकेंच नव्हे तर हजारों कृष्णपक्षाभिमानी त्रैवर्णिकांनीं शुभ्र पक्षाचा द्वेष करतां करतां मूळच्या सनातन वैदिक धर्माचा द्वेष आरंभिला आणि उपनयनादि संस्कार करण्याचें सोडून देऊन ते मात्य बनले. असले

सावित्रीपतित व्रात्य ब्राह्मण, भूर्जकंटक, अवंति, वाटधान इत्यादि देशात बहुत झाले. तसेंच सावित्रीपतित व्रात्य क्षत्रिय, झल्ल, मल्ल, लिच्छिवी, नट, करण, खस, द्रविड, पौंड्र औंड्र, काम्बोज, यवन, शक, पारद, पल्हव, चीन, किरात, दरद, इत्यादि त्या त्या देशात झाले आणि व्रात्य वैश्य, करुष, सात्वत इत्यादि देशपरत्वें झाले या लोकांची सावित्रीपतनापर्यंत म्हणजे संस्कारच्युत होऊन गायत्री मंत्राचेंही ज्ञान नाही येथपर्यंत प्रगति झाल्यावर ह्याच्यापैकी नटनामक व्रात्य क्षत्रियात जिन व शाक्यनामक व्रात्य क्षत्रियात गौतमबुद्ध ऊर्फ शाक्यमुनि ह्या दोघांनीं स्वतंत्र अशा वेदबाह्य व चातुर्वर्ण्यविरोधी मताची स्थापना करून व देशातील बहुतम व्रात्यांना व शूद्रांना एकजुटीत आणून शुद्ध सवर्णिकांचा अथवा शुद्धचातुर्वर्णिकांचा बीमोड करण्याचा उद्योग आरंभिला." इतिहाससंशोधक राजवाड्यांच्या रा मा वि. चंपूमधील वरील उताऱ्यावरून खिस्तपूर्व सहाव्या शतकातील सामाजिक स्थितीची ही मजा अटकळ बांधता येते. अशा या स्थितींतून जिन व बुद्ध पुढें आले व त्यांनीं जगापलीकडील वस्तु शोधण्याची जी पूर्वपरंपरा कित्येक शतकें चालत आली होती ती इतक्या जोरानें चालविली कीं, त्यामुळें **सर्वं दुःखं, सर्वं क्षणिकं, सर्वं शून्यम्** ' या सूत्रत्रयीमध्यें सर्व तत्त्वज्ञान येऊन बसलें. बुद्धापूर्वी हें तत्त्वज्ञान चालूच होतें. मात्र तें अस्पष्ट व अमूर्त होतें बुद्धानें त्याला मूर्त व स्पष्ट स्वरूप दिलें. बुद्धधर्माची दीक्षा अशोक, कनिष्कप्रभृति सम्राटांनीं घेऊन त्याचा प्रसार केला व शंकराचार्यादिकांना याच तत्त्वज्ञानाला " जगन्मिथ्या तत्त्वज्ञान " असें म्हणावें लागलें

**बुद्धाचें संक्षिप्त चरित्र**—गौतमबुद्ध खिस्तपूर्व ४८० सुमारास निर्वाणास गेला. त्या वेळीं त्याचें वय ८० वर्षांचें होतें. वयाच्या २९ साव्या वर्षी मोक्षमार्गशोधनार्थ यतित्व स्वीकारून तो घराबाहेर पडला. कांहीं दिवस तपश्चर्येत घालविल्यावर त्यानें आपल्या मतप्रसारास प्रारंभ केला. खिस्तपूर्व ५२५ व ६८० यांच्या दरम्यान बुद्धानें आपला धर्मप्रचार केला बुद्धाच्या धर्माचा, नीतितत्त्वाचा व तत्वज्ञानाचा प्रसार कोणत्या कारणांनीं झाला हेंही लक्षात घेण्याजोगें आहे बुद्धाचा जन्म कपिलवस्तु नामक नगरात लुंबिनी नावाच्या राईत झाला हें कपिलवस्तु नेपाळच्या सरहद्दीवर असावा. कपिलवस्तूच्या आसपास पुष्कळ शाक्य कुळें त्या वेळीं राहात असत. मातृवंशावरून ऐसीं

हजार व पितृवंशाकडून ऐशीं हजार कुलें गौतमबुद्धाच्या कुलाशीं संबद्ध होतीं. शाक्य कुलाशिवाय झल्ल, मल्ल, मौर्य, लिच्छवी, विदेह, कोलियम अशीं शाक्येत्तर कुलेंही कपिलवस्तूच्या आसपास होतीं. या लोकांत गणराज्यें* होतीं सर्व शाक्यसमूह मातृपक्षीयांमध्यें मोडत असे. गौतम बुद्धाच्या आईचें नांव मायादेवी व बापाचें नांव शुद्धोदन असें होतें. हा शुद्धोदन शाक्यांचा गणराजा होता. त्याचें त्या वेळीं मोठें वजन होतें. ललितविस्तरा मध्यें बुद्धाचें चरित्र एकाद्या अवतारी पुरुषाप्रमाणें भडक रंगवून दिलेलें आहे. पण अर्वाचीन संशोधनावरून जी माहिती मिळते, ती ललितविस्तराच्या अगदीं उलट अशी आहे " गौतम ज्या शाक्यकुलांत जन्मला त्या कुलाची नीतिमत्ता विशेष चांगली नव्हती शाक्यकुलांत जातीबाहेर विवाह होत नसत. ते टाळण्याकरितां भावाबहिणींचे विवाह व्हावेत गौतमाची गृहस्थिति व शारीरिक स्थिति चांगली नव्हती, म्हणून त्याला वैराग्य प्राप्त झालें गौतमाचा मनोनिग्रह बेताचा होता त्याचें नैतिक वर्तन चांगलें नव्हतें. तो विद्वान् नव्हता त्याला संस्कृत येत नव्हतें म्हणून तो वादविवादांत पडत नसे वेदांविषयीं ता अनुदार होते, इत्यादि " असो दण्डपाणी नांवाच्या एका वृद्ध शाक्य गृहस्थानें आपली गोपा नामक कन्या या राजपुत्राला दिली होती लहानपणापासून हा राजपुत्र सुखासीनपणें उदासीनवृत्तीनें बसत असे गौतम एकदा रथांत बसून राजवाड्याकडे जात असतां वाटेत त्याला एक म्हातारा व एक प्रेतयात्रा त्यानें पाहिली त्यावरून त्याच्या मनाला धक्का बसून वैराग्य प्राप्त झालें वयाच्या एकुणतिसाव्या वर्षी त्यास पुत्ररत्न झालें पण पुत्रजन्माची वार्ता म्हणजे संसारांत बद्ध करणारी त्याला एक शृंखलाच वाटली नंतर तारुण्यांत राज्यत्याग करून तो वैशालि नगरीस गेला. पुढें बिंबसाराच्या राजधानींत भिक्षा मागून तो तपश्चर्येकरितां गया येथें गेला गयेस सहा वर्षे तप केल्यावर बोधिद्रुमाखालीं त्याला साक्षात्कार झाला नंतर बोधिसत्त्व ही त्यानें पदवी धारण केली वयाच्या पस्तिसाव्या वर्षापासून अखेरपर्यंत धर्मप्रसार करून गौतमबुद्ध निर्वाणाप्रत गेला बुद्धगया, सारनाथ, श्रावस्ति, कुशनगर हीं

---

*टीप—कांहीं कुळांच्या समुदायाला गण म्हणत प्रत्येक गणाकडून राजा निवडला जाई. तो राजा ज्या कुलावर ( गणावर ) राज्य करी त्या राज्याला ' गणराज्य ' असें म्हणत

बुध्दाचीं पवित्र स्थानें म्हणून सांगण्यात येतात. वाराणसी येथें जाऊन बुध्दानें उपदेशास प्रारंभ केला पहिल्या उपदेशाला धर्मचक्रप्रवर्तन असें नाव आहे

**बुद्धाचें तत्त्वज्ञान**—गौतमबुद्धाच्या धर्मोपदेशाचें थोडक्यात संकलन सांगणें कठीण आहे. कारण गौतमबुद्धाच्या नावावर असलेले पुष्कळ धर्मोपदेश आहेत, आणि त्या उपदेशावर त्याच्या शिष्यप्रशिष्यांनीं परस्परविरोधी अशीं अनेक भाष्यें केलेलीं आहेत. तथापि बुद्धधर्म हा नीतिप्रधान धर्म आहे, ही समजूत यथार्थ आहे. गौतम बुद्धानें धर्मोपदेश करतांना आर्यसत्यें व आर्य अष्टांगिक मार्ग यावर विशेष भर दिला होता. आर्यसत्यें चार असून त्यांना दुःख, समुदय, निरोध व मार्ग अशीं दुसरीं नावें आहेत. दुःख म्हणजे काय, त्याचें मूळ कोणतें, त्याचा नाश म्हणजे काय, व तो कसा करावा, या चार प्रश्नांचा बोध करून देणें हें बौद्ध तत्त्वज्ञानाचें सार आहे असें सांगता येईल. अष्टांगिक मार्ग म्हणजे बौद्ध भिक्षूंनीं गुंफिलेली आहे. यांत सामान्य प्राथमिक नीतितत्त्वापासून निर्वाणप्राप्तीपर्यंतचा मार्ग कथन केलेला आहे अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, मद्यादिकांचें असेवन, दुसऱ्याला दुःख न देणें, कपट न करणें, परस्त्रीगमन, निंदा व विश्वासघात हीं न करणें, कठोरपणा न दाखविणें, दान करणें इत्यादि नीतितत्त्वाचा उपदेश बुद्ध करीत असे. बुद्धाचा मोठा कटाक्ष ब्राह्मणांवर होता. ब्राह्मणांचीं शास्त्रें शिकाल तर अधोगतीस जाल, कारण तीं शास्त्रें अनुभवावर रचलीं आहेत, अनुभव म्हणजे पदार्थ व इंद्रियें यांचा संनिकर्ष होय, पण या संनिकर्षानेंच वासना उत्पन्न होते व ती सर्व अधोगतीचें मूळ आहे, म्हणून वासना उत्पन्न करणारीं शास्त्रें शिकूं नयेत असा त्याचा कोटि-क्रम असे. तो क्षत्रिय जात सर्वांत श्रेष्ठ आहे असें म्हणे. त्यानें जातिभेद मोड ण्याविषयीं प्रयत्न केला नाहीं, तर क्षत्रियजात उच्च ठरविण्याचा त्यानें मोठा प्रयत्न केला ब्राह्मणांच्या यज्ञयागाची निंदा बुध्दपूर्वकालींच चालू झाली होती, तिचा फायदा बुध्दानें घेतला हिंसाप्रधान यज्ञ करूं नका, ते ज्यांत सांगितले आहेत ते वेद व त्यांतील देव मानूं नका, निरनिराळ्या देवतांच्या उपासनेंत काळ घालवूं नका, तर दुःखमय व क्षणिक जगतांतील विषयापासून निवृत्त होऊन मन शांत, वासनाशून्य करून निर्वाणपदाची प्राप्ति करून घ्या असा तो उपदेश करी. बुद्ध हा बुद्धि हाच आत्मा म्हणे. तथापि मन शांत, विरक्त व निष्काम करणें, हें जसें मोक्षप्राप्तीला आवश्यक म्हणून सांगितलें आहे, तसेंच।

घडली ती अशी—१ वैदिक धर्मामध्यें अतींद्रिय प्रश्नासंबंधीं सारखी वाटाघाट चालत असे ही वाटाघाट सामान्य जनाच्या आवाक्याबाहेरची असल्यामुळें गौतमबुद्धानें ती टाळली आहे २ वैदिक धर्माचा सर्व भर तर्कापेक्षा श्रद्धेवर होता. वेदाच्या अपौरुषेयत्वावर व श्रुतिप्रामाण्यावर त्याची सर्व भिस्त होती बौद्धधर्माची उभारणी सामान्य जनांना समजेल अशा तऱ्हेच्या विचारांवर केली गेल्यामुळें प्रत्येक माणसाला स्वतःच्या बुद्धीनें धर्मातील गुणावगुण करून घेण्याची सवड आहे ३ अहिंसा, प्रेम आणि मैत्री (सर्व भूतांविषयीं अनुकंपा), त्याचप्रमाणे सर्व प्राण्यांविषयीं बंधुभाव या बौद्ध धर्मातील तत्त्वांची छाप, ज्यांची यज्ञयागादिकांवरची श्रद्धा डळमळीत व्हावयास लागली होती त्यांवर आणि त्याचप्रमाणें ब्राह्मणाव्यतिरिक्त इतर जातींवर सहज पडली ४ वैदिक धर्मावरील भाषा संस्कृत असल्यामुळें आणि शास्त्रग्रंथही त्याच भाषेमध्यें असल्यामुळें ते सामान्य जनांना दुर्बोध होते बौद्ध धर्मातील विधि, उपदेश व धर्मग्रंथ हे लोकांना जी भाषा समजत असे त्याच भाषेत लिहिलेले असत.

पुनर्जन्म जर चुकवावयाचा असेल तर तृष्णाबीजाचा विध्वंस सन्यास घेऊन केला पाहिजे. ५. वैराग्यानें तृष्णाक्षय करून बौद्ध भिक्षू बनणें हाच शाश्वत शांतिसुखाचा खरा मार्ग आहे.

**महायान पंथाचा प्रसार**—वर ज्या महायान पंथाचा उल्लेख केला तो पंथ सम्राट अशोक यान्या कारकीर्दीत उदयाला आला. हिंदुस्थानांतील बौद्ध सप्रदायाच्या इतिहासांत अशोकाच्या काळाला सुवर्णयुग म्हणतात. कोणत्याही धर्माच्या प्रसाराला राजकीय सत्ता मोठें साह्य करते, अशोकानें या धर्माची दीक्षा घेतल्यामुळें ती सत्ता मिळाली या बलाढ्य राजाच्या पाठिंब्यामुळें हिंदुस्थानात या विचाराचा प्रसार फार जोरानें झाला, इतकेंच नव्हे तर सिलोन, काश्मीर, ब्रह्मदेश, जपान, इत्यादि प्रांतात व देशांत त्यानें धर्मप्रचारक पाठविले. अशोकाचा मुलगा व भाऊ हे धर्मप्रचारक बनले * धर्मप्रचाराकरिता त्यानें बौद्ध भिक्षू तयार करणारी विद्यापीठें स्थापन केली. पैकी पाटणा, नालंदा, तक्षशीला ही पीठें फार प्रसिद्ध होतीं अशोकाच्या वेळीं निरनिराळ्या ठिकाणी निरनिराळे बौद्ध सांप्रदाय होते त्यांचें एकीकरण करण्याकरिता त्यानें ख्रिस्त-

* **टीप**—बौद्ध तत्त्वज्ञानाचा प्रसार हिंदुस्थानाबाहेर होऊ लागला त्यामुळें परकीयांना या देशाबाहेर स्वाऱ्या करण्याचा मोह उत्पन्न झाला असें वाटतें कारण बौद्ध धर्माच्या भिक्षूंनीं स्वतः ज्या अनत्याचारी वर्तनानें हिंदुस्थानांतील तत्त्वज्ञान कसें आहे, हें साक्षात दाखविलें होतें बौद्ध भिक्षू जेथें जेथें गेले, तेथें तेथें अहिंसा म्हणजे प्रतिकारशून्यता व "सर्वं दुःखं सर्वं शून्यं म्हणजे जगाकडे दुर्लक्ष हीं तत्त्वें त्यांनीं प्रतिपादिलीं होतीं हिंदुस्थानसारख्या सपन्न देशांत ऐहिक वैभवाकडे दुर्लक्ष करणारा प्रतिकारशून्य समाज आहे तेव्हां त्याच्यावर स्वाऱ्या करून तेथें गडगंज द्रव्य मिळविण्यास पूर्ण अवसर आहे असा कयास कित्येक धूर्तांनीं केला असल्यास नवल नाहीं शिकंदरापासून अहमदशाहा अब्दालीपर्यंत जे जे परकीय लोक इकडे आले त्यांच्या पथ्यावर ( बौद्ध तत्त्वज्ञानाची छाप पडलेलें ) हिंदुस्थानांतील हें तत्त्वज्ञान पडलें यांत संशय नाहीं हिंदुसमाजात जो निवृत्तीचा अतिरेक दिसतो त्यामुळे समाजाची जिज्ञासा कशी मरते हें समजून घ्यावयाचें असल्यास जिज्ञासा मारणारा वेदान्त, हें '**हिंदुसमाज समर्थ कसा होईल** या ग्रथांतील प्रकरण वाचून पाहावें.

पूर्व २५३ सुमारास एक धर्मसमिती बोलाविली. तिचा अध्यक्ष मोग्गलीपुत्त तिष्य होता. सुमारें हजार भिक्षूंनी नऊ महिने बसून तिपिटक नावाच्या ग्रंथाचें संशोधन केलें आणि त्याचा प्रसार राजसत्तेच्या आश्रयानें हिंदुस्थानभर व बाहेरही केला. अशोकानंतर बौद्ध तत्त्वज्ञानाचा प्रसार करणारा दुसरा सम्राट् कनिष्क हा होय. यानें महायान पंथाची दीक्षा घेतली होती. कनिष्कानें बौद्ध धर्माचा अभ्यास सुरू केल्यावर त्याला परस्पर विरोध दिसून आला. त्यांची एकवाक्यता करण्याकरितां त्यानें अशोकाप्रमाणें एक मोठी धर्मसमिती भरविली. वसुमित्र हा अध्यक्ष व अश्वघोष हा त्या सभेचा उपाध्यक्ष होता. या सभेमध्यें सुत्त, विनय व अभिधम्म या पिटकत्रयावर भाष्यें लिहिली गेली. त्याचा प्रसार कनिष्कानें केला.

बुद्ध बनला तो तेव्हापासून आजपर्यंत एसाच आहे. जग दुःखमय आहे, तें क्षणिक आहे, या विचारसरणीचा परिणाम हिंदु समाजावर असा झाला आहे कीं, त्यामुळें त्याला जगाकडे रहस्यपूर्ण दृष्टीनें पाहावेंसें वाटतच नाहीं. जगांत राहणाऱ्या हिंदूंचा जग दुःखमय आहे या सिध्दांतानें जळांत राहून जळाशीं वैर अशी स्थिति झाली आहे. आर्यसंस्कृतीच्या आपत्तींचें हें एक प्रमुख कारण आहे. जगत् हें ईश्वराचें लीलैश्वर्य आहे. त्याकरतां स्वकर्मणा तमभ्यर्च्य या शास्त्राधारें सर्व व्यवहार धडाडीनें केले पाहिजेत, हें तत्त्वज्ञान त्या वेळीं पुढें कां आलें नाहीं याचा विचार पुढील प्रकरणांत करूं.

---

## प्रकरण सहावें

---

### संन्यास व जगन्मिथ्यात्व

**प्रकरणाचा विषय**—मागल्या प्रकरणांत औपनिषद् तत्त्वज्ञान, बुद्धपूर्वकालीन तत्त्वज्ञान, व बौद्धतत्त्वज्ञान यांचा इतिहास देऊन बौद्ध तत्त्वज्ञानाचे प्रचारक अशोक व कनिष्कासारखे सम्राट् झाल्यामुळें "सर्वं दुःख, सर्वं क्षणिक सर्वं शून्य" या तत्त्वज्ञानाभोंवतां कित्येक शतकें अखिल भारतीय समाज कसा वावरत होता, हें दाखविलें. प्रस्तुत प्रकरणांत श्रीशंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानाला पोषक अशा संन्यासाचा व जगन्मिथ्यात्वाच्या तत्त्वज्ञानाचा परिणाम समाजावर काय झाला याचा विचार करावयाचा आहे.

**वैदिक व बौद्ध यांचा लढा**—श्रीशंकराचार्यांनी व त्यापूर्वी कुमारिल भट्टांनी बौद्धांचें खंडण करून बौद्धधर्माचा भरतखंडांतून हकालपट्टा करून वैदिक धर्माची ध्वजा उभारली अशी समजूत लोकसमाजांत आहे. या समजुतींत सत्याचा थोडाबहुत अंश आहे, पण अमर्यादही अगदीं नाहीं असें नाहीं. वस्तुतः अशी माहिती मिळते कीं, बौद्धधर्माचें खंडन हें बुद्धापासूनच

सुरू होतें. बौद्धाचें खंडण वैशेषिकानी केलें, नैय्यायिकानी केलं व मीमांसकानी केलें। खंडणमंडणाचा हा झगडा कित्येक शतकें चालू होता. विशेषत चौथ्या शतकापासून नवव्या शतकापर्यंत हा विग्रह खालीलप्रमाणें चाललेला आढळतो

१. वैदिक—गौतमसूत्रभाष्यकार वात्सायन ( अर्थ चाणक्य ) यानें चौथ्या शतकात बौध्दाचें खंडण केलें

२. बौध्द—दिङ्नाग, पाचव्या शतकात प्रमाणसमुच्चय ग्रंथ लिहून वात्सायनभाष्याचें खंडण केलें

३ वैदिक—उद्योतकराचार्य, न्यायवार्तिक ग्रंथ लिहून प्रमाणसमुच्चयाचें सहाव्या शतकात खंडण केलें

४ बौध्द—धर्मकीर्तिवार्तिक ग्रंथ, सातवें शतक

५ जैन—समंतभद्रआप्तमीमांसा, सातवें शतक

६. वैदिक—कुमारिलभट्ट, मन व श्लोकवार्तिक ग्रंथ लिहून सातव्या शतकात बौध्दाचें खंडण केलें

७. जैन—अकलंक, अष्टशतीग्रंथ, आठवें शतक.

८ वैदिक —शंकराचार्य व सुरेश्वराचार्य यानीं आठव्या शतकात भाष्यें व वार्तिकें लिहून बौध्दमत खंडित केलें. यानतर नवव्या शतकात बौध्द धर्मोत्तराचार्य झाले. त्याचें खंडण भामतीकार वाचस्पति मिश्र व उदयनाचार्य इत्यादींनी केलेलें आहे. पंडितातील खंडणमंडणाचा याहीपेक्षा अधिक तपशीलवार इतिहास देण्याजोगा असला तरी तो अप्रस्तुत आहे. अशोक–मौर्यानंतर शुङ्ग, काण्वायन, गुप्त, शातवाहन, आंध्रभृत्य, अशी क्षत्रिय सम्राट्घराणीं उदयाला आला त्यापैकीं कित्येकानीं वैदिक धर्माच्या जयानिमित्त अश्वमेधासारखे यज्ञही केले. व पंडिताकडून बौध्द धर्माचें खंडण करविलें गुप्तराजाच्या राजवटीमध्यें बौध्दसंस्कृतीचा संकोच बराच झालेला होता हर्षाच्या राजवटीमध्यें बौध्द धर्माचें वर्चस्व बरेंच कमी होतें म्हणून कुमारिलभट्टानीं जर विशेष काहीं केलें असेल तर बौध्दानीं त्याज्य ठरविलेल्या अभिनव कर्मकलापाचें पुनरुज्जीवन करून वेदाचें व वैदिक विधीचें महत्त्व वाढविलें असें म्हणता येतें.

**कुमारिलाचें कार्य**–धर्म म्हटला की, आचार आणि तत्त्वज्ञान अशी त्याची दोन प्रमुख अंगें असतात. कुमारिलभट्टानी वैदिक धर्माच्या या आचार-अंगाचें म्ह. विधीचें संस्थापन केलें आचार हा धर्माचा आत्मा आहे व विचार हा

त्या आचाराला पोषक आहे. आचार गतिमान कार्यकारी आहे व विचार स्थितिमान बैठा आहे. आचारात विचाराची प्रत्यक्ष फलसिद्धि आहे, आणि विचारांत आचाराला सुफलित करण्याचें सामर्थ्य आहे म्हणून वैदिक धर्मात आचार व विचार ह्यांची उत्तम सांगड घालण्यात आली असून आचाराचें महत्त्व वाटविलें आहे. कुमारिलभट्टांनी या वैदिक विशेषावर म्हणजे आचारावर फार जोर देऊन वैदिक धर्माचा पाया बसविण्याचा प्रयत्न केला.

**पूज्यपाद आचार्यांचें कार्य**—कुमारिलभट्टानंतर सुमारें १०० वर्षांनी शंकराचार्य झाले. त्यांनी कुमारिलभट्टांनी घातलेल्या वैदिक विधींच्या पायावर बौद्ध तत्त्वज्ञानाला वैदिक तत्त्वज्ञानाचें स्वरूप देऊन बसविलें. शंकराचार्य हे प्रतिभासंपन्न, धोरणी, राजकारणी व व्यवहारनिपुण होते. त्यांनी तत्कालीन परिस्थितीचें चांगलें आकलन केलें होतें असें स्पष्ट दिसतें. त्या वेळी वैदिक हिंसेला फारसा मान नव्हता. अग्निहोत्राकडे लोकांचा ओढा स्वाभाविक कमी होता शिव, विष्णु, देवी, इत्यादि देवतांच्या उपासनाना महत्त्व येऊं लागलें होतें. बौद्ध भिक्षूंच्या वैभवानें लोकांचे डोळे दिपून गेले होते आणि अहिंसा व यति• धर्म यांचा बहुजन समाजाच्या मनावर चांगलाच पगडा बसलेला होता. या परिस्थितीचा कयास घेऊन आचार्यांनी कुमारिलभट्टाचें केवळ वैदिक कर्म किंवा सुध्दाचा केवळ कर्मसंन्यास यांना पृथक पृथकपणें महत्त्व न देता दोघांची एक-वाक्यता केली. ज्ञानाला संन्यास पाहिजे, संन्यासापूर्वी चित्तशुध्दी पाहिजे, व चित्तशुध्दीकरिता वर्णाश्रमविहित कर्मे केलीं पाहिजेत, असें मत त्यांनी प्रस्था-पित केलें. शंकराचार्यांच्या ग्रंथात बौध्द, जैन, सांख्य व मीमांसक यांचेंही खंडण आहे. बौद्ध धर्मांतील यतिधर्माचें खंडण शंकराचार्यांनी खरमरीतपणें केलेलें नाहीं आणि वैदिक विधींचें झणदर्णात मंडणही केलेलें नाहीं. उलट मीमां-सकांचें खंडण केलेलें पाहून त्याच्यावर 'प्रच्छन्न' बौद्धत्वाचा, आरोप जो येतो तो यथार्थ आहे. कोणत्याही कर्त्या माणसाला परिस्थितीला मान द्यावा लागतोच. शंकराचार्यांनी परिस्थिती लक्षात घेऊन उत्क्रांतीच्या नियमाप्रमाणें परिस्थितीशी अनुगुण वर्तन केलें अशा वर्तनानेच त्या वेळी वैदिक संस्कृतीचें थोडेंबहुत रक्षण झालें. तसें नसतें तर आर्यसंस्कृति जी आज दिसते तीहि टिकली नसती.

**आचार्यकालीन परिस्थिति**—कोणत्याहि मनुष्यांच्या कामगिरीची व तत्त्वज्ञानाची छाननी करतांना त्या वाळचा इतिहास, त्याचें जीवनवृत्त व

समाजस्थिति ही लक्षांत घेणें जरूर आहे. आचार्यपूर्वकाळची परिस्थिति पुढीलप्रमाणें होती. आचार्यांना बौध्द व जैन पाखंडाशीं जसें भांडावयाचें होतें, तसेंच त्यांना शैव, वैष्णव, शाक्त, गाणपत्य, भैरव, कापालिक, इत्यादि वैदिक सम्प्रदायाशींहि झुंजावयाचें होतें. कारण या वैदिक सम्प्रदायामध्यें मोठें द्वैत माजलेलें होतें. बुध्दोत्तर कालांत बुध्दाच्या शिष्यांनीं त्याचे अस्थ्यावशेष जतन करून त्यावर बुध्दाच्या प्रतिमा बसविल्या व स्तूप उभारले. त्यामध्यें बुध्दाच्या मूर्तिंच मूर्ति होऊं लागल्या. " मूळ वैदिक धर्मांत देवळें, मूर्ति, पादुका, प्रतिमा वगैरे कांहीं एक नव्हतें. हें सर्व या काळांत उत्पन्न झालें, व त्यायोगें बौध्द धर्माला चांगला आळा बसला. हा आगमतंत्र ग्रंथांचा व अष्टादश पुराणांचा काळ होय. यांत उपासनामार्ग बळावला, व त्यांत नाना प्रकारचे द्वैती, विशिष्ट देववादी किंवा एकदेववादी निर्माण झाले. त्यायोगें व्यक्तींत असहिष्णुता शिरली, धर्मांत कलह पेटला, व समाजांत बजबजपुरी माजली. कर्मवादी मीमांसक कर्मांत रत राहून एका बाजूनें बौध्दांच्या विरुध्द वैदिक परंपरेचें रक्षण करीत होते तर दुसऱ्या बाजूनें शुंग, गुप्त, शातवाहन, आंध्र, चालुक्य इत्यादि महासमर्थ वैदिक धर्माभिमानी राजे अश्वमेधादि क्रतु करून वैदिक धर्माचें परिपालन करीत होते. वेद, शास्त्रें, धर्म, इतिहास इत्यादि गहन विषयांत गति करण्यास ज्यांना सवड नव्हती, त्यांच्याकरितां महाभारतादि सोप्या इतिहासग्रंथांचें प्रणयन ह्याच काळांत झालें. ह्या सोप्या विश्वकोशानें सामान्य जनास आर्य ऐतिह्याची व परंपरेची ओळख होण्यास मदत केली. ह्याच काळांत महायान पंथातील देवालयें, विहार, मूर्ति इत्यादींशीं टक्कर देण्याकरितां वैष्णवांनीं राम, कृष्ण इत्यादि ऐतिहासिक व्यक्तींना देवत्व देऊन व शिव, विष्णु, इंद्र, सूर्य, वायु, मरुत्, लक्ष्मी, इत्यादि आर्ष देवांना मूर्तत्व देऊन त्यांचीं भव्य व रमणीय देवालयें उभारलीं. ह्याच काळांत लोकांना धर्म कळावा एतदर्थ मानवधर्मशास्त्र, याज्ञवल्क्यस्मृति, इत्यादि नामांकित काय द्यांचे ग्रंथ निर्माण झाले. ह्याच अवधींत बौद्ध व जैन पांडित्याला दिपवून टाक- णारे ब्रह्मसूत्रें, न्यायसूत्रें, तर्कसूत्रें, मीमांसासूत्रें, भक्तिसूत्रें वगैरे सूत्रग्रंथ उदयास आले. या काळांतच शबराचार्यांचें पूर्वमीमांसेवर प्रचंड भाष्य निर्माण झालें. भट्ट कुमारिलाचीं वार्तिकें जन्मास आलीं, व पार्थसारथीमिश्राची दीपिका उदय पावली. परंतु त्याबरोबरच उपासनामार्गांत जे जे नाना प्रकारचे योगाचार व अनाचार शिरले

होते व द्वैत माजलें होतें, तें नष्ट करण्याकरितां दुसऱ्या बाजूनें ज्ञानवादी शंकराचार्य पुढें आले. शंकराचार्यांनी आरंभापासून एकदम द्वैताच्या विरुद्ध अद्वैताचें टोंक धारण केलें, व द्वैतातील प्रखरता मोडली, कर्मांच्या विरुद्ध ज्ञानाची कास धरली, व कर्मठांतील मूढपणाला धक्का दिला व त्या काळीं सर्वत्र ज्या पद्धतीचा संन्यास लोकप्रिय होता तत्सदृश ब्रह्मचर्यांतून संन्यास स्वीकारला व स्वीकृत संन्यासाची महती गायली.' × आणि आपोआप मनुष्यस्वभावाप्रमाणें शंकराचार्यांनीं ब्रह्मचर्यांतून संन्यास स्वीकारला व त्याचाच पुढें पुरस्कार केला हें अक्षरशः खरें आहे. शंकराचार्यांचें नांव उच्चारतांच संन्यास या कल्पनेची प्रथम आठवण होते, व नंतर त्यांचा अद्वैत सिद्धांत आणि जगन्मिथ्या हा वाद ही पुढें उभीं राहतात. शंकराचार्यांसारख्या वैदिक धर्माभिमान्याला संन्यास व जगन्मिथ्यात्व वाद यांचा अवलंब कां करावा लागला हा मोठा विचाराचा प्रश्न आहे. त्याच्या विवेचनाकरितां वर्णाश्रमधर्माचें स्वरूप थोडें लक्षात घेतलें पाहिजे. त्याशिवाय संन्यासाश्रमानें केलेली हानी समजणार नाहीं.

**वर्णाश्रमधर्म व समाजरक्षण**—सनातन वैदिक परंपरेमध्यें समाजरक्षणार्थ वर्णाश्रमधर्म सांगितला आहे. चार आश्रमांपैकीं पहिले दोन आश्रम महत्त्वाचे आहेत. ब्रह्मचर्याश्रमांत ज्ञान, तप व तेज हीं वाढतात. गृहस्थाश्रमांत त्यांच्या साह्यानें यज्ञ व दान हीं उत्तम साधून व्यष्टीचें व समष्टीचें हित साधतें. पहिले दोन आश्रम कर्माला प्राधान्य देणारे आहेत. कारण लोकसंग्रहात्मक कर्माचरण पहिल्या दोन आश्रमांतच सिद्धीस जातें. वानप्रस्थ व संन्यास हे दोन आश्रम कर्मसंन्यासाला प्राधान्य देतात. कारण संन्यास हा आत्ममोक्षाकरतां आहे, तो वैयक्तिक निःश्रेयसाकरितां आहे म्हणून त्याची पूर्वतयारी वानप्रस्थांत करावी लागते. लोकसंग्रह कर्तव्य असल्यास पहिल्या दोन आश्रमांत तो केला पाहिजे. कारण कर्म हें मुख्यतः लोकसंग्रहार्थ आहे व जगद्धारणार्थ आहे. व्यष्टि व समष्टीचें संरक्षण ब्रह्मचर्य व गार्हस्थ्य या दोन आश्रमांतच करतां येतें. या दोहांमध्यें पुन्हा गृहस्थाश्रम हा ज्येष्ठ व श्रेष्ठ आहे. तो आत्मसेवा, धर्मसेवा, लोकसेवा व लोकसंग्रह यांचें साधन आहे. याच आश्रमांत

× **टीप**—आचार्यकालीन परिस्थितीचा हा भाग राधामाधव वि. चंपू व नासदीय सूक्त भाष्य यांचें संकलन आहे.

एवढें वर्चस्व मानलें होतें त्याचा इतिहासही मनोरंजक आहे, म्हणून तोहि थोडा देतों.

**उपनिषदांतील संन्यास**—उपनिषदामध्यें संन्यासाचा उल्लेख आहे तो असा—

"एतद्ध स्म वै तत्पूर्वे विद्वांसः प्रजां न कामयन्ते किं प्रजया करिष्यामो येषां नायमात्मायं लोक इति ते ह स्म पुत्रैषणायाश्च वित्तैषणायाश्च लोकैषणायाश्च व्युत्थायाथ भिक्षाचर्यं चरन्ति ।*

या वर्णनावरून संन्यास म्हणजे आत्मज्ञानानें प्राप्त होणारी स्वाभाविक स्थिति असा अर्थ दिसतो. पण ही मूलभूत कल्पना जाऊन पुढें संन्यास हें एक आत्मज्ञानाचें अवश्य साधन होऊन बसलेलें दिसतें. उपनिषदांतील ब्रह्मवेत्त्यांपैकीं स्वाभाविक ब्राह्मी स्थितीला कांहीं ब्रह्मवेत्ते गेल्याचीं वर्णनें आहेत. पण जाबालोपनिषदामध्यें जेव्हा वैराग्य प्राप्त होईल तेव्हा संन्यास घ्यावा असें म्हटलें आहे. जाबालोपनिषदांतील **यदहरेव विरजेत्तदहरेव प्रव्रजेत्॥** हें वाक्य अर्वाचीन आचार्यांपासून वेदान्तप्रवाहांत प्रामुख्यानें श्रुतिवचन म्हणून पुढें मांडण्यांत आलेलें आहे. या वचनाचा उच्चार व पुरस्कार बुद्धपूर्वकाळीं झाला व त्याच वेळीं आर्यसंस्कृतीच्या अपकर्षाचें बीज पेरलें गेलें! आश्रमधर्माला अत्यंत घातक, लोकसंग्रहाला अत्यंत अनिष्ट असें हें जाबालवचन आहे. याचाच जो संन्यासवृक्ष पुढें फोफावला त्याचीं कडवट फळें अद्याप चाखावीं लागत आहेत. गौतम बुद्धानें या वचनाचा यथास्थित फायदा घेतला म्हणून हें उपनिषत् बौद्धमत निदर्शक आहे, असेंहि म्हणता येईल. बुद्धापूर्वी फक्त ब्राह्मणांना संन्यास विहित होता. बुद्धानें सर्व जातांना संन्यासाचें द्वार मोकळें करून मोक्षाची पाणपोई उघडली. उपनिषदांमध्यें ज्ञानाची सहज स्थिति म्हणून संन्यास वर्णिला आहे. पण बुद्धानें ज्ञानाची एक अवश्य पूर्वावस्था म्हणून संन्यासाचें समर्थन केलें. त्यामुळें संन्यासाची सहज स्थिति जाऊन तेथें कृत्रिमता आली व आडंबरी वैराग्य दाखविणें भाग पडूं लागलें. भोगनोत्तर तृप्तीच्या टेकरा स्वाभाविक येतात. तशा पूर्णकाम व आप्तकाम झाल्यावर निवृत्तीच्या लहरी सहज उठतात. बुद्धाच्या 'जगत् दुःखमय' या तत्त्वज्ञानानें त्याग व निवृत्ति यांतील सहजता गेली. व

---

* याचें भाषांतर प्रकरण ५ पान ७६ पहा.

तृष्णेच्या अभावीं चित्ताच्या ठेकरा जशा येतात तसा प्रकार झाला. जगत् दुःखमय आहे, मग या जगात राहा कशाला? मेलेलेंच बरें! पण आत्महत्या करणें वाईट, यास्तव जगात जिवंत असून मेल्याप्रमाणें राहण्याची अवस्था म्हणजे संन्यास होय, या बुद्धीनें जो तो भिक्षु होऊ लागला. बुद्धाला जगात दुःख, दैन्य, घाण, व अपवित्र्यच दिसत होतें. त्यातून मुक्त होण्याकरिता त्यानें दुःखविलयात्मक तत्त्वज्ञानाला पोषक म्हणून सर्वांना संन्यास सांगितला. संन्यासामध्यें अधिकारभेद ठेविला नाहीं व तारतम्यही ठेविलें नाहीं. स्मृतिकारानी आश्रमव्यवस्थेमध्यें प्रवृत्तिनिवृत्तीची म्हणजे गृहस्थ व संन्यास याची योग्य व्यवस्था केली होती. पण बुद्धाला चातुर्वर्ण्यविरुद्ध मोठी सामाजिक क्रांति करावयाची होती म्हणून त्यानें ती व्यवस्था लाथाडली व जाबालोपनिषत्सदृश वचनाचा आधार घेऊन सर्वांना संन्यासाचें द्वार खुलें केलें. दुःखविलयात्मक निर्वाणाला संन्यास घेणें, भिक्षु होणें, हाच उपाय आहे, असें त्याचें स्पष्ट मत होतें. जो जो भिक्षु होईल तो तो निर्वाणपदाला जाईल, या तत्त्वामुळें गृहस्थाश्रमाचें महत्त्व कमी झालें. समाजांतील लोकांपुढें चतुर्विध पुरुषार्थप्राप्तीचें साधन गृहस्थाश्रम हेंच ध्येय असावयास पाहिजे. बुद्धपूर्वकालीं हें ध्येय होतें. पण बुद्धानें विवाह करणेंच चांगलें नसून भिक्षु होणें हें चांगलें या मताचा जोरानें पुरस्कार केला व समाजापुढें संन्यास हें ध्येय ठेविलें. गृहस्थाश्रमी मनुष्यानें भिक्षु व भिक्षुणी याना दानधर्म करावा, त्यांचा योगक्षेम चालवावा व नीतानें वागावें असें तो म्हणे. जाबालोपनिषदाची छाप बौद्ध मतावर आणि बौद्ध मताचा छाप आचार्यप्रभावर पडली आहे यात संशय नाहीं. ' **ब्रह्मचर्याश्रमादेवगृहीतसंन्यासिनाम् परमहंसपरिव्राजकाणां मोक्षेऽधिकार** ' अशा आशयाचीं वाक्यें आचार्यभाष्यांत कित्येक ठिकाणी दिसतात, त्याचें कारण हेंच होय. तिपिटक या बौद्धधर्मग्रंथामध्यें बौद्ध मताचें प्रतिबिंब चांगलेंच पडलेलें आहे. त्यातील विनयपिटकामध्यें सर्व भिक्षु-भिक्षुणींच्या आचाराचे नियम दिलेले आहेत त्यांवरून बुद्धाचीं मतें कशी आहेत हें पाहूं.

**तिपिटकांतील संन्यास**—तिपिटकामध्यें निवृत्ति उत्पन्न होईल, अशा अनेक कथा आहेत. त्यांपैकीं काहींचा सारांश ज्ञानकोशावरून येथें देतों. " कांहीं तरुण आपल्या स्त्रियांसह मद्य मारण्याकरता बाहेर गेले. एकानें स्त्री नसल्यामुळें बरोबर एक कुमारी घेतली. तिनें बाहेर जाताच त्याच्या सर्व वस्तु

**बौद्ध भिक्षु व भिक्षुणी यांचा अध:पात**-बुद्धानें भिक्षु व भिक्षुणी यांविषयीं पुष्कळ नियम घालून दिले होते. पिंवळा पोषाक करावा, मद्यमांसापासून निवृत्त असावं, पावसाळ्याशिवाय एका ठिकाणीं राहू नये, सारखा धर्मप्रसाराय संचार करावा, भिक्षा मागून निर्वाह करावा, एक वेळ जेवावें अरण्यांत रहावें, तत्त्वचर्चा करावी, इत्यादि परंतु बुद्धाच्या या आज्ञेप्रमाणें भिक्षूचें वर्तन त्याच वेळीं घडेनासें झालें बौद्ध भिक्षूसाठ जे विहार बांधले असत त्यातच हे भिक्षु पुढे निरंतर राहू लागले व त्यांना अरण्यवास सोडला बुद्धिमत्ता, कळकळ व संयाची चाड यांतही हे भिक्षु पुढें दिवसेंदिवस कमी ठरले व यांपैकी कांहींचें तर शहाणपण शब्दावडंबर व तर्कावडंबर यांतच खर्च होऊ लागलें भिक्षूंयाकरिता मठ, विहार सभागृहें व राजधानी या ठिकाणीं दिवाणखानेही असत पण त्याचा पुढें पुढें दुरुपयोग होऊ लागला पोट भरण्याचा सर्वांत सोपा धंदा भिक्षु होणं हा झाल्यामुळें नीच व हलक्या कुला तल्या लोकांचा त्यांत भरणा झाला त्यामुळें भिक्षूमध्यें मुंडश्रावक, जटिलक, गोगण्डिक तदंडिक, अविरुध्दक, गोतमक वगैरे भेद पडले या सर्व भिक्षूमध्यें बरेच भिक्षु बुध्दिमान् नीतिमान् व आचारवान् होते सर्वच कांहीं तसेच होते असें म्हणता येत नाहीं भिक्षुसंघाप्रमाणें भिक्षुणींचे संघहि स्थापन झाले स्त्रिया विषयी बुद्धाचा अत्यंत तिरस्कार असे त्याना बौध्द भिक्षुणीची दीक्षा देऊ नये असें त्याचें मत होतें परंतु बुध्दाचा पट्टशिष्य जो आनंद त्याच्या आग्रहावरून त्यानें स्त्रियांना भिक्षुणी करण्याची अनुज्ञा दिली पण त्या वेळीं गौतमानें असे उद्गार काढले कीं " माझा धर्म जो कित्येक वर्षे टिकणार होता तो आता ५०० वर्षें आधी नामशेष होईल पुढें खरोखरच बुद्धाच्या वरील उद्गाराप्रमाणें स्थिति झाली बौध्दभिक्षु आणि भिक्षुणी यांचा धगधगीत व जाज्वल्य वैराग्यवृत्ति पूर्ण मावळली त्यामध्यें चैन व विलास यांचा शिरकाव झाला मोठमोठ्या विहारांमध्यें हजारों भिक्षुभिक्षुणी रहात असत त्यांचें साहचर्य कांही काल धर्मप्रसाराला उपयोगी पडलें पण पुढें जो उठला सुटला तो भिक्षु होऊ लागला व पाहिजे ती स्त्री भिक्षुणीसंघात येऊ लागली त्यामुळें विहारांची पवित्रता व उदात्तता जाऊन विहार म्हणजे अनाचाराचे कारखाने बनले गांवांत जे अनाचार दुराचारी मनुष्य करीत ते बंद पडले, पण भिक्षु व भिक्षुणी यांनीं गच्च भरलेले आणि शहरवजा झालेले विहार हे

अनीतीचें माहेरघर बनले! बुद्धाच्या अनुयायांमध्यें मात्र क्षत्रिय, वैश्य व शूद्रादींची संख्या अधिक असल्यामुळें असा प्रकार घडला. बुद्धाच्या पश्चात् अशोकानें धार्मिक घोटाळे कमी करण्याकरितां एक धर्मसमिति बोलावली, त्यावेळीं त्या समितीस आलेल्या भिक्षूंपैकीं सुमारें साठ हजार भिक्षु दुच्चये आढळले, म्हणून त्यानें त्यांची हाकालपट्टी केली.

शुंग घराण्यांतील पुष्यमित्रानें अशोकानंतर बौध्द भिक्षूंचा छळ केला तो त्यांच्या अनाचारामुळेंच केला अशी माहिती मिळते. कनिष्काच्या कारकीर्दीमध्यें बौध्द भिक्षूंचे प्रस्थ दर्शांचे होते असें म्हटल्यास चालेल. वैदिक धर्माभिमानी जो समुद्रगुप्त त्याच्या राजवटींत भिक्षूंचे बंड कांहीं कमी नव्हतें. चिनी प्रवासी फाह्यान हा त्या वेळीं हिंदुस्थानांत आला होता. त्याला सिंधुनदीपासून मथुरेपर्यंत हजार पांचशें बौध्द मठ आढळले, त्यांत लाखों भिक्षु राहात असावेत असें त्यानें लिहिलें आहे. या सर्व मठांना राजाकडून मोठमोठ्या देणग्या होत्या त्यामुळें भिक्षूंची चांगली चंगळ घाले. सम्राट् हर्ष हा निपुत्रिक असल्यामुळें म्हातारपणीं त्याचा ओढा बुद्धधर्माकडे वळला. तो दर पांच वर्षांनीं आपली सर्व संपत्ति मोठा समारंभ करून बौद्ध, ब्राम्हण व श्रमण यांना अर्पण करीत असे. बौद्ध भिक्षूंवर सोनें, रत्नें, उंची वस्त्रें यांचा पाऊस पाडण्यांत हर्षानें आपला हात आखडता घेतला नाहीं. जगप्रसिध्द चिनी प्रवासी ह्युएनसंग हा हर्षाच्या कारकिर्दीत हिंदुस्थानांत आला होता. त्यानें इकडे हर्षराजानें बांधलेले शेंकडो मठ व स्तूप पाहिले. हर्षाच्या दानधर्मावर लाखों भिक्षु जगत असत; असें तो म्हणतो. हर्षाच्या वेळच्या भिक्षूंचें वर्णन बाणभट्टानें लिहिलेलें आहे. त्यावरून या भिक्षूंमध्यें उदरंभरी, अधार्मिक, शिक्षणशून्य असे लोक असल्यामुळें ते लोकांच्या तिरस्काराला पात्र झाले होते असें दिसतें. पाराशरी म्हणजे बुच्च्या लफंग्या, यामध्यें अधार्मिक नाहीं असा मनुष्य विरळा अशी समजूत त्या वेळीं झालेली होती असें बाणभट्ट लिहितो. इ. स.८४५त बुरसंग नामक बादशहानें चीन देशांतील भिक्षुभिक्षुणींचे अनाचार पाहून त्यांचीं सुमारें २॥ लक्ष लग्नें लाविलीं असें ज्ञानकोशकार लिहितात. वर्णाश्रमधर्माप्रमाणें फक्त ब्राम्हणांना संन्यास विहित असतां बुध्दानें तो सर्वांना देऊन दुःखविलयात्मक निर्वाणाचा मार्ग खुला केल्यामुळें शकपूर्व ६०० ते शकोत्तर ८०० म्हणजे सुमारें १५०० वर्षे भिक्षु, संन्यास, निवृत्ति, यांचाच

प्रवाह मारगा सुरू झाला होता. पुढें शंकराचार्यांना परिस्थितीमुळें या प्रवाहापुढें मान वाकवावी लागली व अवैदिक संन्यासाला वैदिक संन्यासाचें रूप देऊन त्याचा पुरस्कार करावा लागला. आचार्यपूर्वकालच्या संन्यासाचा हा असा इतिहास आहे.

**उदरंभरू परिव्राटाचा सुळसुळाट**—बुद्धानें स्वातंत्र्य, समता व बंधुता या भावनांच्या बडाचें निशाण उभारलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्याचा परिणाम काय झाला व अद्याप तो कसा दिसत आहे याची कल्पना यावी म्हणून नासदीयसूक्तभाष्यकर्ते श्री. राजवाडे यांच्या ग्रंथातून पुढील उतारा देतों. ' बुद्धापुढील काळात वैदिक, अवैदिक, आर्य व अनार्य, मती व अमती, स्नातक व अस्नातक, साग्निक व निरग्निक, ब्राह्मण व चांडाल या सर्वांनीच सरसहा प्रव्रज्येचा मुखेनैव अंगिकार केला व तेव्हापासून या देशात अशा बेजबाबदार, धर्मशून्य किंवा कर्तव्यहीन परिव्राटांचा जो सुळसुळाट झाला त्यायोगें धर्माला कायमचें हीनत्व आलें. अशा स्थितीत व्यक्तीला समाजाचें बंधन नाहीं व धर्माची उपाधी नाहीं, म्हणून स्वतः कर्माची जबाबदारी नाहीं व संसाराची काळजी नाहीं, तर केवळ स्वात्ममोक्षार्थ जगताला ताप देऊन आणि पुन्हा त्या जगताची निंदा करून देहाचा योगक्षेम उत्तम चालवावा व त्या सुखाला आत्मानंद ब्रह्मानंद इत्यादि मोठमोठ्या नावांनी संबोधावें ही वृत्ति आहे. मूळ चातुर्वर्ण्यसमाजात फक्त एका ब्राह्मणालाच गृहस्थाश्रम संपविल्यानंतर परिव्राजकत्व विहित होतें. पण जाबालोपनिषदासारखीं उपनिषदें झाल्यानंतर पुढें कोणीही धर्मभ्रष्ट किंवा धर्मबाह्य असलाच धर्मबंध न राखता परिव्राट् होऊ लागला. असे सर्व ( नियत ) कर्मत्यागी परिव्राट् बुद्धपूर्वकाळीं अनेकदा इतस्ततः वावरू लागले व त्यायोगें ब्राह्मणांच्या अत्याश्रमाचें महत्त्व लोकांच्या डोळ्यातून पार उतरलें. असे काहीं परिव्राट् येणेंप्रमाणें—

१ संन्यासी, २ वैरागी, ३ वन्यासन, ४ तापस, ५ गोसावी ६ अवधूत, ७ हंस, ८ परमहंस, ९ दंडी, १० मुंडी, ११ मस्करी, १२ जोगी, १३ चरक १४ शाक्य, १५ श्रावक, १६ श्रमणक, १७ भिक्षु, १८ रक्तपट, १९ जिनकल्पी, २० सांख्यवादी, २१ निगंठ, २२ तेरासीय, २३ आजीविक, २४ अच्छल्क, २५, एकमातक, २६ हस्त्यापलेखक, २७ श्वेतवासस् २८ दिग्वासस्, २९ जटाधारी, ३० कृष्णवसन इत्यादि

**भिक्षेकऱ्यांचें पेव**—याच संन्यासी लोकांमधून पुढें भिक्षेकरी वर्ग निर्माण झाला. भिक्षावृत्तीला फाजील उत्तेजन बौद्ध धर्मानें दिलें, त्यामुळें उदरंभरू व आळशी अशा लोकांना भीक मागून पोट भरण्याचा बिनभांडवली उत्तम धंदा मिळाला! बौद्ध धर्माच्या उत्कर्षकालीं भिक्षूंबद्दल आदरबुद्धि होती म्हणून त्यांचा योगक्षेम यथास्थित चाले. पण पुढें तो आदर गेल्यावर हे भिक्षु लोकांना भिक्षा मागून सतावूं लागले. निरनिराळ्या स्वरूपानें या भिक्षेकऱ्यांची संख्या हिंदुसमाजांत सांप्रत पुष्कळ आहे. लेखकाच्या माहितीप्रमाणे अवधूत, कानफाटे, गिरी, पुरी इत्यादि प्रतिष्ठित पंथाचे भिक्षेकरी वैरागी कांहीं नाहीं तरी ३,००,००० आहेत! अत्यंत बेजबाबदारपणें आयुष्यक्रमणा करीत, जगाची निंदा करून, जगावर जगणारा हा वर्ग व त्यासंबंधानें समाजांत असलेला परमार्थदृष्टीचा आदर पाहिला म्हणजे मन आश्चर्यचकित होतें. भिक्षुवर्गांतून जसा भिक्षेकरी वर्ग उत्पन्न झाला त्याचप्रमाणें भिक्षुणींतून लग्न न करतां देवाच्या नांवावर आयुष्य काढणारा वर्गही निघाला. देवाला मुली अर्पण करण्याची चाल व देव नवरा समजून राजरोस अनाचार करण्याची चाल खंडोबाच्या मुरळ्यांत आहे व यल्लम्माच्या जोगत्यांत आहे. जोगत्या व जोगप्पा, वाघ्या व मुरळी आणि अशा प्रकारची लग्नविरहित देवाच्या नांवचीं जोडपीं पाहिलीं म्हणजे बौद्ध-कालीन भिक्षुभिक्षुणींचें स्मरण होतें हें खास *.

**जगन्मिथ्यात्व व बौद्धतत्त्वज्ञान**—श्रीशंकराचार्यांच्या पूर्वी संन्यास, निवृत्ति व दुःखनिरासात्मक तत्त्वज्ञान यांचा प्रवाह उपनिषदांपासून चालू होता. त्यालाच आचार्यांनीं मान वाकविली. आचार्यांच्या पश्चातही तीच परंपरा गिरि व पंथांतील आचार्यांनीं व संतांनीं चालविली. त्यामुळें समाजापुढील प्रवृत्तिपर कर्मयोगाचें ध्येय जें एकदा नष्ट झालें तें झालें. जगांत कांहीं कर्तव्य आहे, कांहीं रहस्य आहे, ही बुद्धि पूर्वी नष्ट झालेली होती, ती जगन्मिथ्यात्वाच्या तत्त्वज्ञानानें अधिक अढळ राहिली. जगन्मिथ्यात्वाच्या तत्त्वज्ञानावर सुद्धां बौद्ध तत्त्वज्ञानाचीं पुटें चढलेलीं दिसतात. वाचकांना त्या तत्त्वज्ञानाची थोडी छाननी केली पाहिजे.

---

* टीप—प्रौढ व तरुण कुमारिकांनी भिक्षुणी होऊं नये म्हणूनच लवकर लग्नें करून टाकण्याची चाल व्यवहारांत आली असावी.

बौद्ध धर्म म्हणजे वैदिक धर्मविरुद्ध जे जे भावनातरंग बुद्धापर्यंत उठले होते, त्या सर्वांचा तो स्फोट होय कारण वैदिक धर्मविरुद्ध जी जी धार्मिक, नैतिक व तत्त्वज्ञानविषयक मतें निघालीं होतीं, त्या सर्वांचा अन्तर्भाव बौद्ध धर्मांत झाला होता. बौद्ध व जैन हे पंथ एकाच काळीं वैदिक धर्माशीं स्पर्धा करीत होते त्यांनी वेदांबद्दल अनादर उत्पन्न केला, कर्माचें महत्त्व कमी केलें, यज्ञाला गौणत्व आणलें, ज्ञानाचा जयजयकार केला, समाजाचा धिक्कार केला, मनुष्याचें जीवित दु खमय ठरविलें आणि दु खविल्याकरितां संन्यासाचा स्तव पुरस्कार केला शंकराचार्य व बौद्ध यांच्या तत्त्वज्ञानांची तुलना केल्यास दोघांचीं तत्त्वज्ञानें जगाच्या दृष्टीनें निराशाजनक आहेत एक जगत् दु खमय मानतो, तर दुसरा तें मिथ्या मानतो एकाला जगात दु ख दिसत होतें, तर दुसऱ्याला द्वैत दिसत होतें एकाची दृष्टि दु खनाशाकडे होती, तर दुसऱ्याची दृष्टि अद्वैतप्राप्तीकडे होती दोघानांही जगाबद्दल प्रम नव्हतें शंकराचार्यांचें नाव घेतलें की संन्यास व जगन्मिथ्यात्व हीं दृष्टीपुढें उभीं राहतात त्याप्रमाणें बुद्धाचें स्मरण होताच दु खवाद व भिक्षु हीं पुढें उभीं राहतात एक वैदिक होता व दुसरा अवैदिक होता एक वेद, देव यज्ञ याचा उघड निंदा करीत असे तर दुसरा प्रच्छन्न बौद्ध आहे की काय असें लोकाना वाटे दोघेही जगाच्या दृष्टीने निराशावादीच होते एकाला जगात सर्वत्र दु ख दिसत होतें तर दुसऱ्याला सर्वत्र माया दिसली जगत् माया, कर्म माया, वेद माया, धर्म माया, यज्ञ माया, समाज माया,' राष्ट्र माया, वेद माया, सारांश माया व मिथ्या या शब्दांनीच हें तत्त्वज्ञान त्यांना समजलें होतें बुद्ध जगताला दु खमय मानतो तर आचार्य तें मायामय मानतात व तें सदसद्विलक्षण अनिर्वचनीय आहे असें सागतात दोघेही जगाच्या दृष्टीनें जगाला कंटाळलेलेच दिसतात बुद्धाच्या तत्त्वज्ञानात शून्य निर्वाण होतें तर आचार्यांच्या तत्त्वज्ञानात ब्रह्म निर्वाण होतें

**शांकर यति व बौद्ध भिक्षु**--शांकर आचारविचारात मुद्दा बौद्ध भिक्षूंची छाप अधिक असल्यामुळें शांकर मतात व बौद्धमतात परिणामीं फरक काय, अशी शंका त्यावेळीं कित्येकास आली असावी व ती दूर करण्याकरितां बौद्ध व सांख्य यतिधर्म वदवाय अतएव योग व शांकर संन्यासधर्म वैदिक म्हणून खरा अशा अर्थाचें समर्थन त्यांना छांदोग्य उपनिषदावरील भाष्यामध्यें करावें लागलें बुद्धानें जगाला दु खमय ठरविलें, आचार्यांनी

जगाकडे दुर्लक्ष करून त्याचा उद्धार न करतां शून्य निर्वाणाच्या ऐवजीं ब्रम्ह-निर्वाण पुढें आणलें. बौद्ध तत्त्वज्ञानानें समाजांत जी पौरुषहीनता व नैराश्य आलें होतें. तें कांहीं आचार्यांच्या तत्त्वज्ञानानें पुसलें गेलें नाहीं. अहिंसेच्या अतिरेकानें क्षात्रवृत्तीचा नाश झाला होता. यज्ञकर्मे नष्ट होऊन मूर्तिपूजेचें बंड वाढलें होतें, आणि संन्यास, निवृत्ति, यांचें जें प्रस्थ माजलें होतें, तें आचार्यां-नंतर नष्ट झालें नाहीं. म्हणून पुष्कळांना असा संशय येतो कीं आचार्यांनीं बुद्धाला जिंकलें कां बुद्धानें आचार्यांना जिंकलें ?

**कोणी कोणाला जिंकलें**—आचार्यांनीं पांडित्यप्रचुर वाद करून मोठमोठे ग्रंथ लिहून बौद्धांचें खंडण केलें, हें असें खरें आहे, तसेंच बौद्ध धर्मांतील ज्या वृत्तींचा, भावनांचा, व तत्त्वांचा संस्कार जनमनावर झाला होता तो त्यांना मुळींच खोडतां आला नाहीं, हेंहि तितकेंच खरें आहे. बौद्धधर्माची हिंदुस्थानांतून हकालपट्टी झाली असें म्हणण्यापेक्षां वस्तुतः बौद्ध धर्मानें वैदिक धर्माला बौद्ध-स्वरूप करून ठेविलें असें म्हणणेंच योग्य आहे. आज जो हिंदुसमाज विद्यमान आहे, त्याला वैदिक हिंदु म्हणण्यापेक्षां बौद्ध हिंदु म्हटल्यास वावगें होणार नाहीं. सनातन वैदिक धर्मांतील प्रवृत्तिपरता, चतुर्विध पुरुषार्थांकरतां अखंड उद्योग, जगाकडे रहस्यपूर्ण दृष्टीनें पाहणें व लोकसंग्रहार्थ निष्काम कर्मयोग या वृत्ति ज्या आचार्यपूर्वकालीं मावळल्या होत्या त्या तशाच राहिल्या. संन्यास, निवृत्ति, व जगन्मिथ्यात्व यामुळें समाजाचें ध्येय जें बदललें, तें कांहीं पुन्हा सुधारलें आलें नाहीं. मोक्षाच्या एकदेशीय तत्त्वज्ञानानें समष्टिधर्म पूर्ण नाहीसा झाला व व्यष्टिधर्म बळावला. तसेंच वैदिक देवता, वैदिक सत्र व वैदिक तत्त्वज्ञान होंहीं या प्रवाहांत बुडालीं गेलीं. लोक आपल्या नवीन देव-तांना मान देऊं लागले. हिंसाप्रधान यज्ञ क्वचित् होत असत, पण ते नवीन देवतांना उद्देशून होऊं लागले. यज्ञकर्मांत ब्राह्मणांचें वर्चस्व असे तें पुढें यज्ञाभावीं हळूहळू कमी झालें. वैदिक देवतांना न मानणाऱ्या व त्यांची पूजा न करणाऱ्या लोकांसाठीं नवीन दैवतकल्पनांना अनुसरून नवीन वाङ्मय बन-वावें लागलें. मात्र त्यांत चरित्रांना ऐतिहासिक व तात्त्विक दृष्टी नष्ट झाली व जुनें शास्त्रग्रंथ [illegible] आले. वैदिक व स्मार्त संस्कृति नष्ट होऊन केवळ पौराणिक संस्कृतीच्या माध्यमानेच सर्व समाजावर छाप पाडली आली. त्यामुळें फारच थोड्या लोकांना वैदिक परंपरेचा बोध घेण्याचा कायम ठेवितां आला. सारांश,

बौद्ध धर्माशीं झुंज देतां देतां आपलाच जय झाला इतकें सांगण्यापुरता वैदिक धर्म वांचा राहिला. हा जय म्हणजे पानपतच्या स्वारींत अबदालीला मिळा-लेल्या जयासारखाच होता. तो जिवंत राहिला म्हणून त्याचा जय झाला इतकें सांगण्यापुरताच तो जय होता.

**सन्यास हें समाजाचें ध्येय**—शंकराचार्यांच्या पश्चात् माध्व, रामानुज, वल्लभ, रामानंद, चैतन्य इत्यादि सन्यासी आचार्य झाले हे सर्व वैदिक होते, ते निरनिराळ्या तत्त्वज्ञानविषयक पंथाचे पुरस्कर्ते होते. द्वैत, अद्वैत, विशिष्टाद्वैत, शुद्धाद्वैत इत्यादि वादांनीं जगन्मिथ्यात्व नष्ट केलें नाहीं, म्हणून जगाच्या दृष्टीनें समाजाला या तत्त्वज्ञानाचा फायदा फारसा झाला नाही. उलट हे आचार्य जगद्गुरु व मोक्षगुरु या नात्यानें लोकांत वावरू लागल्यामुळें बौद्धकालीन भिक्षु-प्रमाणें या कालांत सन्याशाचें वैभव वाढलें. आचार्यपूर्वकालीं भिक्षु व दुःख विलयात्मक तत्त्वज्ञान हीं ध्येय ठेवून समाजाच्या ज्या हालचाली होत होत्या त्या आचार्योत्तर कालांत निवृत्ति सन्यास व द्वैताद्वैतादि एखादें तत्त्वज्ञान या ध्येयानें होऊं लागल्या. या सन्यासी आचार्यांचे मठ उपमठ स्थापन होऊन सन्यासाश्रमाची चलचलाट झाली. भिक्षूंचे विहार गेले व आचार्यांचे आणि सन्याशांचे मठ स्थापन झाले. बुद्ध भिक्षूंमध्यें जसे भेद पडले होते तसे सन्या-शामध्येंही कुटीचक बहूदक, हंस, परमहंस, तुरीयातीत व अवधूत असे भेद पडले. वैदिक कर्मयोगी गृहस्थाश्रमाचें ध्येय जें उपनिषदांतील ब्रह्मवेत्त्यांनीं, बौद्ध भिक्षूंनी, व सन्यासी आचार्यांनीं नष्ट केलें त्याचा उठाव आचार्यकाळा नंतर झालेल्या साधुमतांनाही करतां आला नाही.

**साधु हें समाजाचें ध्येय**—शंकराचार्य ( ७४२ ), रामानुजाचार्य ( १०१८ ), माध्व (११९८), वल्लभ ( १४०१ ) इत्यादि आचार्यांनंतर सुमार बाराव्या शतकापासून भक्ति व साधु यांचें महत्त्व समाजांत वाढलें. भक्तीचें महत्त्व पूर्वकालीन आचार्यांनी प्रतिपादिलें होतेंच. त्या भक्तिमार्गाचा पुरस्कार संतांनी केला, तेव्हांपासून साधुसंत व भक्ति हीं समाजाचीं ध्येयें बनलीं. जगन्मिथ्यात्व हें कायमच राहिलें. तत्त्वविचार करण्याचें सामर्थ्य कमी झालें व भाक्त वाढविणें साधनचतुष्टयसंपन्नता हा अधिकार तत्त्वज्ञानाकरितां लागे, पण भक्तांच्या नवयुगांत संसारतापानें तप्त झालेले व त्रिविध तापानें पोळलेले लोक मोक्षाधिकारी होऊं लागले ! ! म्हणजे एका विशिष्ट परि-

स्थितीनेंच त्यांना सहज अधिकार मिळाला. भक्तीचा अतिरेक होऊन सन्यासाचे जागीं साधु आले व तत्त्वज्ञानाचे जागीं एकदेशी भक्ति आली भक्ति व साधु या तत्त्वांभोवती चार पांचशें वर्षें समाज सारखा फिरत होता. त्याचा परिणाम समाजावर अनिष्ट होऊन निवृत्तिपरता, नैराश्य, अल्पसंतुष्टपणा, उदासीनता हे दुर्गुण वाढले जगाला मिथ्या म्हणत निर्वाहापुरत्या अन्नाच्छादना च्या दृष्टीनें समाजाच्या हालचाली होऊं लागल्या. या सर्व दुबळ्या वृत्तींचा फायदा मुसलमानांनी घेऊन आर्यसंस्कृतीस नष्ट करण्याचा त्यांनी उद्योग आरंभिला. आर्यसंस्कृतीच्या अपकर्षाला कारणीभूत झालेली जी मुख्य गोष्ट तिची परंपरा उपनिषत्कालापासून संतकालापर्यंत ही अशा प्रकारची आहे निवृत्तिपरता व संन्यास, भिक्षु व दुःखवाद, संन्यास व जगन्मिथ्यात्व, भक्ति व साधुत्व एतन्मूलक म्हणून हीं ध्येयें ठेवून समाजाच्या हालचाली कित्येक हजार वर्षें चालल्या आहेत जगत् हें ईश्वराचें लीलाकैवल्य आहे त्याचें धारणपोषण होण्याकरतां लोकसंग्रहार्थ अखंड निष्काम कर्म केलें पाहिजे या परंपरेचें पुनरुज्जीवन संतांनीं, आचार्यांनीं, भिक्षूंनीं व ब्रह्मवाद्यांनी केलें नाहीं, तर बुद्धिपुरःसर असो वा अबुद्धिपुरःसर असो किंवा तत्कालीन परिस्थितीनें भाग पाडलें म्हणून असो या ध्येयाला प्रतिकूल असेंच वर्तन वरील सर्वांच्याकडून घडलें बाराव्या शतकापासून सोळाव्या शतकापर्यंत संतमुखांतून चालत आलेलें तत्त्वज्ञान अभ्युदय दृष्ट्या कसें होतें हें पुढील उताऱ्यावरून समजेल

**साधुसंतांचें तत्त्वज्ञान**—ज्ञानेश्वरापासून तुकारामापर्यंत तात्त्विक ऊर्फ तत्त्वज्ञानात्मक स्थितीचा पगडा महाराष्ट्रावर बेसुमार बसलेला होता त्यामुळें राष्ट्रीय ज्ञानाचा मुख्य आधारस्तंभ जो इतिहास त्याचा उदय ज्ञानेश्वरापासून तुकारामापर्यंतच्या कालांत झाला नाहीं "ब्रह्म सत्य जगन्मिथ्या" असें मत ज्याशीं बाळगणारें तें तत्त्वज्ञान, त्याला जगत् जो संसार अथवा प्रपंच अथवा समाज त्याचें चरित्र जाणून घेण्यांत कोणता फायदा आहे? परब्रह्माची, विठोबाची प्राप्ती करून घेण्याला ज्यांनीं तनु, मन, व धन अर्पण केलें, त्यांना संसाराची व समाजाची वास्तपुस्त करण्याला सवड न राहाणें अशक्य आहे ज्ञानेश्वरापासून तुकारामापर्यंतचें तत्त्वज्ञान हें असें इतिहासाला म्हणजे समाजाला म्हणजे प्रपंचाला सोडून होतें अर्थात् ऐतिहासिक तत्त्वज्ञानाचा म्हणजे प्रपंच

व परमार्थ यांच्या एकवाक्यतेचा उदय त्या काळीं होणें अशक्य होतें तो उदय रामदासांच्या हस्तें झाला

म. इ. सा. ग. ६, प्रस्तावना पृ. ७८.

वरील उताऱ्यात अभ्युदयोन्मुख तत्त्वज्ञानाचा उदय समर्थ रामदासाच्या हस्तें झाला असें म्हटलें, हें खरें आहे. कारण तत्कालीं प्रचलित असलेल्या ग्रंथांमध्यें कर्मयोगाचें रहस्य उत्कृष्ट प्रामादिक भाषेंत लिहिलेलें जर कुठें आढळत असेल तर तें दासबोधांतच आढळतें. पण महाराष्ट्रधर्माचें तत्त्वज्ञान समर्थांच्या पश्चात् मकरंदस्वामींनीही सांगितलें नाहीं किंवा दुसऱ्या कोणा सांगितल्याचें अद्याप प्रथाधारें पुढें आलें नाहीं सर्व वेदांतील साहित्यिक वाङ्मय, मनुस्मृति, महाभारत, गीता, कौटिलीय अर्थशास्त्र, समर्थांचे काहीं ग्रंथ, व गीतारहस्य यांत जे अभ्युदयोन्मुख विचार आहेत, यांची अखंड परंपरा जर समाजात चालली असती तर आर्यसंस्कृतीचा अपकर्ष केव्हांही झाला नसता. कर्मयोगी राम, कृष्ण, जनक, याज्ञवल्क्य यानीं आचरलेली राजर्षींची परंपरा मुळून सन्यास, निवृत्ति, भिक्षु, दु:खवाद व जगन्मिथ्यात्व यांचा प्रसार समाजांत अतिरिक्त झाला त्याचें अजीर्ण होऊन आज समाज मृत्युशय्येवर पडला आहे

———••———

# प्रकरण सातवें

## मीमांसकांचें अपूर्व

**प्रकरणप्रस्ताव**—गेल्या दोन प्रकरणांत बौद्धांचा दु:खवाद, आचार्यांचा सन्यास, व जगन्मिथ्यात्व आणि संतांचें साधुत्व व भक्ति यांपासून उत्पन्न झालेली निवृत्ति आर्यसंस्कृतीच्या अपकर्षाला कशी कारणीभूत झाली याचा विचार केला. या प्रकरणात धर्मवादी गृहस्थाश्रमी जे मीमांसक त्यांच्या अपूर्वामुळें समाजावर उत्कर्षाच्या दृष्टीनें कोणते परिणाम झाले हें पाहावयाचें आहे

**बौद्ध क्रांतीचा यज्ञावर परिणाम**—बौद्धान्या तत्वज्ञानामुळें व शिक्षवर्णामुळें ब्राह्मण व इतर वर्ण यांन्यामध्यें फारकत झाली. कारण बौद्धानुयायात ब्रह्मद्वेष्टया मात्यक्षत्रिय-वैश्याचाच बहुसख्य भरणा होता त्यातच पुढें अमात्यक्षत्रिय समाविष्ट झाले. यज्ञ व इतर वैदिक कर्में याच्या अभावामुळें ब्राह्मणाचा व इतर वर्णांचा सबध कमी येऊ लागला, म्हणून ब्राह्मणही तत्त्वज्ञान व गृह्यकर्मे यातच गढून राहिले. औपनिषद् तत्त्वज्ञानाचा परिणाम ब्राह्मणावरही झालेला होता. त्यामुळें त्यांचीहि यज्ञावर यथापूर्व श्रद्धा नव्हती बुद्धाच्या पश्चात् जे कर्मवादी मीमासक झाले, त्यानीं वैदिक यज्ञाचा उद्धार करण्याचे यत्न केले व त्याप्रमाण वर्णाश्रमधर्मी हिंदू सम्राटानीं अश्वमेधही केले, हें खर. पण ही यज्ञसस्था पुढच्या कालात अनेक कारणामुळें टिकली नाहीं असें दिसतें.

**यज्ञाचें वैदिक स्वरूप**—यज्ञाकडे जरा बारकाईनें पाहिल्यास त्याचे वैदिक स्वरुप निराळें होते असें प्रत्ययास येतें वेद व यज्ञसस्था याच्या साह्यानें आर्यांनी जगावे आक्रमण केले असे म्हणावें लागतें. यज्ञपुरस्सर वसाहती वाढवीत जाण्याचा आर्यांचा स्वभाव होता राक्षस यज्ञयागाचा जो विध्वस करीत, तो याचकरता की यज्ञ झाला म्हणजे त्या यज्ञभूमींत आर्यांचा कायमची वसाहत होई व राक्षसाना गचांडी मिळे. लो० टिळकानीं आपल्या ग्रथात ( आर्क्टिक होम ) " वर्फान्या प्रल्यामुळें ध्रुवावरचें मूलस्थान सोडून वाटेल तिकडे जाणें भाग पडल्यावर प्रतिकूल सकटाशीं झगडत, अनार्य लोकाना जिंकून त्याना आपलेसें करून आर्यांनी त्याच्यावर आपलें वर्चस्व स्थापन केलें व त्याना भाषा, आचार व विचार इत्यादि गोष्टीत आपल्यासारखे आर्य करून सोडलें, एवढया एकाच गोष्टीवरून आर्यांची मूळ सुधारणा कोणत्या प्रकारची होती याचे अनुमान होतें " हें जें आर्य-स्वभावाचें वर्णन केलें आहे, त्यावरून त्याच्या यज्ञस्वरूपावरही प्रकाश पडतो स्वाराज्य, वैराज्य, पारमेष्ठ्य, महाराज्य, आधिपत्य, इत्यादि वैदिक प्रार्थनावरून यज्ञसस्था ही आर्यांची राष्ट्रिय सस्था होती यात सशय नाहीं यज्ञप्रसगीं त्या वेळच्या राष्ट्रिय सामाजिक आकाक्षाना वाचा फुटे विद्वानाचा व वीराचा सन्मानहा होई. त्या ठिकाणी तत्वज्ञानविषयक चर्चा चालून इतर दाधहा पुढे येत द्यूतासारख्या व्यसनाचा निषेध होई हजारों जमातीचे लोक तेथें जमून वसाहती करताना पूर्वी केलेल्या घनघोर

संग्रामाचे अनुभव विचारात घेऊन भविष्यकाळी अनार्यांवर कसें आक्रमण करावें याचीहि चर्चा यज्ञप्रसंगी करीत. सारांश संहिताकाळीं यज्ञाचें जें राष्ट्रिय व उज्ज्वल स्वरूप होतें तें पुढें राहिलें नाहीं. कदाचित् सर्व हिंदुस्थानभर वसाहती झाल्यानंतर त्यांतील तेजस्वी वृत्ति जाऊन यज्ञ हे परलोकसंबद्ध झाले असावेत. यज्ञक्रिया ही पारलौकिक कल्याणाची अशी समजूत होऊन तिचा बुद्धोत्तर काळात उत्सवाचें स्वरूप आलें. सोमरसप्राशन, ब्राह्मणभोजन, दक्षिणादान, व सूतसत्कारांची चर्चा या गोष्टी यज्ञोत्सवांत होऊं लागल्या

**जैमिनी व शाबरकालीन यज्ञसंस्था**—जैमिनीसूत्रावरील भाष्यकार शाबर व कुमारिलभट्ट हे बुद्धोत्तर कालांतच झाले सूत्रकार जैमिनी बुद्धपूर्वकाळचे असावेत असें ठरतें पण शबराचार्य, भट्ट कुमारिल, व पार्थसारथिमिश्र यांच्या काळीं यज्ञाबद्दल समाजांत फारसा आदर नव्हता उपनिषदांतील ब्रह्मवेत्यांना ते स्वतः वैदिक परंपरेंतून वाढले होते म्हणून यज्ञ कर्माबद्दल फारसा अनादर होता असें नाही. पण मोठा उत्साह होता असेंही नाहीं बुद्धाच्या एकांतिक शिकवणीनें जगाबद्दल कंटाळा, संसाराबद्दल अप्रीति व संन्यासाबद्दल आवड ही जसजशी वाढली, तसतशी यज्ञावरील श्रद्धा कमी होत गेली. बुद्धाच्या अहिंसावादानें यज्ञसंस्थेवर मोठाच हल्ला केला व हिंसामय यज्ञ करणें पाप आहे, अशी वृत्ति समाजांत उत्पन्न केली. बुद्धानंतर जे मीमांसक झाले, त्यांनी बौद्धमताचें खंडण करून वैदिक विधि व यज्ञ यांची पुनश्च स्थापना केली

**वैदिक विधि व अपूर्व**—बुद्धानें अखिल कर्मकलाप त्याज्य ठरविले होते. त्यांतील वैदिक कर्मांचें पुनरुज्जीवन कुमारिलांनी केलें, पण मीमांसकांनीं वैदिक विधींचें मंडण करतांना बुद्धाचें शून्य निर्वाण मारण्याकरतां एक अपूर्व पुढें आणलें चुळा भरणें, शौचाला जाणें स्नान करणें अशा नित्य सहज कर्मांपासून तो वैदिक यज्ञकर्मापर्यंत सर्वांना त्यांनीं अपूर्वानें झाकून टाकलें का मंत्र कर्में अपूर्वोत्पत्तीकरितां केलीं पाहिजेत असा मीमांसकांनीं सिद्धान्त स्थापन केला भस्मानें वाचाळ्या भांड्यांची शुद्धि होते ( भस्मना कांस्यपात्र शुध्यते ) असें एक वाक्य आलें, तर त्याला विधायक वाक्याचें स्वरूप देऊन भस्मानेच काशाच्या भांड्यांची शुद्धि अपूर्वाकरतां विहित असून इतर कशानेंहि तें भांडें घासलें तरी शुद्धि होत नाहीं अशी परिभाषा त्यांनी सुरू

केली. वैदिक कर्म म्हणजेच धर्म, तें वेदांत सांगितलें आहे म्हणून केलेंच पाहिजे व तें जसें सांगितलें आहे तसें केलें पाहिजे तेथें चिकित्सा, चर्चा, वाटाघाट, कांहीं उपयोगी नाहीं कारण श्रुतीची कर्माबद्दल आज्ञा आहे कर्मापासून ऐहिक फल कांहीं नाहीं. सर्व कर्मांपासून अपूर्व उत्पन्न होतें व त्यामुळें स्वर्गप्राप्ति होते असें हे मीमांसक सांगत.*

**मीमांसकांचा पारलौकिक अभ्युदय**—मीमांसकांनीं संन्यास सांगितला नाहीं, जग मिथ्या म्हटलें नाहीं व गृहस्थाश्रम सोडला नाहीं पण या गृहस्थाश्रमी कर्मवाद्यांचें सर्व लक्ष अपूर्वाकडे होतें अतएव जगाच्या दृष्टीनें ऐहिक अभ्युदयाला अनुकूल असें कार्य त्यांच्याकडून कांहीं घडलें नाहीं मीमांसकांना स्वर्गरूपानें अभ्युदय पाहिजे होता त्यांना सुखें पाहिजे होतीं, पण तीं स्वर्गांतीं पाहिजे होतीं स्वर्ग म्हणजे सुखविशिष्ट असा एक मानीव लोक अशी त्याची कल्पना होती. स्वर्गांतील कामधेनु, तेथील चिंतामणी, तेथील उर्वशी, याकडे मीमांसकांचें लक्ष होतें. पुत्र, द्रव्य, उपभोग, किंवा जें कांहीं पाहिजे असेल तें सर्व यज्ञानें मिळतें, म्हणून विविध यज्ञ केले पाहिजेत अशा तत्त्वज्ञानामुळें याचा उपदेशही एकदेशी झाला ऐहिक पुरुषार्थांकरितां जागतिक स्पर्धेत धडाडानें पडलें पाहिजे, असें कांहीं मीमांसकांनीं म्हटलें नाहीं. तर सर्व ऐहिक व पारलौकिक आकांक्षा यज्ञानें व इतर वैदिक विधानींच सफल होतात, असें त्यांनीं सांगितलें बुद्धापासून शंकराचार्यांपर्यंतच्या कालांत पुष्कळ यज्ञ झाले व कांहीं अश्वमेधही झाले. पण त्यांतील प्रायश्चित्तें, त्यांतील कर्मांचा गुंतागुंत, त्याकरितां होणारा खर्च, त्याला आलेलें उग्रपणाचें स्वरूप आणि यज्ञामुळें मिळणाऱ्या अपूर्वाबद्दलचा संशय इत्यादि कारणांनीं ते पुढें लोकांना नकोसे झाले

**आंधळें अपूर्व व श्रीशंकराचार्य**—बुद्धाचें शून्य निर्वाण जसें आंधळें तसें मीमांसकांचें अपूर्वही एका दृष्टीनें आंधळेंच होतें बुद्धनिर्वाणाला मारण्याकरितां त्यांनीं अपूर्व पुढें आणलें पण अद्वैताच्या तत्त्वज्ञानापुढें तें टिकलें नाहीं

* धार्मिक आचारांमध्ये चर्चा, चिकित्सा, वाटाघाट यांना मीमांसकांनीं मुळींच जागा ठेविली नाहीं. कदाचित् बौद्धांच्या पाखंडी तर्कपरंपरेचे अनिष्ट परिणाम टाळण्याकरितां ही श्रद्धेची तोड काढली असावी.

तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रात आचार्यांएवढा जगन्मान्य ज्ञाता अद्याप झाला नाहीं म्हणून त्या दृष्टीनें आचार्यांचें भरीव कार्य जसें सव जगात ठसठशीतपणें दिसतें, तसें मीमांसकाचें काहीं दिसत नाहीं. त्याचें कारण आचार्यांच्या प्रज्ञ ज्ञानापुढें त्याचें अपूर्व फिकें पडलें हें होय मीमांसकांचा अभ्युदय म्हणजे स्वर्ग, अपूर्व म्हणजे स्वर्ग, तो स्वर्गही काल्पनिक सुखाचा व त्यापलीकडे काय? याला उत्तर नाहींच! म्हणूनच वैदिक कर्माचा चित्तशुद्धीशीं आचार्यांनीं संबंध जोडला व तोच पुढें मान्यही झाला किंवा कोणत्याही वैदिक कर्मापासून जसें अपूर्व उत्पन्न होतें, तसेंच तें कर्म चित्तशुद्धीलाही कारणीभूत होतें अशी विचारपरंपरा सुरू झाली मीमांसक हे कर्मयोगी नव्हते तर ते कर्मवादी होते म्हणूनच त्यांनीं जगाकडे दुर्लक्ष केलें जगातील ऐहिक व्यवहाराबद्दल ते काहीं बोलले नाहीत म्हणून त्या या अपूर्वाचें पर्यवसान शेवटीं कर्मठपणात झालें. उपनिषदातील तत्त्वज्ञान व स्मृतींतील गृह्यकर्मे एवढ्यातच ब्राम्हण समाज बुद्धोत्तरकालात गुरफटला गेला होता हें वर झालेंच आहे आचार्यांच्या वेदांतकेसरीनें मीमांसकांच्या अपूर्वाची दाणादाण उडवून दिल्यामुळें त्यांच्या पश्चात् तत्त्वज्ञानाचा एवढा प्रखर सत्कार झाला कीं तो कुणालाही पुसता आला नाहीं. इसवी सनाच्या नवव्या शतकापासून तों सोळाव्या शतकापर्यंत जे धर्मनिबंधकार झाले त्यांनीं आचार्यांच्या तत्त्वज्ञानास मान देऊन, वैदिक स्मार्त व गृह्यकर्माचा विचार स्मृतिव स्वसमन्वयदृष्टीनें आपआपल्या ग्रंथात केला आहे

**धर्मनिबंधकाराचा परिस्थितिनिरपेक्ष विचार**--नवव्या शतका पासून सोळाव्या शतकापर्यंत जे महानिबंधकार झाले, ते सव मोठे पंडित होते, कर्मवादी होते व मीमांसकांच्या पद्धतीनें धर्मशास्त्राचा विचार करणारे होते पण त्यांच्या कर्माचें पर्यवसान चित्तशुद्धि व अपूर्व याकडे झाल्यामुळें जगाच्या दृष्टीनें त्या परिस्थितीत असलेल्या समाजहिताचा विचार त्यांच्या ग्रंथात आलला नाहीं ज्या पंडितांनीं हे ग्रंथ समाजाकरता लिहिले त्यांनी समाजाची स्थिती काय आहे, त्यानें काय केलें पाहिजे, कसें जगलें पाहिजे याचा विचार केलेला दिसत नाहीं! समाजाची परीक्षा नव्हती म्हणून परिस्थिती व समन्वय अमा संबंध यांच्या ग्रंथात आढळत नाहीं पंडितांनीं हे ग्रंथ अपौरुषेय प्रमाणाच्या आधारानें मीमांसापरिपाटीनें वाक्याचा अर्थ लावून ते अपूर्वोत्पत्तीकरता लिहिले पंडितांच्या या ग्रंथांत आचार व प्रायश्चित्त धर्म जो आला आहे, तो

परिस्थितीनिरपेक्ष आहे, असें म्हणावें लागतें. कारण अनेक पंथ, अनेक भाषा व अनेकजातिविशिष्ट हिंदुसमाजावर त्यावेळीं जे आघात होत होते त्याच्या प्रतिकाराचा विचार या ग्रंथात मुळींच सांगितलेला नाहीं. चातुर्वर्ण्याला लागलेली कीड, आचारविचारांमध्यें झालेले फेरबदल व इतर उलाढाली यांचें आकलन जर या पंडितांना असतें, तर त्यांनीं तत्कालीन समाजाच्या जीवनाला उपयुक्त असे जिवंत विचार आपल्या ग्रंथात सांगितले असते. याच कालात न्याय, व्याकरण, वेदांत, इत्यादि शास्त्रामध्यें जगाला थक्क करून सोडणारे पांडित्य-प्रचुर ग्रंथ झाले, कांहीं भाष्यें झाली व मोठमोठ्या टीकाही झाल्या. हें सर्व वाङ्मय संस्कृतात झालें. यावरून तें सामान्य जनाकरता नव्हतें हें सिद्ध आहे. तसेंच या वाङ्मयात तत्कालीन परिस्थितीचा मुळींच विचार नसल्यामुळें तें वाङ्मय समाजाच्या अभ्युदय–निरपेक्ष होतें, हेंही सिद्ध आहे. न्याय-व्याकरणादि शास्त्रात ज्यानीं अकल्पनीय प्रगति दाखविली, ते ज्ञानाच्या एकेका शाखेंत पूर्ण निमग्न झाले म्हणून त्यांनीं समाजाविषयीं मुग्धता स्वीकारली हें म्हणणें कदाचित् कसेंतरी सयुक्तिक होईल पण ज्याचा विषय म्हटला म्हणजे आचार, विचार, प्रायश्चित्त व जो विषयही समाजसंबद्ध आणि लोकसंबद्ध, त्या पंडितानीं तरी ज्याना आपण आचारविचारादि सांगतों त्याची स्थिति काय आहे हें लक्षात घ्यावयास नको काय? जरा धार्ष्ट्याचा दोष पत्करून आम्ही असें म्हणतों कीं त्यांची दृष्टच परिस्थितीकडे नव्हती तर ती अपूर्वाकडे होती. पंडितांनीं परिस्थितीकडे कसें दुर्लक्ष केलें याची सहज कल्पना यावी म्हणून ग्रंथकार, त्यांचें स्थान, त्याचा काल व त्याचा ग्रंथ यांची यादी देतों.

| ग्रंथकार | स्थान | काल इ. स. | ग्रंथ |
|---|---|---|---|
| मेधातिथि | मिथिला | ९०० | मेधातिथि भाष्य |
| विज्ञानेश्वर | कल्याणबेदर | ११०० | मिताक्षरा |
| लक्ष्मीधर | कनोज | ११४३ | स्मृतिकल्पतरु |
| हलायुध | बंगाल | १२०० | ब्राह्मणसर्वस्व |
| देवण्णभट्ट | दक्षिण हिंदुस्थान | १२०० | स्मृतिचंद्रिका |
| हेमाद्री | देवगिरी | १२६०-१३०९ | चतुर्वर्गचिंतामणी |
| कुल्लुकभट्ट | काशी | १००० | मन्वर्थ मुक्तावली |
| वीरमित्रोदय | मिथिला | ११०० | वीरमित्रोदय |

| | | | |
|---|---|---|---|
| माधवाचार्य | विजयानगर | १४०० | पराशरमाधव |
| नीलकंठ | कोंकण | १००० | मयूख |
| अपरार्क | काश्मिर | १४०० | अपरार्क |
| चंडेश्वर | बंगाल | १४०० | स्मृतिरत्नाकर |
| जीमूतवाहन | बंगाल | १४०० | धर्मरत्न |
| रघुनंदन | बंगाल | १६०० | स्मृतितत्त्व |
| कमलाकर | काशी | १६०० | निर्णयसिंधु |
| नीलकंठ | काशी | १६११ | भगवंत भास्कर |

**धर्मनिबंधांचें स्वरूप**—मेधातिथींचा ग्रंथ विद्वत्तेच्या दृष्टीनें भाष्यासारखा आहे. विज्ञानेश्वराची मिताक्षरा महाराष्ट्रांत हिंदु कायद्याच्या क्षेत्रांत अत्यंत महत्त्वाची आहे. चतुर्वर्ग-चिंतामणीमध्यें हेमाद्रीनें दान, तीर्थ, मोक्ष अशा विषयांचीं वचनें संग्रहित केलीं आहेत. कुल्लुकभट्टाची मनुस्मृतीवरील टीका सुबोध व सुटसुटीत आहे. माधवाचार्यांचा पराशरमाधव हा ग्रंथ मोठा पांडित्यप्रचुर असून या टीकेमुळेंच पराशरस्मृतीला महत्त्व आलेलें आहे. पराशरस्मृतीपेक्षां या ग्रंथाची योग्यता अधिक मानतात. वीरमित्रोदय ग्रंथ ज्ञानकोशासारखा असून त्यांत कायद्याशिवाय ज्योतिष, वैद्यक, भक्ति, मोक्ष हे विषय आले आहेत. वीरमित्रोदयकार स्त्रियांना वारसा अधिक असावा, असें म्हणणाऱ्या जीमूतवाहनाचें खंडण करितो. कोंकण प्रांतांत नीलकंठाच्या व्यवहारमयूखाला मान आहे. जीमूतवाहनाला बंगाल्यांत फार मान आहे. कारण स्त्रियांना दाय भाग देण्यास लागणारा हा एकच ग्रंथकार आहे. बंगाल्यांत हा ग्रंथ प्रमाण मानतात. रघुनंदनाच्या स्मृतितत्त्वामध्यें वारसा व दिव्य हीं प्रकरणें आहेत. निर्णयसिंधु व धर्मसिंधु हे ग्रंथ हल्लीं सर्वपरिचित आहेत.

**परिस्थितीकडे पूर्ण दुर्लक्ष्य**—सामान्यतः या ग्रंथांचा स्वरूपादर्श वर सांगितल्याप्रमाणें आहे. दुर्दैवानें मुसलमानांच्या स्वाऱ्यांचा काळ व या धर्मनिबंधकारांचा काळ काकतालीय न्यायानें एकच आला आहे. ज्या वेळीं मुसलमानांचें लक्ष्य हिंदुसमाजाच्या अतिरिक्त सद्गुणांचा फायदा घेण्यांत गुंतलें होतें, व हिंदुसमाजाचीं वर्मे पाहून त्यांवर आघात कसे करावेत याकडे लागलें होतें त्यावेळीं आमचे भाष्यकार व धर्मनिबंधकार तत्त्वविचारावर मोठ-

पंडिताचें खंडण करावें, दुसऱ्यानें त्याचें मंडण करावें. तें इतर पंडितांनीं पसंत करावें. विशेषत: काशीस्थ पंडितांनीं आपला ग्रंथ मान्य करावा असें प्रत्येक पंडिताला वाटे. कारण त्या काळीं काशी हें मोठें विद्यापीठ होतें. तेथें मान्यता मिळाली कीं भरतखंडात ती मिळे, म्हणून पांडित्यप्रचुर ग्रंथ लिहून मान्यता मिळविण्यात कृतार्थता वाटत असे. साराश पंडितांनीं पंडितमान्यतेकरिता ग्रंथ लिहिले, ते अपौरुषेय प्रमाणानीं लिहिले, मीमांसापरिपाटीनें संस्कृतभाषेमध्येंच लिहिले आणि ते अपूर्वाकरता लिहिल्यामुळें हजार दोड हजार वर्षांत झालेल्या वीस पचवीस धर्म-निबंध-ग्रंथात परिस्थितीचा विचार, समाज-अभ्युदय-विचार मुळींच नसला तर त्यात आश्चर्य कसलें !

**पंडिताच्या धर्मभोळ्या समजुती**—किंबहुना या निबंधकारांची प्रामाणिक समजूत अशीच असावी कीं, धर्म म्हणजे मन्वादि स्मृतिकारानीं सांगितलेला, तो जसाच्या तसा ठेवला पाहिजे, त्यांत बदल करू नये, त्याला धक्का लावू नये व परिस्थितीचा विचार धर्मांत करू नये. धर्माचा व परिस्थितीचा संबंध नाहीं. ग्रंथातील धर्म समजुतींत ठेवून परिस्थितींत जेवढें शक्य असेल तेवढें करावें व अशक्य झाल्यास तो अधर्म समजावा. याच प्रामाणिक समजुतीनें हे पंडित अद्याप असें म्हणतात कीं, धर्माचे बाबतींत एकूण एक सर्व कांहीं ठरलेलें आहे त्याप्रमाणें वागणें एवढेंच मनुष्याचें काम आहे श्रुति, स्मृति, पुराणें, भाष्यें व निबंध यामध्यें सर्व धर्म सांगितला आहे तो परिपूर्ण आहे. त्यांत कानामात्रेचा सुद्धा बदल करू नये. परिस्थितींतील विचार मोठे शुनाशुनांचे असतात म्हणून या पंडितांनीं आचार व प्रायश्चित्त यानीं समाजाला जितकें जखडता येईल तितकें जखडावयाचा यत्न केला आहे. कर्मावर पूर्ण श्रद्धा असावी हें खरें, पण अपश्रद्धेमुळें कर्म केव्हांहि बोळस होत नाही याची वाट काय ! तर्काचा अतिरेक झालेला पाहून मीमांसक पंडितांनीं श्रद्धा उत्पन्न केली. पण तीहि पुढें आंधळी होऊन तिचें पर्यवसान कर्मठपणांत झालें पंडितांच्या प्रायश्चित्तांचा हा दुर्भेद किल्ला महाराष्ट्र-साधुसंतानीं पुढें उध्वस्त केला हें इतिहासप्रसिद्ध आहे.

धर्मनिबंधकारांनीं आपल्या ग्रंथांत परिस्थितीचा विचार मुळींच केला नाहीं. त्याचें कारण ' कलियुगांत ह्या गोष्टी व्हावयाच्याच, त्याला कोण काय

करणार, त्याचें निवारण मानवी शक्तीच्या पलीकडचें आहे ' अशी त्याची समजूत हें एक अंगानें व ही त्याची पक्की समजूत असल्यामुळेंच त्यांनीं मुसुलमानी अत्याचाराकडे लक्ष्य दिलें नसावें भविष्योत्तर पुराणासारखे ग्रंथ या समजुतींचे पोषकच आहेत अशा ग्रंथांना पंडितांनी प्रमाण मानलें व बळजबरीनें धर्मांतर करण्याचा प्रसंग एखाद्यावर आला कीं, तो हिंदुत्वापासून कायमचा भ्रष्ट झाला, त्याला या जन्मीं शुद्ध होण्याचा मार्ग नाहीं, ही कल्पना उराशीं बाळगली यामुळें समाजाचें जे अपरिमित नुकसान झालें होतें तें त्यांच्या पांडित्यप्रचुर ग्रंथांच्या योगानें मुळीच भरून आलें नाहीं. मुसलमानी आचार विचाराचा व संस्कृतीचा पगडा तत्कालीन समाजावर सारखा बसत होता, तथापि त्याचा दीन निषेध पंडितांच्या ग्रंथांत क्वचितच दृष्टीस पडतो. भोळ्या भाबड्या हिंदुसमाजाशीं पंडितांचा संबंध नव्हता म्हणून त्या लोकांमध्यें फकीरांच्या पूजा व अर्चा आणि नवससायास सुरू झाले यांत नवल नाहीं परंतु उच्चवर्णीय ब्राह्मण सुद्धां जेव्हां आपल्या सर्व देवता इष्ट फल देण्यास जणू असमर्थ असें समजून दावलमलकास भजूं लागले व तावूद करून त्यांत फकीर होऊं लागले, तेव्हां त्याचा दोष तत्कालीन पंडितांच्या अनास्थेलाच दिला पाहिजे.

**साधुसंतांचें पंडिताविरुद्ध बंड**—महाराष्ट्रांतील साधुसंतांनीं पंडितांचा हा कर्मठपणाचा किल्ला उध्वस्त केला व भक्तिमार्गाकडे लोकांना लाविलें हें खरें आहे. कारण पंडितांपेक्षा साधूंची दृष्टि जनतेकडे अधीक होती ती परिस्थितीच्या ज्ञानानें होरपळलेली होती साधुसंतांचीं अंतःकरणें सर्वत्र यावनी सत्तेनें उडवून दिलेल्या कहरामुळें त्रस्त झालीं होतीं. म्हणून त्यांनीं पंडिताविरुद्ध बंड केलें पंडित हे शास्त्राची वकिली करीत. ते न्यायाधिशाच्या भूमिकेवर केव्हांही आले नाहींत. पंडित हे जर त्या भूमिकेवर असते तर त्यांनीं गुंतागुंतीची परिस्थिति व शास्त्र यांचा समन्वय केला असता. पण पंडित व न्यायाधीश यांच्यावरची भूमिका साधूंची असल्यामुळें त्यांनीं संस्कृतांत गुरफटून बसलेलें ब्रह्मज्ञान मराठींत आणून ब्रह्मविद्येचा सुकाळ केला. हें कार्य करितांना पंडितांनीं संतांना पुष्कळ छळलें बाराव्या शतकापासून हे संत उदयाला आले. त्यांचा उदय होतांच पंडितांच्या महत्त्वास उतरती कळा लागली संतांचें पीठ पंढरी व पंडितांचें पीठ पैठण असें होतें. या दोन पक्षांत कांहीं काळ चांगली झुंज झाली शेवटीं पंडित पराजित झाले मतवैकल्यें, योगयाग,

जपजाप्य यांपेक्षां सुलभ अशा भक्तीच्या मार्गानें मोक्षप्राप्ति होते असें संतांनीं लोकांना शिकविलें. ईश्वराच्या घरीं सर्व जाती सारख्या, सर्वांना ईश्वर भेटतो, संस्कृतमध्येंच धर्मज्ञान असावें असें नाहीं, इत्यादि समतेचीं तत्त्वें त्यांनीं प्रतिपादून हिंदुसमाजाचें हिंदुत्व कांहीं अंशीं टिकविलें. संतांच्या कामागिरीविषयीं इतिहासाचार्य राजवाडे म्हणतात—

महाराष्ट्रांतील अठरा पगड जातींचे लोक ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र इत्यादि स्वधर्मभ्रष्ट झाले असतां ते बहुतेक मुसलमान बनल्यासारखेच झाले. इतकेंच कीं, त्यांनीं सुंतेची दीक्षा मात्र घेतली नाहीं. तीही त्यांनीं घेतली असती, परंतु त्यांच्या आड एक मोठी धोंड आली. ती धोंड महाराष्ट्रांतील साधु व संत ही होय. भांडणें, तंटे, अपेय-पान, अभक्ष्य-भक्षण यांचें साम्राज्य सर्वत्र माजलेलें पाहून ही बजबजपुरी कांहीं तरी ताळ्यावर यावी या सद्धेतूनें साधुसंतांनीं सर्वांना सहजगम्य व सुलभ असा भक्तिमार्ग सुरू केला. धर्मज्ञान लोपलें होतें. विधिनिषेधाची प्रतिष्ठा राहिली नव्हती. प्रायश्चित्तास कोणी पुसत नव्हते. अशी सर्व प्रजा शूद्रवत् अथवा बहुतेक म्लेंछवत् बनली होती. ही प्रजा सनातनधर्माला व आर्यसंस्कृतीला सोडून जावयाच्या पंथाला लागली होती. बरेच लोक सोडून गेलेहि होते. बाकी राहिलेल्या लोकांचा भगदूर पाहून साधुसंतांनी परम कारुणिक बुद्धीनें भक्तिमार्ग सुरू केला. सद्धेतूनें कीं, कसेंही करून हे लोक पुन्हा कर्मनिष्ठ बनण्याचा संभव राहावा.

मुमुक्षु नामस्मरणानें आकृष्ट झाला, म्हणजे साधुसंत त्याला नवविधा भक्तीची माहिती देत. त्यांत शुचिर्भूतपणानें राहावें कसें, सत्य-अहिंसादि धर्म पाळावेत कसे, सर्वभूतांचे ठायीं समबुद्धि ठेवावी कशी, वगैरे हिंदुधर्म-शास्त्रांतील विधिनिषेधाची ओळख त्याला दिली जाई. वर्णाश्रमधर्माचें फारसें नांव काढीत नसत-फक्त कुलधर्म, जातिधर्म, व पितृधर्म पाळण्यांत पुण्य आहे, एवढेंच सांगितलें जाई. अशा रीतीनें या भक्तिमार्गाच्या द्वारां साधुसंतांनीं वर्णाश्रमधर्मलोपप्रधान अशी ही महाराष्ट्रांतील दुर्दैवी प्रजा दोन अडीचशें वर्षें आर्य-समाजांत मोठ्या शिताफीनें थोपवून धरली व आर्यसंस्कृतीचें रक्षण केलें. तेव्हां आपल्या या देशावर त्यांचे हे उपकार बिनमोल झाले ह्यांत कांडीचाही संशय नाहीं.

( आचार्य राजवाडे-शिवकालीन समाजरचना, केसरी. )

**संतांची एकांगी भक्ति**—पंडिताविरुद्ध साधुसंतांनीं बंड केलें पण तेंहि एकांगीच झालें भक्ति व साधुत्व म्हणजे निवृत्ति यातच त्याचें पर्यवसान झालें. संतानीं अभ्युदयाच्या दुसऱ्या विद्या मराठींत आणल्या नाहींत. किंवा दुसऱ्या कोणत्याहि व्यावहारिक अंगाकडे त्यानीं ढुंकूनहि पाहिलें नाहीं म्हणून निवृत्तीच्या एकांगी शिकवणीमुळें समाजाचा अधःपात झाला. निवृत्ति-दृष्टीनें साधुसंत, पंडित, शंकराचार्यादि आचार्य व मीमांसक हे सर्व सारखेच दोषाला पात्र आहेत. आर्यसंस्कृतीच्या अपकर्षास बौद्ध संस्कृतीनें प्रारंभ केला. तिचें निवृत्तीचें लोण हे साधुसंतापर्यंत सर्वांनीं ( सुरड घालीत घालीत ) पोंच-विल्यामुळें वैदिक समाजाचें बौद्ध व अहिंदु धर्मापासून अल्पांशानें रक्षण झालें इतकेंच म्हणता येतें. बुद्धोत्तर कालांत झालेले मीमांसक, आचार्य, पंडित व साधुसंत या सर्वांनीं आपआपल्या परिस्थितींत जवढें शक्य तेवढें कार्य केलें असें त्याच्याबद्दल अत्यंत आदरानें म्हणून हिंदुसमाजाला पूर्ण हिंदु, आर्य व वैदिक या भावनानीं युक्त असें करण्याचें जें कार्य त्यांच्याकडून व्हावयाचें राहिलें आहे तिकडे आता लक्ष दिलें पाहिजे.

**कर्मयोगी परंपरेचें पुनरुज्जीवन**—इतिहासाचार्य राजवाडे हे संत ज्ञानी राष्ट्र बुडविलें असें म्हणत तर आहिताग्नि राजवाडे शंकराचार्यांनीं वैदिक धर्म ठार बुडविला असें आपल्या नासदीय सूक्तभाष्यात लिहीत आहेत. राजवाड्यांनीं जितके कठोर प्रहार शंकराचार्यांवर केले त्याहीपेक्षा अधिक प्रहार कर्मठ कर्मवादी मीमांसकावर करण्याजोगा पुरावा आहे. तात्पर्य बुद्धकालापासून चालत आलेल्या निवृत्तीचा प्रवाह लक्षांत घेऊन यापुढें समाजाचें ध्येय बदललेंच पाहिजे श्रीराम, श्रीकृष्ण, जनक व याज्ञवल्क्य या कर्मयोगी पुरुषाची परंपरा यापुढें मनाजात आणावयास पाहिजे शुकवामदेवप्रणीत निवृत्तिपरंपरा जी बुद्धापासून सर्वत्रैव चालत आली आहे ती बंद करून कर्मयोग्याची परंपरा आणली पाहिजे बुद्धानंतर चंद्रगुप्त, आर्यचाणक्य, पतंजली, समुद्रगुप्त, यासारखे दोनशें कर्मयोगी शिवाजीरामदासापर्यंतच्या कालात सर्व भरतखंडात होऊन गेले यात संशय नाहीं. विजयानगरच्या राज्यातले सायण व माधव, व माहीम प्रांतातले केशवाचार्य व नायकोराव, त्याचप्रमाणें काश्मीर, माळवा, राजपुताना, बंगाल अशा सर्व प्रांतात झालेल्या कर्मयोग्यांनीं हिंदुसमाजाला अहिंदु होण्यापासून अशत परावृत्त केलें इतकेंच म्हणता येतें पण आजचा हिंदुसमाज हा आज बौद्ध-

हिंदु आहे तो वैदिक हिंदु नाहीं किंवा आर्य हिंदु तर नाहींच नाहीं म्हणून त्याला आर्य व वैदिक करण्याचा यत्न केल्यास भावी काळात आर्यसंस्कृतीचा उत्कर्ष होण्याचा संभव आहे यज्ञाचें वैदिक स्वरूप वसाहती स्थापण्याचें होतें, व तें राष्ट्रीय होतें बुद्धानं आपले हजारो भिक्षु जगभर पाठवून धर्मप्रसार केला शंकराचार्यांनीं वैदिक यतिसंघ तयार केले व वैदिक धर्मप्रसारार्थ त्यांना पाठविलें पण पुढें या वैदिक यतींमध्यें कर्मयोग राहिला नाहीं, व तेव्हांपासून धर्माला बैठें स्वरूप प्राप्त झालें साधुसंतांनीं भक्तीचा उपदेश केला, पण त्यांहीपेक्षा महत्त्वाचें कार्य समर्थांनीं आपल्या महंतांच्या द्वारें केलें समर्थांच्या पश्चात् त्यांच्या महंतांचें पूर्व स्वरूप बदललें हें नरेंद्रस्वामींच्या चरित्रावरूनच दिसतें समर्थांनीं प्रपंचाचा नेटका विचार केला खरा, पण तो त्यांच्या लक्ष ग्रंथामध्यें समुद्रांत राईप्रमाणेंच आला आहे म्हणून समर्थांवरसुद्धां पूर्वकालच्या निवृत्तीच्या प्रवाहाचें एवढें मोठें दडपण होतें कीं, तें त्यांना फेकून देता आलें नाहीं हें दासबोध-रचनेवरून स्पष्ट होतें असो

कार्य, सार्वजनीति हा समष्टिधर्म आहे. समष्टिधर्माचे प्रवाह जोराने चालावे म्हणून कर्मयोग–परंपरेचें पुनरुज्जीवन केलें पाहिजे श्रीकृष्णजनकादिकांनीं अनुष्ठिलेली राजर्षींची परंपरा हाच खरी वैदिक व आर्यवृत्तीची परंपरा होय समाजाच्या धारण–पोषणास तीच अत्यंत उपयुक्त अशी आहे शुक्रवामदेवाऱ्या कर्मसंन्यासाऱ्या परंपरेमुळे ऐहिक वैभवाबद्दल उदासीनता उत्पन्न होते व त्या वैभवाचा त्याग-संन्यास-करण्याची इच्छा उत्पन्न होते समाजाच्या अभ्युदयाला अत्यंत घातक अशी ही परंपरा आहे, एतदर्थ ती हल्लींच्या ˜स्थितींत थोडी थांबविली पाहिजे

**हिंदुसमाजाचा स्वभाव कसा बदलावा**—हिंदुसमाज मुखदारी, तुटक, संन्यस्त व उदासीन अशा स्वभावाचा बनला आहे याचें कारण आजपर्यंत एकांगी निवृत्तीच्या उपदेशावरच भर दिला गेला हें होय आता "**कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छतं समाः।**" इहलोकीं कर्में करूनच मनुष्यानें १०० वर्षे जगण्याची इच्छा करावी, हा धर्म किंवा हा याग समाजाला शिकविला पाहिजे बाह्याच्या दु खमय जगतात कोणी आलें काय व गेलें काय, आलें तर खुशाल त्यानं या दु खात लोळाव या विचारानें हिंदुसमाज मुखदारी बनला ब्रह्म सत्य व जग मिथ्या या तत्त्वज्ञानाचें पर्यवसान तुटक व संन्यस्त वृत्तींत झालें. कारण या वृत्ति जितक्या जाज्वल्य तितका मोक्ष जवळ अशी कल्पना झाली. साधु-संतांच्या भक्तीत एक ईश्वराशिवाय इतर कशाचीही परवा करण्याचें कारणच नव्हतें! म्हणून उदासीनता आली हे सव दोष झडझडून झाडण्याकरता कर्मयोगी परंपरेचें बाळकडू समाजाला पाजलें पाहिजे समाज, राष्ट्र व विश्व यांच्याकरता कर्म करा, तें अहर्निश करा, फलाशा सोडून अखंड कर्म करीत रहा, जगत् चक्र चालविणें हा ईशसंकल्प आहे, तदर्थ कर्म करणें ही ईश्वरी आज्ञा आहे तें सतत निष्काम बुद्धीनें करणें हें गीतेचें सार आहे, हें तत्त्व समाजाच्या हाडींमासीं भिनविलें पाहिजे हिंदु-समाजाला जयिष्णु, वर्धिष्णु तेजस्वी, मनस्वी, असें करून त्याला पूर्ण आर्य व वैदिक बनविलें पाहिजे व्यष्टिधर्माच्या ज्या एकांगी, संकुचित व अवास्तव कल्पना आहेत त्या घालवून व्यापक व उदात्त असा समष्टिधर्म शिकविला पाहिजे व्यष्टिधर्माच्या अतिरेकामुळें समाजात कोणते दोष शिरले व त्यामुळें आर्यसंस्कृतीचा कसा अपकर्ष झाला याचें विवचन पुढील काहीं प्रकरणात करू

---

# प्रकरण आठवें

## अहिंसेचा अतिरेक

**अहिंसेचा विचार**—गेल्या तीन प्रकरणांत बुद्धकालापासून संतकाला-पर्यंत सारख्या चालत आलेल्या निवृत्तीच्या प्रवाहाचा विचार केला. बुद्धाचा दुःखवाद, आचार्यांचें जगन्मिथ्यात्व, भीमाराजाचें अपूर्व आणि साधुसंतांचा भक्ति या सर्वांनीं निवृत्तीच्या एकदेशी मार्गाचाच पुरस्कार केल्यामुळें समाज व राष्ट्र याचा विचार थांबला आणि समष्टिधर्म ठार बुडून व्यष्टिधर्माला महत्त्व आलें. भक्ति, अपूर्व, मोक्ष व दुःखविलय याकरिता व्यक्तीला समाजाची आणि राष्ट्राची जरूर नव्हती. त्या क्षेत्रांत "**सहनाववतु सहनौभुनक्तु**" हें तत्त्व नको होतें आणि "**संगच्छध्वं संवदध्वं**" याचें प्रयोजन नव्हतें. प्रत्येकाचा मोक्ष सुटा व त्याचा मार्ग सन्यास! याचा परिणाम व्यष्टिधर्मी या अतिरेकांत झाला. समष्टिधर्माचें कारणच न पडल्यामुळें वैयक्तिक शुद्धाशुद्धता, उच्चनीचता व सोवळें ओवळें यातच समाज गढून गेला. सत्यासत्य, हिंसाअहिंसा, कार्याकार्य, यातील तारतम्य नाहींसें झालें. याचा फायदा मुसलमानांना कमकसा मिळत गेला हें या प्रकरणांतून पहावयाचें आहे. प्रथमतः अहिंसेचा विचार करूं.

**यज्ञ व हिंसा**—जगांतील कोणत्याही समाजामध्यें काही प्रमाणांत हिंसा ही पाहिजे व काहीं प्रमाणांत अहिंसाही पाहिजे. दुसऱ्या अहिंसेचा पुरस्कार केल्यास समाजाला जगता येणार नाहीं व केवळ हिंसा पुरस्कारल्यास समाजाला स्वास्थ्य मिळणार नाहीं. हिंसाकर्म हें क्षात्रवृत्तीचा पोषक आहे व क्षात्रधर्म हा समाजाला साक्षात् धारण करणारा आहे. समाजाची धारणा क्षात्रवृत्तीवाचून नाहीं व क्षात्रवृत्तीची धारणा हिंसेवाचून नाहीं. वैदिक धर्मामध्यें फार प्राचीन काळापासून क्षात्रवृत्ति व हिंसा यांचा नित्य संबंध यज्ञसंस्थेंत आढळतो. यज्ञ ही वैदिक आर्यांची राष्ट्रीय संस्था होती. यज्ञसंस्थेच्या द्वारें हळूहळू पाय पसरून वसाहत करावयाची व त्या यज्ञभूमीमध्यें जर अनार्यांनीं प्रवेश केला तर क्षत्रि-यांनीं त्याचा प्रतीकार करावयाचा असा उपक्रम वैदिक आर्यांचा होता. यज्ञांपैकीं पुष्कळ यज्ञ राजन्यप्रधान आहेत. ब्राह्मणाचा पौरोहित्याच्या नात्यानें फक्त यज्ञाशीं संबंध दिसतो. यज्ञाचें मूळचें स्वरूप हें पुढें पालटल्यामुळें उपनिषत्

कालापासून यज्ञनिंदा सुरू झाली. गीतेमध्यें दुसऱ्या व नवव्या अध्यायांत यज्ञ हेंच सर्वस्व असें मानणाऱ्यांची निंदा आली आहे.

**ब्रह्मवेत्ते, जिन, बुद्ध आणि यज्ञनिंदाः**—जिन व बुद्ध यांनी यज्ञसंस्थेविरुद्ध बंड केलें व तें '**अहिंसा परमो धर्मः**' या तत्त्वाच्या पांघरुणाखालीं केलें अशी समजूत आहे. परंतु महावीर व बुद्ध यांचे या कार्यांतील सहकारी ब्रह्मवेत्तेही आहेत हें विसरतां कामा नये. आरण्यकीय ब्रह्मवेत्यांनी लोकांना यज्ञाकडून परावृत्त करून ज्ञानमार्गाकडे नेण्याचें कार्य जेव्हां चालू केलें तेव्हांपासूनच यज्ञ हे अनवश्यक मानले गेले. यज्ञाला आलेलें उत्सवाचें स्वरूप, त्याकरतां होणारा खर्च व खटाटोप, ऋत्विजांतील भांडणें, भिक्षुकांतील मत्सर, यांमुळें हे यज्ञ पुढें पुढें नको झाले होते. आरण्यकीय विचारानें जग व संसार याविषयीं जसजसा वीट उत्पन्न झाला व ज्ञानमार्गाची गोडी जसजशी अधिकाधिक लागली तसा तसा वैदिक यज्ञकर्मांवरील विश्वास उडाला व त्याचें पर्यवसान बुद्धाच्या नवीन पंथांत झालें. उपनिषदांतील ब्रह्मवेत्ते हे वैदिक परंपरेंत वाढले असल्यामुळें त्यांनी यज्ञाबद्दल औदासीन्य स्वीकारलें, पण महावीर व बुद्ध हे व्रात्य क्षत्रियकुलांत जन्मल्यामुळें त्यांना यज्ञाविरुद्ध अहिंसेच्या नावाखालीं बंड करण्यास काहींच दिकत वाटली नाहीं. मनूनें व्रात्य क्षत्रिय म्हणून ज्या—**झल्लो मल्लश्च राजन्याद् व्रात्यान्निच्छिविरेव च। नटश्च करणश्चैव खसो द्रविड एव च॥** (अ. १०।१२) नट व निच्छवि कुळांचा उल्लेख केला आहे, त्यांतच महावीर व बुद्ध हे जन्माला आले. बुद्ध हा शाक्य कुळांत जन्मला व तें कुळ व्रात्यक्षत्रियांत मोडत असे असें म्हणतात. यज्ञकर्माचें महत्त्व मुख्यतः क्षत्रियांना असे. ब्राह्मण व वैश्य यांचा संबंध दक्षिणा व दान यांपुरताच होता. परंतु महावीर व बुद्ध यांनीं क्षत्रियांना विहित मानलेले राजसूयादि यज्ञ निंद्य ठरवून एकांगी शिकवणीनें राष्ट्रांतील क्षात्रवृत्ति नष्ट केली.

**वध, कलिवर्ज्यप्रकरण आणि कायदाः**—सम्राटानें अश्वमेध यज्ञ करावा, "**राजा सार्वभौमः अश्वमेधेन यजेत्।**" कारण '**राष्ट्रं वै अश्वमेधः**' अशी वेदाज्ञा आहे. परंतु हे अश्वमेधादि यज्ञ कसेबसे हर्षकालापर्यंत चालले व शेवटीं त्याचाही निषेध झाला. बुद्धाच्या पश्चात् शुंग, गुप्त, शातवाहन, आंध्र, चालुक्य इत्यादि महाबलाढ्य वैदिक धर्माभिमानी राजांनीं मधून मधून अश्वमेधादि यज्ञ केले. परंतु बौद्धांच्या अहिंसाधर्माचा लोकमतावर इतका संस्कार झाला होता कीं,

हिंसायुक्त यज्ञयाग पूर्वस्वरूपात सुरू करणें जवळ जवळ अशक्य झालें. बौद्ध धर्मानें वैदिक धर्मावरील उडवलेली श्रद्धा मीमांसकांनीं पुन्हा दृढमूल केली पण हिंसायुक्त यज्ञाचा त्यांना जीर्णोद्धार करता आला नाहीं. यज्ञादि कर्मे पुढें बंद झाला, पण आम्हांत मान लुप्त झालें नव्हतें. अग्निहोत्राचा संबंध व्यक्तीशीं असतो म्हणून तीं राहिलीं हिंसायुक्त यज्ञाचा संबंध राजाशीं होता, म्हणून आठव्या शतकापासून यज्ञयाग बंद पडले व बल्विउर्यांमध्यें यज्ञाचा समावेश याच काळात झाला हिंदुस्थानात या वेळीं श्रीकृष्णभक्तीचा प्रसार बराच झालेला होता, त्यामुळे गाइ व बैल यांबद्दल लोकांना प्रेम वाटत होतें. ह्यूएन-त्सगाच्या वेळीं सब भरतखंडभर गोवध-निषेध इतका तीव्र झाला होता कीं " त्यामुळे इतर प्राण्यांची हिंसाही बंद होत आली होती " असें तो लिहितो वेदविहित यज्ञांची निंदा उपनिषदांतील ब्रह्मवाद्यांनीं सुरू केली. बुद्धानें अहिंसेच्या तरवारीनें यज्ञावर हल्ला चढविला. बुद्धपश्चात् झालेल्या अशोकादि सम्राटांनीं अहिंसेचा पुरस्कार करून यज्ञाचे महत्त्व कमी केलें व पुढें पुढें हर्षादि राजांनीं कायद्यानें हिंसा बंद केल्यामुळे यज्ञसंस्थेचा लोप झाला हल्ली केव्हां केव्हां क्वचित् क्वचित् उत्सवासारखे यज्ञ झालेले ऐकण्यात येतात

**अशोक व अहिंसा**—अहिंसेनें यज्ञसंस्था बुडविली वैदिक धर्मावरील या आघातानें त्याचें एक अंग उत्तम झालें पण अहिंसेच्या पुरस्काराचा परिणाम हिंदुसमाजावर फारच वाईट झाला अशोकानें अहिंसेचा पुरस्कार केला त्यानें बौद्ध धर्माची दीक्षा घेतल्यापासून देश जिंकल्याचें किंवा लढाई मारल्याचें वृत्त इतिहासात आढळत नाहीं, हें लक्षात ठेवण्याजोगें आहे. सम्राट् अशोक हा लहानपणीं अति क्रूर होता त्यानें कूटकौटिल्य करून गादी बळकावली होती तो गादीवर बसल्यावर लोक त्याला चळचळां कांपू लागले कौर्याच्या दराऱ्यानें त्यानें राज्याचा बंदोबस्त केला पूर्वेस बंगाल दक्षिणेस गोदावरी, पश्चिमेस सिंधु नदी व उत्तरेस हिमालय, एवढ्या भागावर अनेक स्वाऱ्या करून लढाया जिंकून व सत्ता करून त्यानें राज्य स्थापलें होतें एवढ्या प्रांतावर सत्ता स्थापन केल्यावर अशोकानें दयेचा बरोबरी करावी म्हणून अपराध्यांना शिक्षा देण्या करतां नरकाची स्थापना केली तेथें अग्निकुंडात टकलणें, तरवारीवर चालवणें, करवतानें कापणें, अशा यमाच्या दरबारातील शिक्षा अपराध्यांना होत असत अशोकानें कलिंग देशावर स्वारी करून दीड लक्ष लोक ठार केले, व एक लक्ष

लोक धरून आणले, तेव्हाच त्याला वैराग्य उत्पन्न झालें व तो पुढें बौद्ध भिक्षु झाला अशोकानें कौर्य व हिंसा यामुळें राज्य मिळविलें व वाढविलें, पण उत्तर वयांत तो अहिंसेचा पुरस्कार करूं लागला. प्राणिमात्रावर दया करावी, हिंसा करूं नये, नोकरांना चांगलें वागवावें, गोरगरीबांना दानधर्म करावा, असे हुकूम यानें आपल्या प्रजाजनांना फर्माविले होते

**कनिष्काचा व इतरांचा अहिंसापुरस्कार** — सम्राट् अशोकानंतर सम्राट् कनिष्कानें महायान पंथाची दीक्षा घेतली व अहिंसेचा पुरस्कार केला. 'राजा बोले व दळ हाले' या म्हणीप्रमाणें राजानें पुरस्कारलेल्या अहिंसेचा परिणाम समाजावर विपरीत झाला. समुद्रगुप्तानें चौथ्या शतकांत जरी अश्वमेध यज्ञ केला होता तरी त्यामुळें अहिंसेच्या अतिरेकाला आळा बसला नाहीं लोकसमाजावर अहिंसेची छाप इतकी पडली होती कीं, ते हिंसा तर करीत नव्हतेच, पण कोंबड्यांनदेखील पाळीत नव्हते कांदे लसूण खात नव्हते व त्या वेळीं खाटकाचीं दुकानें नव्हतीं, असें चिनी प्रवासी फाहियान यानें इ स ४०५ मध्यें लिहून ठेवलेलें आहे अहिंसेच्या अतिरेकाचीं एक दोन उदाहरणें नमूद करण्यासारखीं आहेत पश्चिम माळव्याचा राजा शिलादित्य हा सहाव्या शतकांत झाला. हा इतका अहिंसाभक्त होता कीं, त्यानं कायद्यानें मांसाहाराला बंदी केलीच, पण तो आपल्या घोड्यांना व हत्तींना गाळलेलें पाणी पाजावयास सांगत असे । मेघवान्राजानें काश्मीर प्रांतांत कायदा करून सहाव्या शतकांत हिंसा बंद केली पण या सर्वांवर ताण हर्षवर्धनानें केली असें ह्युएन त्संगाच्या निश्चित माहितीवरून म्हणतां येतें त्यानें आपल्या सर्व साम्राज्यांत प्राणाहत्या व मांसाहार करणारास जबर शासन ठेविलें होतें

**अहिंसा व मांसाहारनिवृत्ति** — हिंदुसमाजांत जी मांसाहार-निवृत्ति आज आढळते, तिला पद्धतशीर प्रारंभ हर्षकाळापासून झाला § बौद्ध व जैन या धर्मांच्या संस्कारानें ब्राह्मणांतील मांसाहार हर्षपूर्वकालीं लुप्त झाला

§ **टीप**-हर्षानें म्हातारपणीं कायद्यानें मांसाहार बंद केला खरा पण तो लहानपणापासून स्वतः मांसाहार करीत असे तो अहिंसावादी पुढें बनला, पण तारुण्यांत क्षात्रवृत्तीनेंच त्यानें साम्राज्य स्थापन केलें हें ध्यानांत ठेवण्याजोगें आहे

होता क्षत्रियांनी त्यांना मांसाशन विहित असताना, त्याचा त्याग केला. वैश्यांचा धंदा व स्वभाव ही दोन्ही मार्ग-वर्जनाला पहिल्यापासून इष्ट अशीच होती. त्यांनी ब्राह्मणांचें अनुकरण केलेंच, पण यापेक्षा आश्चर्य असें की हिंसेच्या भीतीनें त्यांनी कृषिकर्महि सोडलें. कृषि, गोरक्ष व वाणिज्य हे धंदे वैश्यांचे असताना कृमिहत्येमुळें त्यांनी शेती सोडली. व तेव्हांपासून म्हणजे अगदी अलीकडे शेती शूद्राकडे गेली! वैश्यांनीं शेती सोडल्यानंतर पुढें ब्राह्मण-क्षत्रियांनीं ती स्वीकारली व तरी करण्यास पराशरस्मृतींतील एका वचनानें मान्यता दिली! हर्षानंतरच्या काळांत जैनधर्माचा प्रसार फारच झाला. बहुतेक वैश्यांनीं जैनधर्माचा स्वीकार केला व ते अहिंसावादी बनले. जैनांशिवाय वैष्णव व लिंगायत हीं मतेंहि पुढें वैश्यवर्गामध्यें रूढ झालीं व तेही शाकाहारी बनले. ब्राह्मण-क्षत्रिय-वैश्यांतील मांसाहार कमी झाल्यानंतर शूद्र वर्गालाही त्यांचेंच अनुकरण करावेंसें वाटू लागलें. कारण सामान्यत शिष्टवर्गाचें अनुकरण समाज करीत असतो.

**वैदिक समाज व मांसाहार**–वैदिक काळीं सर्व वर्णांत मांसाशन रूढ होतें वेदांनीं मांसाशन निषिद्ध मानलें नव्हतें तर काही विशिष्ट प्राण्यांचें मांस निषिद्ध मानलें होतें स्मृतींमध्यें मांसांतील वर्ज्यावर्ज्यांचा विचार थोडासा आला आहे. भारतातही मांसाहाराचें विवेचन आहे वाग्भटातील सूत्र-स्थानामध्यें कोणकोणत्या ऋतूंत कोणकोणतें मांस तुष्टिपुष्टिदायक आहे, याचाही विचार चांगला केलेला आहे. श्राद्धसमयीं मांसान्न तयार करावें, मांसानें पितृतर्पण होतें, श्राद्धाकरता केलेल्या मांसान्नाचा जो ब्राह्मण स्वीकार करीत नाहीं, तो दुर्गतीला जातो, क्षत्रियांनीं दररोज मृगया करून तानें मांस आणावें, त्यांना मारलेल्या पशूंच मांस वैश्यांनीं विकत घ्यावें, ब्राह्मणांनीं यज्ञ व श्राद्ध याशिवाय हिंसा करू नये, क्षत्रियानें नेहमीं मांस भक्षण करावे, अशा तऱ्हेचे उल्लेख स्मृतिग्रंथामध्यें आढळतात त्यावरून चातुर्वर्ण्यवान् वैदिक समाज हा बुद्धकालापर्यंत मांसाहारी होता असें स्पष्ट दिसतें

**मांसाहार बंद होण्याचीं कारणें**–कोणत्याही समाजातील मांसाहार बंद होण्यास तीन कारणें घडतात पहिलें त्या आहाराचा निषेध करणारें तत्त्वज्ञान, दुसरें त्या तत्त्वज्ञानाचा प्रचार करणारी सत्ता, व तिसरें त्या अन्नाचे स्थानीं शाकान्नाचा पुरवठा, हीं तीं तीन कारणें होत बुद्धानंतर हीं तिन्ही कारणें घडलीं व समाज निवृत्तमांस झाला बुद्ध व जैन धर्मांच्या उद्भवानें,

विशेषतः जैन धर्माच्या उत्कर्षानें मध्ययुगांत समाज निवृत्तमास झाला पुढें कर्नाटकांत उत्पन्न झालेल्या नवीन वैष्णव मतानें जोरानें अहिंसेचा पुरस्कार केला व वारविंद मताचा संस्थापक बसव यानें अहिंसेलाहि धर्मांत मुख्य स्थान दिलें त्यामुळें हिंदुसमाजाची संरक्षणशक्ति दुर्बळ होऊन तो परस्याच्या हातीं पडला याच काळांत मांसाहाराचा स्वीकार व त्याग यावरून पोटजातीहि बनत गेल्या. पंच द्राविड व पंच गौड ब्राह्मणामध्यें हे भेद आहारमूलकच पडलेले आहेत ब्राह्मणावर जसा जैन व बौद्ध तत्त्वज्ञानाचा परिणाम झाला तसाच क्षत्रियावरही झाला आणि पुष्कळ क्षत्रिय या दोन्ही धर्मांचे अनुयायी बनले वैश्याद जातींचा ओढा अहिंसेकडे होताच त्याला निरनिराळ्या राजांनीं केलेल्या कायद्यामुळें व जैन साधूंच्या उपदेशामुळें प्रोत्साहन मिळालें मांसाहार निंद्य मानणारें तत्त्वज्ञान, कायदा व शाकाहाराची समृद्धि यामुळें सर्व हिंदुसमाजांतून मांसाहाराची हकालपट्टी झाली

**अहिंसेमुळें हिंदुसमाजाचा अपकर्ष**—धर्मासाठीं मांसाहाराचा त्याग हिंदुसमाजानें केला व त्यामुळें तो आध्यात्मिक वैभवाच्या शिखरावर चढला असें कांहीं म्हणत असतात त्यांत तथ्य असो वा नसो पण एवढें खरें कीं "या तत्त्वामुळें हिंदुसमाजाला राजकीय दृष्ट्या मृत्युपथावर जावें लागलें असें जें विधान मॅक्समूलरनें केलें आहे तें मध्ययुगीन भारताच्या पहिल्या भागांत चिं वि वैद्य यांनीं मान्य केलें असून तेंच अक्षरशः खरें आहे कारण पुढील शतकांतच हिंदूंची मुसलमानाशीं गांठ पडली, त्या वेळीं एक प्रवृत्तमास तर दुसरा निवृत्तमांस एक कत्तलवादी तर दुसरा अहिंसावादी एक कौयवादी तर दुसरा दयावादी, एक विश्वासघातवादी तर दुसरा विश्वासवादी असा सामना जेव्हा होऊं लागला तेव्हा यावनार्थ कलहामध्यें निभाव धरण्याची आशा करणें व्यर्थ आहे असेंच बहुधा हिंदुसमाजाच्या प्रत्ययास आलें अहिंसेच्या अतिरेकाचे दुष्परिणाम हिंदुसमाजाला कसे भोंवले व मुसलमानांनीं त्याचा लगेच कसा फायदा करून घेतला हें कांहीं ऐतिहासिक उदाहरणें देऊन विशद करणें अप्रासंगिक होणार नाहीं

**हिंसेनें दरारा बसविल्याचीं उदाहरणें**—मुसलमान व हिंदु यांचा जेव्हां पुढें संबंध आला, त्या वेळीं हिंदु पराजित झाले, व मुसलमान विजयी झाले याचें मुख्य कारण म्हटलें म्हणजे उभय समाजांतील हिंसाअहिंसेच्या

भावनेमध्यें असलेला फरक हें होय मुसलमानांच्या धर्मभावना जळजळीत, उत्कट व जाज्वल्य होत्या पण हिंदूंच्या अगदीं मिळमिळीत होत्या हिंदु हा अहिंसेच्या अतिरिक्त स्वीकारामुळें शांत, मृदु व नरम असा बनलेला होता. व प्रेम, दया, अहिंसा, सहिष्णुता यांचें वेड हिंदूंमध्यें फार होतें पण मुसलमानांत क्रत्तल, क्रौर्य, विश्वासघात, लुटणें, ठार मारणें, यांबद्दल धर्माज्ञेमुळें उत्साह होता. अशा स्थितींत त्यांनीं अहिंसेविरुध्द कत्तल करून आपला कसा दरारा बसवला हें ऐतिहासिक उदाहरणें देऊन सांगतों. महमद कासीमनें सिंध देशांतील देवाल बंदराचा ७११ मध्यें पाडाव केल्यावर महमदीय धर्माच्या भयंकर कत्तलींचा त्यानें हिंदूंना पहिला धडा शिकविला तो असा कीं, त्यानें नगरांतील सर्व स्त्रीपुरुषांची एकजात कत्तल केली अहिंसावादी दुबळ्या लोकांनीं केविलवाण्या मुद्रेनें " महाराज, जीव वाचवा, दया करा " अशी प्रार्थना केली पण "**मला दया करण्याची आज्ञा नाहीं, कत्तलीची आज्ञा आहे.**" असें उत्तर देऊन कासमनें आपला कार्यभाग उरकला महमद कासम शिविस्तान पर चालून आला तेथें वत्सराज या नावाचा अधिकारी होता त्यानें कासमशीं दोन हात करण्याचें ठरविलें, पण तेथील बौद्धधर्मी लोकांनीं त्याला निक्षून सांगितलें कीं, " आम्ही भिक्षु, आमचा धर्म म्हणजे अहिंसा, म्हणून हत्या करणें व युध्द करणें हें आम्हांला निषिध्द !!! शिवाय तुमचें ठिकाण मजबुतीचें," (मध्ययुगीन भारत, भा १)असें म्हणून त्यांनीं कासमचा प्रतिकार केला नाहीं महमद कासमनें सिंधप्रांत काबीज करून तेथील राजा दाहर यास ठार केलें तें पाहून तेथील ब्राह्मणांपैकीं कांहींनीं आत्महत्या केल्या व सुमारें १००० ब्राह्मणांनीं प्रायश्चित्तादाखल क्षौर करवून घेतलें, पण प्रतिकार केला नाहीं !! सिंध प्रांतातील उत्तर भागांत सुस्थल नावाच्या शहरावर कासमनें चाल केली तेथील रहिवासी मुख्यत श्रमण व बौध्द असल्यामुळें ते त्यास शरण तर गेलेच, पण कासमचें स्वागत त्यांनीं ढोलगीं वाजवीत, पाय वाजवीत व तालावर नाचत नाचत केलें !! पण प्रतिमारबुध्दि त्यांना झाली नाहीं महमद कासमनें मुलतान घेतल्यावर खलीफाच्या हुकुमावरून कत्तलीचें उग्र स्वरूप प्रगट केलें अशा कत्तलींची लोकांना बिलकुल माहिती नसल्यामुळें ते पटापट प्राणास मुकले कासमनें आठव्या शतकाच्या प्रारंभीं सिंधप्रांत स्वाधीन करून मागाहून येणाऱ्या आपल्या इस्लाम अनुयायांना जो धडा घालून दिला, तोच त्यांनीं पुढें अक्षरशः

गिरविग निरपराधी बायका व मुलें, लढाऊ बिनलढाऊ हिंदु लोक, यांची एकजात कत्तल करण्यास मुसल्मानांनीं केव्हांही कुचराई केली नाहीं गिझनीच्या महमदानें जयपाळवर स्वारी करून पहिल्या धडाक्यात ५००० लोकांची कत्तल केली व काफरांना चळचळा कापावयास लागलें त्यानें ठाणेश्वरावर स्वारी केली तेव्हां इतकी भयंकर कत्तल केली की, रक्ताचे पाट नदींत मिळाले व त्यामुळें नदीचें पाणी पिण्यायोग्य राहिलें नाहीं महमद घोरीचा सरदार कुतुबुद्दीन ऐबक यानें बहारप्रांत काबीज केल्यावर तेथील सुमारें एक लक्ष क्षौरी ब्राह्मणांना, श्रमणांना व भिक्षूंना ठार मारलें। सारांश, मुसल्मानांच्या क्रौर्यापुढें हिंदूंचा टिकाव लागत नसे मुसलमान हे युद्धांत जिंकल्या लोकांना अत्यंत निर्दयतेनें वागवून दहशत बसवीत पण हिंदु हे अहिंसेच्या प्रबळ संस्कारामुळें जिंकलेल्यांशीं सदयतेनें वागत, म्हणून त्यांचा वचक कधींही बसला नाही

**क्षात्रवृत्ति व मांसाहार**—हिंदुसमाज मुसलमान समाजाला वश होण्याच्या अनेक कारणांपैकीं अहिंसा तत्व हें एक कारण आहे या तत्वाचा व मांसाहाराच्या निषेधाचा परिणाम समाजात फार खोलपर्यंत झाला त्याशिवाय क्षात्रवृत्ति राहणें कठीण त्या क्रौर्याचा व मांसाहाराचा बराच संबंध आहे पण या दोहोंचा अभाव अहिंसानिषेधानें केल्यामुळें हिंदुसमाज वीर्यहीन दुबळा व भेदपात्र असा जो बनला तो अद्याप तसाच आहे बौद्धधर्म, जैनधर्म, वैष्णव धर्म व लिंगायतधर्म या सर्वांनीं अहिंसेला धर्मात मुख्य स्थान दिलें यामुळें समाज शमप्रधान, भित्रा व शांत अशा स्वभावाचा बनला जैन, लिंगायत आणि बौद्धधर्माच्या अनुयायांमध्यें क्षत्रियेतर बहुजनसमाजाचा भरणा फार होता हा समाज युद्धास नेहमीं अनिच्छु असे त्याच्यावर अहिंसा तत्त्वज्ञानाची छाप बसल्यामुळें तो युद्धपराङ्मुख व अशक्त बनला। येऊन जाऊन राष्ट्रांमध्यें लढवय्याची जात एकट्या क्षत्रियांची होती पण त्यानांही अहिंसेच्या वेडानें पछाडलें होतें क्षत्रियांना विहित असलेला मांसाहार त्यांनीं सोडला धार्मिक समजुतीनें मांसाहार त्याज्य समजणाऱ्या क्षत्रियास श्री चिं वि वैद्य हे म यु. भारत, भा ३, पान ५४६ मध्यें जो इतिहासाचा संदेश कळविनात तो त्याच्या भाषेमध्यें थोडा बदल करून येथें देतों "हल्लीं या जगात जीवन–कलह तीव्र झाला आहे व तो उत्तरोत्तर तीव्रतर होणार आहे वास्तव मानवी वंशाच्या भिन्न भिन्न शाखांमध्यें सतत युद्धें होणार हें निश्चित आहे या भावी

युद्धांत आपण यशस्वी व्हावें व इतरतर मननीय रीतीनें आपली छाप पाडावी अशी ज्याची इच्छा असेल त्यानीं यश प्राप्तीला अवश्य असणारें शारीरिक व मानसिक सामर्थ्य शक्य ते उपाय योजून मिळविलें पाहिजे ”

**क्षेप, द्वेष व संताप या भावनांची आवश्यकता** –हिंदुसमाजाला आज स्वाभिमानपूर्वक जर जिवत राहावयाचें असेल तर त्याकरिता अपमान होताच चीड, संताप, क्षेप व द्वेष या भावना उत्पन्न होऊन प्रतिकार करण्याचें सामर्थ्य अंगीं उत्पन्न झालें पाहिजे जेत्या मुसलमानानीं हिंदूंना दहशत बसावी म्हणून लाखो लोकांच्या कत्तली केल्या तर विजेत्या युरोपियन लोकानी अमेरिकेंतील रेड इंडियन लोकाचा व पेरु–मेक्सिको येथील रहिवाशाचा समूळ नाश केला विजेते सत्ताधीश सत्ता स्थापण्याकरिता व स्थापलेल्या सत्तेला धक्का देणाऱ्याचें निर्दलन करण्याकरिता क्रौर्याचा अवलंब सदैव करीत असतात त्याची इच्छा जित लोकानीं गुलामगिरीच्या वृत्तीनें भारवाहकाचें काम नेहमी करावें अशी असते हिंदुसमाजाला जर यापुढें जयिष्णु व्हावयाचें असेल तर त्यानें संताप, क्षेप, द्वेष, या भावना आपल्या अंगीं आणल्या पाहिजेत कारण समाजाच्या धारण–पोषणाला व आक्रमशीलतेला चीड, संताप, द्वेष आणि क्षेप या भावनाची जरूरी आहे पण या भावनाचा अभाव हिंदुसमाजामध्यें अनेक वर्षांपासून चालेला आहे कांहींही झालें तरी हिंदु हा अतिशय सहिष्णु असतो, हजारों स्त्रिया बाटल्या, देवळें लुटलीं, मूर्ति फोडल्या, फार काय पण याहीपेक्षा मानवी संस्कृतीला कलंक लागेल असें जुलमी वर्तन मुसलमानानीं केलें, पण त्यामुळें संतापानें भडकून व क्षेपानें चिडून शत्रूंच्या नरडीचा घोट घेण्याची प्रवृत्ति ही मुसल्मान प्रथम आले तेव्हा मुळींच दिसली नाहीं देवधर्मांची निंदा केली तरी तो नरम ! स्त्रियांचा उपमर्द केला तरी तो सहिष्णु ! धर्मग्रंथाला शिव्या दिल्या तथापि याचें डोकें शांत ! असें होण्याचें कारण हिंदूंच्या हाडींमासीं अहिंसातत्त्व भिनलें असल्यामुळें त्याला शांततामय मार्गानें वागण्याची नेहमी सवय लागली आहे हें होय

**क्षात्रवृत्तीची जरूरी**–अहिंसेविरुद्ध वसत व क्रौर्य या वृत्तींनीं हिंदुसमाजाला मुसल्मानानीं चीत केलें असें इतिहास सांगतो त्यावरून बोध घ्यावयास पाहिजे तो हा की, हिंदुसमाजात क्षात्रतेजाचा अभाव आहे. आज जगांतील सुधारलेल्या राष्ट्रांकडे पाहिलें असता त्या राष्ट्रांत क्षात्रतेज मुसमुसत

आहे असें दिसून येतें सक्तीच्या लष्करी शिक्षणामुळें सर्व राष्ट्र लढवय्यांनीं परिपूर्ण आहेत शिवाय खडें सैन्यहि प्रत्येक राष्ट्रांत नेहमी सिद्ध असतें हें निराळेंच. महाराष्ट्रांत शिव-भूपतीच्या वेळीं उद्भूत झालेलें क्षात्रतेज पेशवाई अखेर पुरलें पण इंग्रजी अमदानीपासून क्षात्रतेजाची पुनश्च खची झाली असून हिंदुसमाज निर्वीर्य बनला आहे हिंदुसमाजांत ज्यायोगानें लढवय्याची वृत्ति उत्पन्न होईल ता सर्व साधन उपयोगांत आणलीं पाहिजेत. चातुर्वर्ण्यांपैकीं नुसत्या क्षत्रियांनींच युद्ध करण्याचे दिवस आता गेले. तर सर्व समाजानें व राष्ट्रानें जागृत होऊन क्षात्रधर्मप्रवण झालें पाहिजे " **शस्त्रं द्विजातिभिर्ग्राह्यं यत्र धर्मोपरुध्यते** " *असा स्मृतीमध्यें धर्माज्ञा आहे. पण अडचणीचे वेळीं शस्त्रास्त्रें* एकदम धारण करता येत नाहींत व आलीं तरी ता चालविता येत नाहींत म्हणून नेहमी युद्धशास्त्राशीं संबंध आला पाहिजे आज सर्व राष्ट्रावर निर्वीर्यतेची *छाया पडलेली आहे म्हणून हत्यारें वापरणें, मृगयामंडळें स्थापणें, लष्करी शिक्षण* घेणें, लष्करी पेशाला अनुकूल अशा इतर गोष्टी घडवून आणणें, हें काम साम्प्रतच्या सनदशीर पद्धतीप्रमाणें लोकमताचा दाब सरकारवर पाडून महाराष्ट्रांतील अभि-*जात क्षत्रियांनीं केलें पाहिजे शरीरबलसंवर्धन, व्यायाम, लाठीकाठीप्रसार या* क्षात्रवृत्तीला अनुकूल असलेल्या साधनांचा भरपूर उपयोग व्हावा म्हणून जागो-जाग आखाडे काढले पाहिजेत तात्पर्य हिंदुसमाजाच्या हातीं जी सामग्री आहे *तिचा उपयोग मुलांना व मुलींना क्षात्रबलसंपन्न करण्याकडे केला पाहिजे व जी* सामग्री नसेल ती मिळवली पाहिजे.

**मांसाहार व क्रौर्य**—थोड्याबहुत प्रमाणावर क्षात्रवृत्तीला पोषक असा *मांसाहार आहे कारण क्रौर्य व शौर्य यांचें साहचर्य असून मांसाहाराचा व* क्रौर्याचा संबंध आहे सिंहासारखा मांसाहारी हिंस्र पशु पशूंचा राजा होतो. व गरुडासारखा ससाण्यासारखा पक्षी हा पक्ष्यांचा राजा होतो पशु व पक्षी याप्रमाणें *मांसाहारी मानवसमाज हेच जगावर राज्य करतात असें जगातील अनेक* उदाहरणांवरून दाखविता येईल निवृत्तमार्ग लोकांनीं क्षात्रवृत्तीचा अंगीकार करून जय चालवल्याचें उदाहरण फक्त चित्पावन ब्राह्मणांचें अपवाद म्हणून सांगता येतें पण या अपवादानें नियमाचीच सिद्धी होते तत्त्वज्ञान, कायदा व शाका- हाराचें वैपुल्य यामुळेंच हिंदुसमाज निवृत्तमार्ग बनला. पण आज अहिंसेचें तत्त्वज्ञान पटत नाहीं, त्याबद्दल कायदा नाहीं व शाकाहाराचें वैपुल्यही राहिलेलें

नाहीं, म्हणून हिंदुसमाजाला प्रशस्तमार्ग होणें भाग आहे पंचद्राविडब्राह्मणा-शिवाय इतर सर्व हिंदुसमाजानें जो विहित मांसाहार टाकून दिला आहे तो यापुढें शास्त्रीय पद्धतीनें स्वीकारून त्याचा उपयोग क्षात्रवृत्तीला पोषक होईल असा केला पाहिजे.

---

# प्रकरण नववें

## मूर्तिविषयक अद्भुत कल्पना

**जगांतील मूर्तिपूजाः**—हिंदुसमाजांत आज मूर्तिपूजेचा प्रचार आहे. जगांतील कोणत्याही समाजांत कोणत्या तरी स्वरूपांत थोड्याबहुत प्रमाणानतर मूर्तिपूजा आजही रूढ आहे मूर्तिपूजाविहीन अशा खिश्चन व मुसलमान समाजांमध्यें देवालयासारखीं पवित्रगृहें असतात त्यात ईश्वराच्या मूर्ति साक्षात् नसल्या तरी ईश्वर तेथें अदृश्य रूपानें वास करितो व भेटतो असें मानतात. रोमन कॅथॉलिक लोकांच्या देवळात त्यांतील साधूंच्या व मेरी आईच्या प्रतिमा अस तात असें ऐकण्यात येतें मूर्ति हें ईश्वरप्रणिधानाचें एक साधन आहे यात संशय नाहीं परंतु, मूर्तीमध्यें अद्भुत सामर्थ्य असतें, त्या सर्व शक्तिमान् अस तात या कल्पनेचा अतिरेक झाला म्हणजे त्या समाजाचा कार्यनाश होतो. आर्य संस्कृतीच्या अपकर्षाला जी कारणें घडलीं, त्यांतील हें एक कारण आहे. अहिंसा तत्त्वाचा जन्म जसा बुध्दधर्मांतून झाला तसाच मूर्तिपूजेचा उगमहि बुद्धाच्य महायान पथामधून झाला या मूर्तिपूजेच्या प्रसारामुळें व तद्विषयक अद्भुत कल्पनामुळें केवढें अरिष्ट ओढवलें, याचा विचार प्रस्तुत प्रकरणात कर्तव्य आहे.

**उपासनेंतून मूर्तिपूजेचा उदय**—वैदिक धर्माचें मूळचें स्वरूप लक्षात घेतलें तर, त्यात मूर्ति व प्रतीकें नसावींत असें वाटतें. वैदिक ऋषी सूर्य, वायु, वरुण, अग्नि, सोम, इत्यादि देवतांची उपासना करीत तथापि ज्या देवता पुढें निरनिराळ्या संप्रदायाला अधिष्ठानभूत झाल्या त्यांचे उल्लेख वेदामध्येंहि आलेले

आहेत. मैत्रायणी संहितेमध्यें ( २, ९, १, ) महादेव, गिरीसुत, कार्तिकेय, हस्तिमुख, नारायण, प्रभाकर, सोमराज, भास्कर, केशव इत्यादि देवतांची नांवें आलेली आहेत. कल्पनेकरता २।३ मंत्र येथें देतों.

तत्पुरुषाय विद्महे महादेवाय धीमहि
तन्नो रुद्रः प्रचोदयात्।
तत्केशवाय विद्महे नारायणाय धीमहि
तन्नो विष्णु प्रचोदयात्।
तद्भास्कराय विद्महे प्रभाकराय धीमहि
तन्नो भानुः प्रचोदयात्।

यावरून शैव वैष्णवादि संप्रदायांना अधिष्ठानभूत झालेल्या देवतांचें अस्तित्व वेदोत्तर कालचें नाहीं हें सिद्ध होतें. अनेक वैदिक देवतांपैकीं कांहीं देवतांना प्राधान्य देणें म्हणजे श्रौतधर्म होय पण हा धर्म ज्ञानमार्गाचें महत्त्व वाढल्या-वर मागें पडला. निर्गुण निराकार परब्रह्माचें महत्त्व वाढल्यावर यज्ञीय देवतांना गौणपणा आला पण निर्गुण निराकार परब्रह्माचें तत्त्व सर्व लोकांस पचण्यासारखें नव्हतें कारण त्याचें आकलन सर्वसामान्य लोकांना होणें अशक्य होतें सामान्य जनसमूहाला कांहीं तरी स्पष्ट आकृतींची आवश्यकता असते उपनिषद्‌कालीं जशी तत्त्वविचाराची लाट उसळली होती, तशीच उपासनांचीहि उसळलेली होती त्या सर्व उपासनांना व्यवस्थित स्वरूप देण्याकरता देवतांना मूर्तीचें स्वरूप देणें भाग पडलें असावें नारायणीय धर्म, सात्वत धर्म व भक्तिप्रधान भागवत धर्म असा या उपासनाधर्मांचा उत्क्रांतिक्रम आहे. यांतच चतुर्व्यूह कल्पना व नारदपांचरात्र यांची भर पडलेली आहे या सर्व उपासना संप्रदायांना श्रीमद्भगवद्‌गीतेमुळें व्यवस्थित स्वरूप आलें गीतेपूर्वी वासुदेवभक्ति प्रचारात होती वासुदेवाची उपासना परब्रह्माचें प्रतीक म्हणून करण्याची जी पद्धत गीता-पूर्वकालीं होती तीच गीतेंत आली आहे.

**बौद्धधर्म व मूर्तिपूजा**—मूर्ति व देवघर यांचा उल्लेख वाल्मिकीरामायणांतील अयोध्याकाण्डांत आढळतो तथापि देवळें, मूर्ति, पादुका, प्रतिमा हीं सर्व वैदिकधर्मांत बुद्धोत्तर कालांतच आलीं. बुद्धाच्या पश्चात् त्याच्या धर्माला जें महायान पंथाचें स्वरूप आलें त्यांतील मूर्ति, देवालयें व विहार यांना टक्कर देण्या

करता रामकृष्ण इत्यादि ऐतिहासिक व्यक्तींना देव व देऊन व शिव, विष्णु, इंद्र, सूर्य, वायु, मरुत् इत्यादि आर्यदेवाना मूर्तत्व देऊन त्यांचीं भव्य व रमणीय देवालयें उभारण्यात आलीं. बुद्धधर्माचा उदय जगांत ईश्वर नाहीं असें मानण्या पासून झाला. पण चमत्कार असा कीं, बुद्धाच्या अनुयायानीं पुढें त्यालाच ईश्वर करून सोडलें व वैदिक धर्माभिमानी हिंदु त्याला विष्णूचा नववा अवतार मानू लागले!!! बुद्धपूजेचें महत्त्व इतकें वाढलें कीं, बुद्धभक्तानीं त्याचीं हाडें, काढलेली नखें, केसाच्या बटा हीं सर्व जशीं सापडतील तशीं घेऊन त्यांची स्थापना मंदिरात करण्यात आली. बुद्धाचे रक्षावशेष ज्या ज्या मंदि रात ठेवले गेले तेथें प्रकाश पडतो व अद्‌भुत चमत्कार होतात असेंही तत्कालीन लोकाना वाटू लागलें.

**सांख्यप्रक्रिया व मूर्ति**—गीतेवर सांख्यप्रक्रियेची छाप चांगलीच पडलेली आहे. बुद्धोत्तर काळात सांख्याच्या या सत्त्वरजतमाना ब्रह्मा, विष्णु, महेशाचें स्वरूप दिलें गेलें. नुसतें त्रिगुणच काय पण सर्व सद्‌वृत्तींना देवता, व असद्‌वृत्तींना असुर कल्पून त्याचीं आख्यानें रचण्यात आलीं. या देवतामहात्म्याच्य आधारावर व्रतें, वैकल्यें, पूजा, अर्चा, सगुणोपासना, मूर्तीचे उत्सव हीं सर्व सुरू झालीं. यज्ञयागाचा अधिकार ज्याना नव्हता त्यानीं देवताचे जंगी उत्सव समारंभ चालविले. या उत्सवात श्रौतस्मार्त धर्मानुष्ठान करणारे द्विजही हळू हळू समाविष्ट झाले. यज्ञवेदीच्या ऐवजीं देवळें उत्पन्न झालीं व तत्प्रीत्यर्थ सर्वस्वत्यागाची तयारी भक्तामध्यें दिसून येऊ लागली. यावेळीं यज्ञ तर मागें पडले होते. त्यामुळें या उत्सवाना व समारंभाना अत्यंत महत्त्व आलें.

**मूर्ति व देवळें यांची गर्दी**—सहाव्या शतकाच्या सुमाराचा जगाचा इतिहास पाहिला तर, असें दिसतें कीं, मूर्तिपूजेचें साम्राज्य सर्व जगभर होतें. ख्रिस्ती, सेमेटिक, हिंदु व बौद्ध असे सर्व धर्म मूर्तिपूजेंत ' निमग्न ' असून जणु ते एकमेकाची स्पर्धाच करात होते. कोणत्याही गोष्टीचा अतिरेक झाला कीं त्याची प्रतिक्रिया दुसऱ्या टोकानें सुरू होते. सर्व जग हें मूर्तीच्या मागें वेडे होऊन गेलें असता तिचा उच्छेद करणारा पंथ निसर्ग नियमाप्रमाणेंच उपस्थित झाला. ह्याचे वेळीं म्हणजे सहाव्या शतकात चिनी प्रवासी ह्यूएनत्संग हा हिंदुस्तानांत आला होता. तव्हा त्याला देवळें व स्तूप यांचा गर्दी उसळलेली दिसली. बौद्ध व जैन तीर्थंकराचे पुतळे देवळात स्थापून त्यांची पूजा हजारों

भक्त करीत होते, तर हिंदु देवालयात हिंदुपुजाऱ्याकडून शिव, विष्णु व सूर्य यांची पूजा होई। श्रीमंत व्यापारी, बडे अधिकारी व राजे यांनीं त्या वेळीं बांधलेल्या अनेक देवळांची वर्णनें ह्युएनत्संगानें दिलेलीं आहेत. त्यांतील फक्त एक दोन देवाल्यांचें वर्णन येथें देतों. "मुलतान येथें सूर्याचें भव्य व प्रचंड मंदीर होतें. त्यांतील मूर्ति सुवर्णाची असून तिजवर रत्नजडित अलंकार होते. तिचें सामर्थ्य कांहीं अद्भुत होतें अशी कल्पना होती. मूर्तीसमोर गाणाऱ्या स्त्रियांचे तांफे एका मागून एक येऊन गायन करीत मंदिरांत नित्य नंदादीप पेटत असून धूप व फुलें मूर्तीवर सदा वाहिलीं जात त्या मंदिराला हिंदुस्थानांतील सर्व ठिकाणच्या राजेरजवाड्यांनीं मोठमोठ्या देणग्या दिलेल्या असून गरीब लोकांची जेथें अन्नवस्त्राची व औषधपाण्याची व्यवस्था होईल, अशा धर्मशाळा बांधून ठेवलेल्या होत्या." मुलतानच्या सूर्यमंदिराबरोबर काशीच्या शिवमंदिराचाही उल्लेख केला पाहिजे या मंदिरात दररोज १०००० शिवभक्त दर्शनास येत असून त्यांतील देवाची (शिवाची) पुरुषाकार मूर्ति जवळ जवळ सत्तर (७०) हात उंचीची असून फार सुबक व भव्य असल्यामुळें हुबेहुब सजीव माणसासारखी वाटे (म. यु भारत, भाग १) ह्या दोन देवाल्यांच्या वर्णनावरून राजेरजवाडे व धनिक यांच्या दातृत्वामुळें देवालयामध्यें अपार संपत्ति कशी साठत गेली हें समजतें. मूर्तीवर दागदागिने घालणें, त्यांचे उत्सव करणें, त्याकरिता हजारों रुपये खर्च करणें, खर्चाकरिता जमीनी तोडून देणें, यांतच सर्व धर्म येऊन बसला व अपार संपत्तीच्या देवालयांतील मूर्तीमध्यें अद्भूत सामर्थ्य असतें अशाहि कल्पना निघाल्या.

**देवळें द्रव्याचीं केंद्रें बनलीं** —मुसलमान येण्यापूर्वी ह्या देश विशाल व सुशोभित देवालयांनीं अगदीं फुलून गेला होता. राजे, राण्या, श्रीमंत, शेठ, सावकार यांना आपापल्या उपास्यदेवतांची मंदिरें उभारण्यांत धन्यता वाटे देवाची पूजाअर्चा षोडशोपचार विधीनें व्हावी म्हणून मोठमोठ्या देणग्यादि देण्यांत येत असत. मूर्तीवर सोनें, जडजवाहीर व दागिने यांचा वर्षाव होत असे भिक्षा मागणारे ब्राम्हण, तपस्वी, योगी हे जेव्हा अशा देवालयांचा आश्रय करू लागले तेव्हां सर्व पैसा दान देण्याजोगें सत्पात्र देवालयाशिवाय दुसरें कांहीं राहिलें नाहीं शिव व विष्णु यांच्या उपासकामध्यें देवालयें बांधण्याची अगदी चढाओढ होऊ लागली. देवालयांतील बहुतेक मूर्ति दगडाच्या असत,

पण कित्येकदा राजेरजवाडे व श्रीमत लोक त्या सोन्या-चांदीच्याहि करीत रत्नाची मूर्ति केली म्हणजे राष्ट्रांतील स्त्रीपुरुषाचें कल्याण होत, सोन्याची केली तर सत्ता प्राप्त होत, चांदीच्या मूर्तीपासून कीर्ति, पितळेच्या मूर्तीपासून दीर्घ राज्य, आणि पाषाणमूर्ति केली तर जमीन मिळते अशा समजुती त्या वेळीं रूढ होत्या दुसऱ्या पूजेचे व भोगाचेहि बहुत खर्चाचे प्रकार सुरू झाले संपत्तीचा व्यय राजे लोकानीं सैन्य, दुर्ग, मनौ, उद्योग यांचें बल वाढविण्या करिता करावयाचा सोडून दिला सब कांहीं मूर्तींच्या आराधनेनें मिळतें या कल्पनेवर राष्ट्राचा द्रव्योघ देवालयाकडे वळला. समाजाची सुस्थिति ज्या शिक्षण, आरोग्य व इतर गोष्टींमुळें होत तिकडे अजिबात दुर्लक्ष्य झालें मूर्ति व देवळ जितकी जुनाट होत तितका त्याविषयीं आदरभाव जास्त वाढे आणि भोळसटपणानें या मूर्तींच्या ठिकाणीं अद्भुत शक्ति आहे अशी लोकांची कल्पना होई लोकांच्या या कल्पनानुसार त्या वेळीं धर्मग्रथहि निर्माण झाले. वराह मिहिराच्या बृहत्संहितेमध्यें निरनिराळ्या देवाच्या मूर्ति कशा असाव्या याविषयीं माहिती दिली आहे तशीच इतर कांहीं ग्रंथामध्यें निरनिराळ्या देवतांच्या पूजाअर्चांचीहि पद्धत कथन केली आहे! हिंदुसमाजाच्या या सब भोळसट व खुळचट कल्पनाचा फायदा मुसलमानानीं बरोबर घतला मूर्तींमध्यें अद्भुत सामर्थ्य असतें या मूर्खपणाच्या कल्पनेनें हिंदु लोक प्रतिकारशून्य बनले होते त्याना मुसलमानांच्या स्वाऱ्यानीं असें दाखविलें की, तुमच्या मूर्तींत मुळीच सामर्थ्य नाहीं म्हणून त्या आम्ही फोडतों व तयें असलेली गडगंज संपत्ति लुटून नेतों! मूर्तिविषयक अद्भुत कल्पना जगातील प्रत्येक समाजात असल्या तरी या कल्पनामुळें हिंदुसमाजाइतकें दुसऱ्या समाजाचें नुकसान झालें नाहीं आढळत मूर्तिविध्वंसक मुसलमानानीं महमद कासीमपासून तों अखेरपर्यंत हिंदूंच्या या मनोभावनेचा कसा फायदा घेतला हे इतिहासातील कांहीं उदाहरणें देऊन विशद करितों.

**मुसलमानानीं केलेले मूर्तिभंग** —हिंदुस्थानावर स्वाऱ्या करणाऱ्या मुसलमानांना असें वाटे कीं, जगातील मूर्तिपूजेचें पाप धुवून टाकण्याकरितां परमेश्वरानें आम्हांस आज्ञा केली आहे मुसलमानी धर्म मूर्तिपूजेच्या विरुद्ध असल्यामुळें मूर्ति फोडण्यास त्याना मोठा धर्मोत्साह वाटे त्यांत हिंदूच्या मूर्ति सोन्याचांदीच्या व देवाळयात संपत्ति अगदीं भरपूर। त्यामुळें लुटीच्या

—आदेशें मुसलमानांचे बाहू नेहमी स्फुरण पावत असत हिंदूंच्या मूर्तिविषयक सामर्थ्याच्या अद्‌भुत कल्पना होत्या, म्हणून ते मुसलमानांची टोळधाड आली तरी अगदीं बेपर्वा असत व **ईश्वर पाहून घेणारा समर्थ आहे** अशा समजुतीनें स्वस्थ बसत अगदीं आयत्या वेळीं शत्रु येऊन गळा कापू लागला म्हणजे त्याना प्रतिकाराची बुद्धि झाली तरी तिचा उपयोग कांहीं न होता प्राणास मुकावें लागे! महमद कासीमनें सिंध देशातील देवाल बदरावर स्वारी केली या बदरात एक मोठें मंदिर होतें त्यावर एक उंच ध्वज फडकत होता त्या ध्वजात काहीं अद्‌भुत सामर्थ्य आहे व तो जोंवर पडला नाहीं तोंवर आपल्याला भी नाहीं अशा कल्पनेनें राजा व लोक स्वस्थ बसले कासमनें पहिल्याच मीं केडे मोर्चा वळविला व वरच्या घुमटासह शिखर खाली पाडलें, देवालय लुटलें व मूर्तीचा चुराडा केला! मूर्तींत काहीं सामर्थ्य आहे कीं नाहीं याची परीक्षा हिंदु लोक पहात होते पण अखेरीस तरवारींत सामर्थ्य आहे हें महमद कासीमनें सिद्ध केलें। महमद कासीम मुलतानवर चालून गेला तेथें एका ब्राह्मणानें त्याला देवालय दाखविलें. त्या देवालयात सुवर्णमुद्रांनीं भरलेल्या हंड्यावर एक सुवर्णाची मूर्ति मोठ्या माणसाच्या आकाराची होती. तिचें वजन २३० मण होतें व खाल-या हंड्यात १३२० मण सोनें होतें. हें सर्व घेऊन कासीम गेला, तेव्हा त्याला आपल्या धर्माप्रमाणें मूर्तिभजनाचें धर्मकार्य करिताच परमेश्वर केवढी कृपा करतो असें वाटलें असल्यास त्यात नवल काय?

**मुलतानची हकीगत**—मुलतानच्या सूर्यमंदिराचें वर्णन ह्युएनत्संगानें केलेलें पूर्वी दिलेंच आहे त्या उत्कृष्ट मंदिरानें युक्त असें मुलतान जरी पुढें मुसलमानाच्या ताब्यात गेलें तथापि त्यानीं सूर्यमंदिर पूर्ण उध्वस्त केलें नाहीं. कारण असें कीं, त्यामुळें हजारों हिंदु यात्रेकरू तेथें येत व देवालयात अलोट संपत्ति जमे ही सर्व संपत्ति उपटण्याचें काम मुसलमान अव्याहत करीत व कोणी प्रतापशाली हिंदु राजा मुलतानवर चालून आला कीं त्याला मंदिरातील मूर्ति फोडण्याचा धाक घालीत, तेव्हां हिंदु से य धर्मभावनेमुळें स्वारी न करतां परते या वेड्या समजुतीमुळेंच कनोजच्या प्रतिहार राजांना ज्वळ असलेलें मुलतान कधींहि काबीज करतां आलें नाहीं

**गिझनीच्या महंमदाचे हल्ले**—गिझनीच्या महमदास हिंदुस्थानावर स्वाऱ्या कराव्याशा वाटल्या त्याचें कारण तेथील संपत्तीनें त्याचा लोभ, आणि तेथील

मूर्तींनी त्याचा धर्मोत्साह प्रदीप्त केला होता हें होय गिझनींचा महमूद हिंदुस्थानात आला. त्याला येथील बहुमोल मूर्ति व अपार संपत्तीचीं देवालयें पाहून स्फुरण चढलें. मूर्तिपूजेचें पातक धुवून टाकल्यावर अल्लाची आपल्यावर मोठी कृपा होते, या भावनेनें त्यानें स्वाऱ्यावर स्वाऱ्या करून मूर्ति फोडून देवालयें उद्दून अगणित संपत्ति नेली. नगरकोटवर महमूद चालून गेला. तेथील देवाल्याच्या अद्भुत सामर्थ्याबद्दल लोकांच्या निरनिराळ्या कल्पना होत्या, म्हणून ते स्वस्थ बसले होते महमुदानें नगरकोट किल्ला काबीज करून देवालय लुटलें जवाहीर, हिरे हीं इतकीं सापडलीं कीं, तीं हातानीं मोजतां आलीं नाहींत व वह्यावर नोंदतां आलीं नाहींत ,कारण लिहिता लिहिता वह्या अपुऱ्या पडल्या ! रेशमी कापड, इतर दागदागिने, पुष्कराज, पाचू, मोती याचाही हिशोब झाला नाहीं. लुटींत सोन्याची कशीबशी मोजदाद झाली तें सोनें ७००।८०० मण होतें. महमूद स्वारी करून गेल्यावर तो व्यवस्थेकरिता आपल्या पश्चात् जे अधिकारी नेमी तेही मूर्ति फोडणें, मूर्तिपूजकाना शिक्षा करणें, लोकाना बाटविणें हीं धर्मकार्यें मोठ्या अभिनिवेशानें करीत पण हिंदु राजे मात्र १०।१५ वेळा हा विध्वंसनाचा प्रकार झाला होता तरी सावधपणानें मूर्तिरक्षणाकरिता कधींही तयारीनें रुढले नाहीत. महमुदानें १०११ मध्यें ठाणेश्वरावर स्वारी केली. तेथील प्रसिद्ध जगसोमदेव भ्रष्ट करण्याचा विचार त्यानें केला ही बातमी त्या वेळीं नुकत्याच अंकित झालेल्या दिल्लीच्या आनंदपालाला कळली. त्यानें मूर्ति न फोडण्याविषयीं निरोप पाठविला पण महमदानें तो न मानता असें कळविलें कीं, महंमदी धर्माचे भक्त स्वर्गांत पुण्यफळ मिळण्यासाठीं मूर्तिपूजा नष्ट करण्याचा नेहमीच प्रयत्न करतात हा निरोप ऐकून हिंदु राजे सावध झाले व मूर्तींचें रक्षण करण्यासाठीं त्यानीं सर्व हिंदुस्थानचे हिंदु बोलावले पण ते जमण्यापूर्वीच महमुदानें ठाणेश्वरावर हल्ला करून मूर्ति फोडून देवालय लुटून आपलें कार्य उरकलें हें सांगणें नकोच ! महमुदानें मथुरेवर स्वारी करून तेथील देवालय उद्दून अगणित संपत्ति नेली. मूर्तींचे जे ढीग सांपडले त्यात ५ हात उंचीच्या सोन्याच्या ५ मूर्ति सापडल्या एका मूर्तीवर बसविलेलें एक रत्न सापडलें त्याची किंमत १॥–२ लाख रुपये तरी असावी दुसऱ्या एका मूर्तीवर बहुमोल किंमतीचा नीलमणी मिळाला एका मूर्तीच्या पायाच्या सोन्यातून अशींच रत्नें मिळालीं चांदीच्या मूर्ति इतक्या होत्या कीं, त्याचें वजन करता करता लोक थकले महमुदाच्या

कानावर सोमनाथ देवालयाचें ऐश्वर्य गेलें तेव्हां एखाद्या मोठ्या राजापेक्षा या देवालयाचें ऐश्वर्य ऐकून महमूद थक्क झाला त्यानें मनात असें आणलें कीं, सोमनाथावर स्वारी करून मूर्ति फोडून हिंदूंचे देव खोटे आहेत असें त्याच्या प्रत्ययास आणतों म्हणजे ते आपल्या धर्माचा स्वीकार करतील.

**सोमनाथावरील आक्रमण**:—सोमनाथाची मूर्ति अखिल भरतखंडात प्रसिद्ध होती. विशेषत चंद्रग्रहणाच्या रात्रीं तेथें अफाट यात्रा जमे. दररोज मूर्तीच्या अभिषेकास गंगेचें पाणी येई व हजार ब्राह्मण अभिषेकास बसत. दररोज येणाऱ्या यात्रेकरूंचें श्मश्रू करण्याला ३०० न्हावी पुरत नसत! देवालयाच्या खर्चाकरितां १०००० गांवें इनाम दिलेलीं होतीं. त्यातून दररोज षोडशोपचार पूजा यथासांग होई. देवापुढें नुसत्या गाणारणींची संख्या ३०० पेक्षां अधिक होती. अशा ऐश्वर्यानें संपन्न असलेला देव महासमर्थ आहे अशा समजुतीनें लोक स्वस्थ होते महमद ३०००० घोडदळ व इतर पुष्कळ सैन्य घेऊन सोमनाथाजवळ आला तरी सोमनाथ महमदाचा नाश करील, अशा विश्वासानें लोकांनीं बंदोबस्त ठेवला नाहीं व प्रतिकार केला नाही. उत्तरेकडील देवाचा विध्वंस झाल्याच्या वार्ता गुजराथच्या हिंदु लोकांनीं जेव्हां ऐकल्या तेव्हां सोमनाथाच्या अवकृपेमुळें तिकडील देशाची दुर्दशा झाली असें हे म्हणत असत. महमद अगदीं तटा जवळ येऊन पोंचला तरी हिंदु लोक किल्ल्याच्या तटावर उभे राहून मुसलमानाकडे पाहून खदखदा हसत होते व सोमनाथ तुमचा सर्वांचा नाश करील असें म्हणून त्याला भीती घालीत होते पण थोडक्याच वेळांत महमूद शिड्याच्या साह्यानें तटावर चढला, किल्ल्यात उतरला व कत्तल करूं लागला तेव्हां सर्व हिंदु देवळांत शिरले व देवापुढें नाकें घासून, पालथे उलथे पडून देवाची करुणा भाकूं लागले. हिंदु लोक देवळात शिरत, देवापुढें रडत, गुडघे टेकीत, हात जोडीत, देवाची प्रार्थना करीत व देवळांतून बाहेर येऊन मरेपर्यंत लढत. हिंदूंनीं आयत्या वेळीं देवळाजवळ फोवानें मतस होऊन प्रतिकार केला, पण तो प्रतिकार म्हणजे मृत्यूला कवटाळणें होतें. महमदानें ५०००० पेक्षा अधिक लोकांची कत्तल केली व मूर्ति, सोनें, दागिने, जडजवाहीर असें सर्व सुमारें ६०।७० लाख किंमतीचें द्रव्य घेऊन त्यानें प्रयाण केलें. महमुदानें गिझनीस गेल्यावर या सर्व द्रव्याचें प्रदर्शन भरविलें व आपल्या अनुयायांना धर्मनिष्ठाच्या साह्यास्यारला देव कसा तत्पर आहे हें प्रत्यक्ष दाखविलें! महमुदानें धर्मोत्साहाच्या

भरांत मूर्तीचा विध्वंस केला व मूर्तिपूजकांना अत्यंत निष्ठुरतेनें वागविलें. हें त्याचें वर्तन डोळ्यापुढें ठेवून त्याच्या पश्चात् आलेल्या मुसलमानांनी तसेंच वर्तन केलें.

**महंमुदाचें अनुकरण**—बखत्यार खिलजीनें १२०२ मध्यें बहार प्रांतात ब्राह्मणाचें प्रसिद्ध विद्यापीठ होतें तें धुळीस मिळवून सोडलें. अल्तमशनें १२३१ त विक्रमादित्याची राजधानी जी उज्जनी ती घेऊन तेथील सर्व देवालयाचा विध्वंस केला! अल्लाउद्दीन खिलजीनें चितोड पाडाव केल्यावर तेंच केलें व गुजराथेवर १२९७ त स्वारी करून सोमनाथाचें देवालय पुनरपि लुटलें. गिझनीच्या महमदाच्या स्वारीनंतर सोमनाथाची नवीन मूर्ति बसविली होती ती अल्लाउद्दीनानें फोडली व तिचे तुकडे दिल्लीच्या मशिदीच्या पायऱ्यांना लाविले! गुजराथचा सुलतान मुजफरशहा यानें गुजराथेंतील बहुतेक देवालयाचा विध्वंस करून तेथें मशिदी उठवून दिल्या. सुलतान अहमदशहानें १४१४ मध्यें ताजुल्मुल्क नामक एका धर्माभिमानी मुसलमानी गृहस्थाची धर्मवृद्धीच्या खात्यावर नेमणूक केली. त्यानें दरोबस्त हिंदु देवालयाचा व मूर्तीचा फडशा उडवून तेथें मशिदी बांधून धर्मवृद्धीच्या खात्याची गुजराथमध्यें मोठी वाढ करून दाखविली. १४७४ त अहमदशहा बरानें बागुळच्या राजावर स्वारी करून त्यास ठार केलें व मुलुखातील देवळें पाडून तेथें मशिदी उठवून दिल्या. ज्यांत अद्भुत सामर्थ्य आहे अशा कल्पनांच्या मूर्ति व अपार संपत्ति आहे अशीं देवळें लुटल्याचा इतिहास मुसलमान आल्यापासून भरगच्च भरलेला आहे. विस्तारभयास्तव अधिक उदाहरणें देत नाहीं

**हिंदूंच्या मिळमिळीत धर्मभावना**—मुसलमानांनीं जाज्वल्य धर्मभावनेनें मूर्तीचा विध्वंस केला आणि हिंदूंनीं चुकांच्या व मिळमिळीत कल्पनेनें तो सहन केला. मूर्तीमध्ये सामर्थ्य आहे, ती बघून घेईल ही कल्पना दहावीस मूर्ति फुटल्यानंतर चुकीची आहे असें हिंदूंच्या ध्यानात आलें असावें. पण अवतारवेड, कलियुग, दैववाद* आणि अशाच भोळसट धर्मवेड्या कल्पनांमुळें ते निष्क्रिय राहिले. मूर्तीचा विध्वंस झाला, देवालयें लुटलीं, असें ऐकलें कीं, हे

---

* टीप—या विषयावरील विवेचन 'हिंदु समाज समर्थ कसा होईल' या आमच्या ग्रंथात पाहा.

धर्मभोळे लोक असें म्हणत कीं, देवसुद्धा ज्यापुढें नम्र होतात त्याचा विरोध मनुष्यानीं करणें निरर्थक आहे! मुसलमान मूर्ति फोडून देवाचा अपमान न करता ते देव ज्या समाजाचे आहेत त्याचा अपमान व धिःकार ते करतात असें हिंदूंना वाटलें नसावें काय? उलट महमुदाविरुद्ध देवाचें सुद्धा कांहीं चालत नाहीं, देवाचें जेथें चालत नाहीं तेथें दुर्बळ माणसें काय करणार? तो ईश्वरी अवतार नसेल कशावरून? कलियुगांत धर्माचा उच्छेद होणार असें पुराणांतरीं जें लिहिलें आहे तें खोटें कसें ठरेल? कलियुगामध्यें जर हा असा उच्छेद होणारच असेल तर देव तरी काय करणार? देवाला जर आपलें ऐश्वर्य व आपली पूजा पाहिजे होती तर त्यानें या लुटारूचे हात तोडले नसते काय? किंवा त्याच्या अवकृपेमुळें ते आपोआप तुटले नसते काय? डोळे गळून पडले नसते काय? तरवारी बोथट झाल्या नसत्या काय? पण ज्या अर्थी असें कांहीं झालें नाहीं त्याअर्थी ईश्वराला हा धर्मोच्छेद मान्य आहे त्यानेंच ही प्रेरणा केली आहे, अशा चुकीच्या, भोळसट व मूर्खपणाच्या समजुतीनें हिंदु फसले, प्रतिकारशून्य राहिले व प्राणास मुकले! मुसलमानांनीं इतका हाहा कार उडवून दिला तरी हिंदु लोक शुद्धीवर आले नाहींत.

**धर्मशास्त्र व मूर्तिपूजा**—हिंदुधर्मशास्त्रदृष्ट्या या मूर्तिपूजेचा विचार केल्यास लोकांच्या मूर्तीबद्दल अशा भोळसट कल्पना कशा झाल्या याबद्दल आश्चर्य वाटतें! मूर्तीच्या योगानें मनाला निश्चल करितां येतें, ध्यानधारणा होते आणि भक्ति व भाव दृढ करितां येतो, याशिवाय या प्रतीकामध्यें कांहीं सामर्थ्य नसतें असें बादरायणानां आपल्या सूत्रांत स्वच्छ सांगितलें आहे "**न प्रतीके न हि सः**" कोणत्याहि देवतेची प्राणप्रतिष्ठा झाल्यावरच तिला महत्त्व येतें आवाहन व विसर्जन हे वैदिक विधी मूर्तीमध्यें देवपणा आणतात व घालवितात उदाहरणार्थ, मृत्तिकेचे गणपति देव म्हणून पुजून पुन फेकून देण्यांत येतात हें प्रत्यक्ष हिंदुसमाज पाहात असतां त्यांच्या भावना अद्याप पालटल नाहींत याला काय म्हणावें हें कळत नाहीं दगडांत सामर्थ्य नाहीं, देवपण नाहीं, अद्भुतपणा नाहीं तर सर्व कांहीं मानवी श्रद्धेमध्यें आहे, तपामध्यें आहे व उद्योगामध्यें आहे सोन्याची मूर्ति केल्यानें व तिला जडावाचे अलंकार घातल्यानें अधिक पुण्य आहे ही समजूत खोटी आहे देवळें व मूर्ति यावर सोनें व जवाहीर लादल्यानें कोहीं मोक्ष मिळतो असें

नाहीं तर ईश्वरस्वरूपानें पाषाण-मृत्तिकादि प्रतीकाची जी उपासना निष्ठेनें व निग्रहानें करण्यात येते त्यामुळेंच सामर्थ्य उत्पन्न होतें असा शास्त्राचा सिद्धान्त आहे हा सिद्धांत हिंदुसमाजाच्या गळीं उतरविला पाहिजे मूर्तीमध्यें सामर्थ्य नाहीं तर तें भावामध्यें आहे "भाव तोचि देव, भाव तोचि देव" असें तुकाराममहाराज अग्रहासानें सांगतात. मूर्तीची उपासना ईश्वर या भावनेनें, निष्ठेनें, श्रद्धेनें, व आस्थेनें केली म्हणजे त्यामुळें मूर्तीचें सामर्थ्य न वाढता माणसाचें सामर्थ्य वाढतें. सर्व जगाला व्यापून असणारें जें ईशतत्त्व तें केव्हाही मरत नाहीं, तुटत नाहीं, फुटत नाहीं, वाळत नाहीं, झिजत नाहीं, विटाळत नाहीं, तर तें सदैव अविनाशीच असतें त्या तत्त्वाचें आकलन होत नाहीं, म्हणून सगुणोपासना प्रचारात आली चित्तैकाग्र्याच्या दृष्टीनें या उपासनेचें महत्त्व फार आहे. ज्या मूर्तीच्या उपासनापासून भाव, निग्रह, आत्मविश्वास, श्रद्धा व चित्तैकाग्र्य याचा लाभ होऊन चित्तशुद्धि होते, त्या मूर्तीचें संरक्षण करण्याकरतां हिंदुसमाजानें बद्धपरिकर असलें पाहिजे. ज्या समाजाला आपल्या देवाचें रक्षण करता येत नाहीं व घरचे देव सांभाळता येत नाहींत, त्या समाजानें रक्षण देव तरी कसें करतील? 'धर्मो रक्षति रक्षितः' हें वचन जरा फिरवून 'देवो रक्षति रक्षितः' असें म्हटलें तर काहीं हरकत नाहीं. देवाचें रक्षण जर समाजानें केलें तरच त्या समाजाच्या रक्षणास देवही प्रसंगीं आपली शक्ति पाठवितील कारण परस्पर भावयत ' असा न्याय आहे सर्व काहीं देव करतो किंवा सर्व काहीं देवानच होतें, मूर्तीमध्यें सामर्थ्य आहे आणि देव दुष्टाना पाहून घेतील हे वाद दुर्बळाचे आहेत दैवतें हीं मन्त्राधीन आहेत, ते मन्त्र माणसाधीन आहेत, म्हणजे मनुष्य आपल्या भावनेनें दगडात देवत्व आणतो अशी खरी स्थिति आहे.

**जसे लोक तसे त्याचे देव**—तेजस्वी लोकाचे देव तेजस्वी असतात, बल्वानाचे देव बल्वान् असतात, सहिष्णु समाजाचे देव सहिष्णु असतात, आणि जयिष्णु समाजाचे देव जयिष्णु असतात तुकाराममहाराजाचा देव विठोबा होता, तर समर्थांचा देव जयिष्णु वृत्तीचा कोदण्डधारी राम होता म्हणून हिंदुसमाजानें ज्या शेळपट व मिळमिळीत वृत्तींनीं आपला नाश झाला आहे त्या सोडून जरा जिवंत व समर्थ वातावरणात आलें पाहिजे मूर्तीच्या हातात चक्रगदा हीं आयुधें भक्तानें दिलीं तर देव म्हणतो, यानीं मी दुष्टाचा संहार करीन हातांत कोणतेंहि शस्त्र न दिलें तर देव म्हणेल मी

आशीर्वाद देईन सारांश भक्त जसा बनवील तसा देव बनतो, जसें वदवील तसा तो वदतो परमेश्वरानें शेकडों वेळा सांगितलें आहे कीं, " अहं भक्तपराधीनः अस्वतंत्रः " मी भक्ताच्या आधीन आहें भक्ताच्या आवाहन-विसर्जनामध्येंच माझें देवत्व आहे देवाच्या मूर्ति स्वत काही करणार नाहींत त्या तरवार घेऊन धावणार नाहींत, वा गदा घेऊन झडप घालणार नाहींत हें सर्व माणसानींच करावयाचें असतें ज्या समाजात , उत्कृष्ट, जळजळीत व तीव्र अशा भावना असतील त्या समाजाला परमेश्वर पराक्रमाची बुद्धि देतो परमेश्वर समर्थ समाजाला समर्थ कर्मे करण्याची व दुबळ्या समाजाला दुबळी कर्मे करण्याची बुद्धि देतो परमेश्वर भक्ताचें सरक्षण करतो याचा अर्थ सुद्धा हाच कीं, तो भक्ताला प्रतिकारक्षम अशी बुद्धि देतो महाभारतात याबद्दल मोठें मार्मिक विवेचन उद्योगपर्वांत आलेलें आहे

" न देवा दंडमादाय रक्षंति पशुपालवत्
यं तु रक्षितुमिच्छंति बुद्ध्या स विभजंति तम् "
( म. भा ५।३५।४० )

" यस्मै देवाः प्रयच्छंति पुरुषाय पराभवम्
बुद्धिं तस्यापकर्षंति सोऽवाचीनानि पश्यति ॥
( म भा ५।३४।८१ )

म्हणजे, देव ज्याच्या रक्षणाची इच्छा करतात, त्याला रक्षणक्षम अशी बुद्धि देतात. पण ज्या समाजात काहीं कर्तृत्व नाहीं, त्या पड्या व मारखाऊ समाजाची बुद्धि भ्रष्ट करतात. मूर्तिविषयक अदभुत कल्पना महाभारतात नाहींत, गीतेंत नाहींत, स्मृतींत नाहींत, व श्रुतींतही नाहींत. परमेश्वराविषयीं शास्त्राचा सिद्धान्त हा कीं, तो साक्षी कूटस्थ प्रभू असा आहे. घरात ठेवलेला दिवा हा जसा गृहव्यापाराला प्रवृत्तिभूत असतो, तो जसा कुणाचें नियमन किंवा निवारण करीत नाहीं, तशी स्थिति ईश्वराची आहे. म्हणून हिंदुसमाजानें अवास्तव आणि अशास्त्रीय कल्पना टाकून देऊन आपल्या समाजाच्या मानाकरता देवळाचें व देवाचें सरक्षण निवावर उदार होऊनच केलें पाहिजे.

**मूर्ति फोडणाऱ्याचे हेतु**–मुसलमानांनीं मूर्ति फोडल्या त्या त्यांच्या धर्मांत तशी आज्ञा आहे म्हणूनच केवळ फोडल्या असं नाहीं, तर हिंदुसमाजाचा अपमान

व्हावा म्हणूनच त्या फोडल्या! दगडाची, सोन्याची, चांदीची मूर्ति फोडून त्यांना दगड, सोनें, व चांदी यांचा कांहीं अपमान करावयाचा नव्हता. या धातूचा अपमान त्यांना जर कर्तव्य असता तर त्यांनीं सोन्याचांदीची लूट कधींही केली नसती. धर्माज्ञा म्हणून जर मूर्ति फोडावयाच्या होत्या तर स्मशानात, रस्त्यावर व इतर बेवारशी मूर्ति पुष्कळ होत्या. परंतु त्याकडे त्यांनीं ढुंकून न पाहता ज्या मूर्तींना महत्त्व आहे तिकडेच मोर्चा वळविला मूर्ति फोडण्यामध्यें तिच्याभोंवतीं असलेल्या देवविषयक कल्पनेचा नायनाट करावयाचा होता आणि त्या कल्पना ज्या समाजात आहेत त्याचा धिःकार करावयाचा होता तसा अपमान व धिःकार मूर्ति फोडून व देवाल्यें लुटून त्यांनीं केला पण हिंदु-समाज, दैववाद, देववाद, मूर्तिविषयक अद्भुत कल्पना, कलीअवतार असल्या कल्पनांनीं भारून गेल्यामुळें त्याला तो अपमान वाटला नाहीं हिंदुसमाजाला वाटलें कीं, हा देवाचा व मूर्तींचा अपमान आहे, तेव्हां देव पाहून घेईल पण परमेश्वरानें काय पाहून घेतलें हें इतिहास सांगतच आहे हल्लीं इंग्रजांचें राज्य आहे या राज्यांत जर राजाच्या पुतळ्याला कोणी डांबर फासील, किंवा पंचम जॉर्ज बादशहाचा फोटो भर रस्त्यात अपमान करण्याच्या हेतूनें पायाखालीं तुड-वील तर त्याला तावडतोब शिक्षा होईल याचें कारण हेंच कीं हा अपमान त्या धातूचा, पुतळ्याचा किंवा फोटोचा नसून तो ब्रिटिश राज्याचा आहे, त्या सत्तेचा उपमर्द आहे, असेंच समजलें जातें म्हणून हिंदूंनींही देवताचा अपमान म्हणजे समाजाचा अपमान असें समजलें पाहिजे फोटोंत जॉर्ज बादशहा नाहींत, पुतळ्यात राजा नाहीं, असें असतानाजर अपमान होतो, तर हिंदूंच्या मूर्तींचा भंग झाला तर तो समाजाचा अपमान नव्हे काय? देवाची निंदा केली तर ती आपली निंदा आहे, वेदाचा तिरस्कार केला तर तो आपला तिरस्कार आहे, देवळें भ्रष्ट केला तर तें आपल्याला लांछन आहे, पौर्वें अत्या चार घडले तर तें समाजाला आव्हान आहे, अशा भावनेनें हिंदुसमाजानें स्वसंरक्षणसमर्थ झालें पाहिजे जिवंत समाजातील भावना कोणत्याही विषया मध्यें तीव्र, उत्कट, जळजळीत व यथार्थ असतात मुमुर्षु समाजात त्याचा अभाव असतो खटला चालला घर देवाचा (म्ह. मूर्तीचें) डोकें, आजार ... कीं कर मूर्तीला अभिषेक, मोठी आपत्ति आली कीं घे देवाच्या दारात धरणें, परीक्षा नापास झाली कीं कर देवाला नवस, असल्या कल्पना आज

सुद्धा प्रत्यक्ष दिसत आहेत. असल्या भोळसट व कार्यकारणविहीन कल्पनांनी आर्यसंस्कृतीचा अपकर्ष आजवर चालला आहे. म्हणून उत्कर्ष व्हावा अशी इच्छा असल्यास ह्या भोळसट कल्पनांचा नायनाट केला पाहिजे.

**सद्य स्थितीत नवीं देवळें बांधणें हें पाप होय**—मध्यकालीन राजांनी व धनिकांनी मूर्ति व देवळें यांत सव पैसा खर्च करून मुसलमानांना स्वाऱ्या करण्यास आमंत्रण दिलें, हें वर आपण पाहिलेंच आहे. एवढा अनर्थ ओढवला तरी अद्याप मूर्ति व देवळें यांचा हव्यास कांहीं पुरा होत नाहीं. मुलगा नसला बांध देऊळ, नष्टांश झाला कर मूर्तीची स्थापना, एकाद्या कामांत कल्पनेपेक्षा अधिक पैसा मिळाला की कर एकाद्या देवाची प्राणप्रतिष्ठा आणि दे त्याला हजार-दोन हजारांचें उत्पन्न तोडून! असलीं कामें जीं हिंदुसमाजांत आज दिसत आहेत, त्यामुळें आपला अपकर्ष असाच होणार असें वाटतें. देवालयें बांधण्यापेक्षा रुग्णालयें, अनाथालयें, सभालयें, विद्यालयें अशा आलया-मध्यें तो पैसा खर्च झाला पाहिजे. मूर्तीची स्थापना करण्यांत, त्यांना नटवण्यांत, सजवण्यांत, त्यांवर अलंकारांची ओझीं घालण्यांत आज पुण्य नाहीं. तर तें द्रव्य शिक्षण, आरोग्य, उद्योग, शरीरसामर्थ्य यांकडे खर्च करण्यांत महत्पुण्य आहे, असें समजलें पाहिजे. देवाला उत्पन्न देऊन केवळ धर्मभावनेवर आळशी पुजाऱ्यांची जगण्याची सोय करण्यापेक्षा तो पैसा अस्पृश्यांना स्पृश्य करण्यांत, निरक्षरांना साक्षर करण्यांत आज महत्पुण्य आहे, असें समजलें पाहिजे. परमेश्वर देवळें बांधून भेटत नाहीं, मूर्ति स्थापिल्यानें तो धावून येत नाहीं, तो अनन्यभावाला व भक्तीलाच वश होतो. परमेश्वर हा धनवानापासून नेहमी भाव इच्छितो म्हणून देवांना म्हणजे मूर्तींना द्रव्य व अलंकार यांपासून शक्य तितकें लांब ठेविलें पाहिजे. प्राचीन ऋषी तर चंद्र, सूर्य, वायु, वरुण अशा देवतांचे उपासक होते. त्या देवताकरतां त्यांना देवळें नको होतीं, मूर्ति नको होत्या, अलंकार नको होते, द्रव्यहि नको होतें. पण पुढें अजागळ, प्रतिकारशून्य, पण श्रीमंत अशा भक्तांनीं देवाला आपल्यासारखें केलें. त्याचे दुष्परिणाम आजपर्यंत भोंवले लुटारू, चोर व आळशी अशांनीं या धर्मभावनेचा फायदा घेतला व आपला धिक्कार केला. वास्तव आतां नवीन देवळें नकोत व नव्या प्राणप्रतिष्ठाही नकोत.

**आजचीं देवालयें सर्वांना मोकळीं असावींत**—समाजाला आपल्या देवळांचें रक्षण करतां येईल असा एकच देव असावा. त्याचें एकच देवालय

असावें. वेवारशी असरक्षित असे देव व देवाऱ्यें ठेवण्यात हशील नाहीं, त्याच प्रमाणें मूर्तिविषयक अद्भुत कल्पनाचें खूळ ठवण्यामध्येंही अर्थ नाहीं. तसेंच या देवाल्यामध्यें अमक्यानीं जाव व तमक्यानीं जाऊ नये हेही निर्बंध आता उपयोगी नाहींत. देवान्या घरीं सर्व सारख आहत म्हणून सर्व हिंदूना देवळें मोकळीं पाहिजत *. अस्पृश्यतेचें उच्चाटण करेचसें चालू आहे. तिचें समूळ उच्चाटण करून अस्पृश्य हिंदूचा वर्ग कमी झाला की सर्व हिंदु, स्पृश्यच आहेत. मग त्याना लावून देवदर्शनास प्रतिबंध करण्याचें मुळींच कारण नाहीं. देवाचें संरक्षण करण्यास सव हिंदुसमाजानें जर पुढें आलें पाहिजे तर तीं देवळें सर्वांना मोकळीं केला पाहिजेत व त्यातील देवाचें दर्शन सर्वांना झालेंच पाहिजे. तरच त्या देवाबद्दल आत्मीय भाव वाटेल !

**देवाचें पावित्र्य नष्ट होत नाहीं**—देवें पवित्र आहे, तो कधी अपवित्र होत नाही व विटाळत नाहीं. सर्व स्पृश्यास्पृश्य हिंदूंनीं लावून दर्शन घतलें तर, देवाचें पावित्र्य नष्ट होईल अशी काहींना भिती वाटते. पण खरी स्थिति अशी आहे की, प्रत्यक देवाजवळचें पावित्र्य तेथील पुजाऱ्यानाच भ्रष्टविलेलं असतें. पावित्र्य हें भावनत असतें. द्रव्याजना-करता अनेक धंदे करणारे भाविक लोक देवाकडे गेलात. पण पुजाऱ्याचा द्रव्योत्पादक धंदा 'देवच' असल्यामुळें त्यानीं त्याचा बाजार माडलेला असतो. इतर लोकात कोणत्याही देवतेबद्दल जितका आदर असतो तितका पुजाऱ्यात कधीच नसतो. देव हा विषय त्याच्या श्रद्धेचा नसून तो **त्याचा पोटापाण्याचा विषय असतो !** देवाचा क्रयविक्रय ते नेहमी करतात. देव आपला ऋणी आहे या समजुतानें ते त्या देवाचा दुरुपयोग करतात. चोर व लुटारू हे देवाचा विध्वंस करून सव लुटतात. पुजारी अप्रत्यक्ष विध्वंस करून साफ सुरतपणें सव लुटत असतात. तेव्हा पावित्र्य विघडलें ही शंका न बाळगता सव हिंदूना सर्व देवळ लावून दर्शनार्थ मोकळीं केलींच पाहिजेत. मूर्त विटाळते ही सुद्धा चुकीचीच कल्पना आहे. **जो विटाळतो तो देव नव्हे व जो बाटतो तो हिंदु नव्हे असें नरनारान समाजात आलें आहे.** देव

*टीप—वर्ध्यांच शेठ बजाज यानीं गेल्या जुलै महिन्यात आपलें लक्ष्मीनारायणाचें मंदिर दर्शनार्थ सर्वांना मोकळें करून अभिनंदनीय उपक्रम केला आहे.

हा व्यापक आहे, विभू आहे, विटाळातीत आहे. तो सदा पवित्र आहे. त्याला षोडशोपचार पूजा नको, अलंकार नको, इनाम नको व इतर ऐश्वर्य नको. त्याला जात नको, पंथ नको व वर्ण नको. तर त्याला केवळ भाव, भक्ति, प्रेम, माणुसकी, शील हीं पाहिजेत. परमेश्वराला जे गुण प्रिय आहेत ते गुण अंगीं आणण्याचा यत्न हिंदुसमाजानें केला पाहिजे. परमेश्वर यश, श्री, औदार्य, ज्ञान, वैराग्य व ऐश्वर्य या षड्गुणांनीं संपन्न आहे म्हणून हिंदुसमाजानें नेहमी यश मिळवून त्याला प्रिय व्हावें. विद्या व लक्ष्मी यांनीं युक्त व्हावें, औदार्यानें जगाला थक्क करावें, ज्ञानानें सर्व जगावर छाप पाडावी, वैराग्याचा अवलंब करून जगाला शिष्य बनवावें आणि सर्व प्रकारच्या ऐश्वर्यानें जगाला ललामभूत होण्याची इच्छा करावी. परमेश्वरप्राप्तीचा हाच खरा मार्ग आहे व याच मार्गानें आर्यसंस्कृतीचा उत्कर्ष होणार आहे.

---

## प्रकरण दहावें

### बाटाबाटी, विटाळचंडाळ व स्त्रियांविषयीं अनुदार वृत्ति

**बाटविण्याचें सत्र**—इस्लामसंस्कृतीचा आर्यसंस्कृतीवर पगडा बसण्यास हिंदूंच्या पावित्र्यविषयक भ्रामक समजुतीही कारणीभूत झालेल्या आहेत. मुसल-न आले, त्यांनीं हिंदूंच्या या कल्पना पाहिल्या आणि त्यांचा उपयोग करून तला. हिंदुसमाजाला मुसलमान येईपर्यंत बाटविणें, धर्मांतर करणें व त्याबरो-र समाजांतर्गत करणें या गोष्टी मुळींच माहीत नव्हत्या. एवढी मोठी बौद्ध-क्रान्ति झाली तथापि समाजान्तराचा उपक्रम त्या वेळीं झाला नव्हता. आस्तिक नास्तिक मताचीं माणसें होतीं. परंतु तीं एका राजकीय नियंत्रणाखालीं एकाच समाजांत व एका कुटुंबामध्यें गुण्यागोविंदानें राहात असत. सम्राट् अशोक व कनिष्क यांनीं बौद्धधर्माचा प्रसार केला पण तो सहिष्णु वृत्तीनेंच केला. परंतु मुसलमानी खाक्या सर्वच कांहीं विशेष असल्यामुळें त्यांनीं छळबलानें

बाटविण्याचें सत्र सुरू केलें या वेळीं हिंदूंच्या पावित्र्याविषयक कल्पना अगदींच भ्रामक होत्या हिंदु मनुष्य हा खाऊन बाटतो, विकून बाटतो, ससर्गानें पतित होतो असें हिंदु लोक समजत. हिंदुत्व हें सस्काराश्रित नाहीं, तें अमुक देव, अमुक ग्रंथ, अमुक आचार पाळल्यानें येत नाहीं हिंदुत्व हें केवळ जन्मानेंच येतें. ही समजूत काहीं यार्दृंट नव्हती. पण जन्मानें आलेलें हिंदुत्व हें मरणाशिवाय अर्थात् जन्मातरावाचून कधींहि जात नाहीं ही जोरदार कल्पना त्या वेळीं समाजात नव्हती ती असती तर, जन्मानें प्राप्त करून घेतलेलें हिंदुत्व हें कांहीं खाण्यानें, पिण्यानें किंवा ससर्गानें नाहींसें जात नाहीं, अशा समजुतीनें हिंदु समाजाचें वर्तन घडलें असतें. ही कणखर वृत्ति हिंदुसमाजात नाहीं हें प्रथमत महमद कासीमनें ताडलें व बाटविण्याचा धडाका सुरू करून आपल्या पश्चात् येणाऱ्या अनुयायाना त्यानें एक मार्गच मोकळा करून दिला महमद गिझनी, महमद घोरी इत्यादि प्रथम प्रथम मुसलमानी स्वाऱ्या करणाऱ्या मुसलमानापासून तों पुढें दिल्लीपासून गोवळकोंड्यापर्यंत झालेल्या सर्व मुसलमान शहाचें, बादशहाचें व सुल्तानाचें हिंदूना बाटविणें हें एक आवश्यक असें धर्मकृत्यच होऊन बसलें व बाटून भ्रष्ट होणें हें हिंदुसमाजाच्या कपाळीं पडलें.

**राजकीय हेतु व संख्यावृद्धि**—आज हिंदुस्थानात एकदर ७ कोट मुसलमान आहेत ९०० वर्षांपूर्वी सिंधु नदीच्या अलीकडे एकही मुसलमान नव्हता, तेथें आज त्याची सख्या पाच कोट आहे हे सर्व मुसलमान एतद्देशीय हिंदूचेच बनलेले आहेत प्रारभीं प्रारभीं बरेच मुसल्मान इकडे आले त्याच्याबरोबर स्त्रिया मुळींच नव्हत्या असें म्हटलें तरी चालेल त्यानीं जुल्मानें हिंदु स्त्रियाशीं लग्नें करून आपली प्रजा वाढविली व जुल्मानें हिंदु लोकाना बाटवून त्यानीं आपली सख्या कशी वाढविली हें पुढील इतिहासावरून वाचकाच्या लक्ष्यात येईल

महमद कासीमनें देबाल घेतल्यावर तेथील ब्राह्मणाना व इतराना बाटविलें, नतर तो जेथें जेथें गेला तेथें तेथें त्यानें बाटवूनच आपलें स्मारक मागें ठेविलें गिझनीच्या महमदानें भाटिया काबीज केल्यावर तेथील लोकाना मुसल्मान केलें तसेंच पजाबातील लोकाना जिंकून जबरदस्तीनें बाटविलें गिझनीच्या महमदाच्या बाटविण्यामध्यें धार्मिक उत्साह तर होताच पण त्याशिवाय राजकीय हेतूही होता। खैबरखिंड व खुरासान या प्राताताले सर्व लोक हिंदु होते,

पण त्यांना बाटविण्यानेंच राज्याचा बळकटी आहे ही कल्पना महंमदानें मनांत धरलेली असावी. कारण हे प्रांत बाटविले गेल्यामुळें या लोकांना मुसलमानां-विषयीं द्वेष वाटण्याचें कारणच राहिलें नाहीं. त्यामुळें महंमदाचा हिंदुस्थानांत वरचेवर येण्याचा मार्ग अगदीं सुलभ झाला. राज्याच्या एकीकरणास त्या राज्यां-तील लोकांच्या धर्मभावना एक असाव्यात हें तत्त्व महंमदानें ओळखलें व जिंक-लेल्या प्रांतांचें दृढीकरण करण्याचा त्यानें बाटविणें हा एकच मार्ग शोधून काढला. परक्या देशांत एकदां स्वारी करून गेल्यावर तेथील लोकांना राज्याबद्दल व अधिकाऱ्यांबद्दल आपलेपणा कसा वाटणार? उलट अधिकाऱ्यांना फितूर करून घेऊन बंडें होण्याची किंवा अधिकार न जुमानण्याचीच भीति! अशा वेळीं कांहीं लोकांना बाटवून, कांहींना अधिकार देऊन आपलेसे केल्यामुळें तेच लोक मुसलमानी राज्याचे प्रथम हितचिंतक व पुढें आधारस्तंभ बनले! अगदीं परक्या राज्यकर्त्यांविषयीं प्रेम वाटणारा एखादा वर्ग प्रथम उत्पन्न करावा लागतो. तसा वर्ग उत्पन्न करण्याची युक्ति त्यावेळीं बाटविणें ही होती. बाटविण्याच्या युक्ती-वरोबर आणखीसुद्धां एक डाव केला गेला तो लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे. मुसलमानांनीं खुरासान, पंजाब व उत्तर हिंदुस्थान इत्यादि भागांत पुष्कळ लढाऊ क्षत्रिय जातीच बाटविल्या! सटरफटर भेषपात्र जाती त्यांनीं फारशा बाटविल्या नाहींत. कोणत्याहि प्रसंगीं त्यांचा सामना लढवय्या जातींशीं असे. युद्धांत जय आल्यावर त्याच लोकांची ते कत्तल करीत, ज्यांना कत्तलीचें भय वाटे ते पटापट मुसलमान होत. यामुळें हिंदूंच्याच लढवय्या जाती मुसलमान होऊन त्या मुसलमानी राज्यांना पुष्कळ उपकारक झाल्या व हिंदूंमध्यें लढवय्याचा तुटवडा अधिकाधिक पडूं लागला. हिंदूंनीं बंड केलें किंवा राज्याविरुद्ध कांहीं उपक्रम केला तर हे बाटे क्षत्रिय त्याचा परस्पर समाचार घेत असत. जिवाच्या भयामुळें बाटलेल्या लोकांपैकीं ज्यांच्या वंशपरंपरा पाटिलक्या किंवा इतर अशाच तऱ्हेच्या वतनदाऱ्या असत त्या मुसलमान कायम ठेवीत, म्हणून त्यांना पुन्हा हिंदु व्हावें असें वाटत नसे. शिवाय इतक्या क्षत्रिय जाती भराभर बाटल्या तरी त्यांना शुद्ध करून घेण्याचा जोराचा प्रयत्नही त्यावेळीं झाला नाहीं.

**मांसाहाराचा निषेध व धर्मांतर**—एकदा गोमांस खाऊन किंवा मुसलमानाच्या घरचें अन्न घेऊन मनुष्य बाटला किंवा जबरदस्तीनें बाटविला कीं, तो कायमचाच बाटला, तो पुन्हां हिंदु होऊं शकत नाहीं, अशा कल्पनेमुळें

हें बाटविण्याचें कार्य मुसलमानाच्या पथ्यावरच पडलें व तेंच हिंदूंना दुधारी तरवारीच्या पात्याप्रमाणें मारक झालें ! ! या काळीं हिंदुसमाज बहुतेक निवृत्त मांस बनला होता. मांसाहार, विशेषतः गोमांसभक्षक मुसलमान हे अति निंद्य व हीन अशी समजण्याची प्रवृत्ति मांसाहार निंद्य मानल्यामुळें समाजात वाढली, म्हणून जो हिंदु बळानें वा स्वेच्छेनें मुसलमान झाला तो मांसाहारी बनल्यामुळें हिंदुत्वाला कायमचा मुकला तो पुनः हिंदु होणें अशक्य व अनिष्ट अशी भावना समाजात वाढली. तात्पर्य, मांसाहाराचा निषेध हा मुद्दा मुसलमानाच्या बाट-विण्याच्या कार्याला पोषक असा झाला !

**स्त्रियांवर जुलूम**—छलबलानें बाटविण्याचें मंत्र जसें मुसलमानांना सुरू केलें तसेंच उच्च व घरंदाज हिंदुस्त्रियांशीं जुलमानें लग्नें लावण्याचें कार्यहि त्यांनीं प्रारंभिलें. इस्लामधर्म हा स्त्रियांविषयीं फारसा उदार नाहीं. स्त्रिया या केवळ उपभोग्य आहेत अशी या धर्मांची कल्पना! मग काफर लोकांच्या स्त्रिया धरून आणून दासी करून सुरा अगर तरवार दाखवून लग्नें करण्याची पद्धत पडल्यास आश्चर्य कसलें ? स्त्रियाहि मनुष्यें आहेत, त्यांना स्वातंत्र्य आहे, त्यांना विवेक आहे, या कल्पना मुसलमानांना माहीतच नव्हत्या. यामुळें मुसलमानांचें वर्तन हिंदु स्त्रियांशीं अमानुषपणाचें झालें. पुष्कळ मुसलमान सुलतानांनीं, शहानीं, व बादशहांनीं जुलमानें हिंदु स्त्रियांशीं विवाह लाविले त्यांतील कांहीं ठळक विवाह येथें नमूद करितों —

अल्लाउद्दीनानें कुलीन हिंदु राजस्त्रियांना मुसलमानी गोषात ओढून आणलें. गुजराथच्या कर्णरायाची बायको कमलादेवी व तिची मुलगी देवलदेवी ह्यांचा कष्टमय कहाणी ऐकली कीं, अंगावर शहारेच उभे राहतात ! दीपलपूरच्या रजपूत क्षत्रिय–कन्येनें फिरोज तुघलखाला जन्म दिलेला होता. काश्मीरचा राजा आनंद-देव हा १३२६ त ठार मारला गेल्यावर त्याच्या कवलदेवा नामक राणीनें शहामीर ऊर्फ शम्सुद्दीन याजबरोबर लग्न लाविलें. विजापूरच्या युसफ आदिल-शहानें मुकुंदराव नामक एका शूर मराठे सरदाराच्या बहिणीशींच लग्न लावून तिचें नाव ' बुबुजीखान ' असें ठेविलें. फिरोजशहा बहामनीनें विजयानगरच्या देवराजाच्या मुलीशीं बलात्कारानें लग्न लाविलें व तें लग्न विजयानगरासच झालें। तेलंगणाचा राजा नरसिंहराय याचा वऱ्हाडच्या स्वारींत पराभव होऊन तो पकडला गेला, त्यानें फिरोज बहामनीचें मांडलिकत्व कबूल करून आपली एक मुलगी

जुलमानें त्यांच्या जनानखान्यात पाठविली। मुद्गलशहरांतील एका सोनाराची कन्या निहाल हिचें लग्न शहाजादा हसनखान याचबरोबर झालें दिलावरखानानें अल्लाउद्दीनशहा बहामना यास सोनगडच्या राजाची सुंदर कन्या नजर केली (१४३७) गुदरनें राजघराण्यांतील सरदार लोकांच्या स्त्रिया आपल्या अनुयायाच्या हवालीं केल्या व जनानखान्यात अगावर शहारे येतील अशीं कृत्यें करवलीं। बहलोलखान लोदीनें सोनाराच्या सुंदर मुलीशीं लग्न केलें। बेगडा महमुदाची बायको ही जमेदार राणजी गोहेल याची मेहुणी होता. दक्षिणेतील बहुतेक शहांनी उच्च हिंदु घराण्यातील स्त्रियाशीच लग्नें लाविलीं होतीं. जयपूरच्या बिहारीमलाच्या मुलीशीच स्वत अकबरानें लग्न लाविलें होतें जोधपुरच्या मालदेवान आपली कन्या जोधबाई ही अकबराला दिली होती. तिचा मुलगा सेलीम ऊर्फ जहांगीर होय। बिकानेरच्या कल्याणमलानें आपली पुतणी अकबरबादशाहास देऊन त्याचें माडलिकत्व कबूल केलें या प्रकारचा किती तरी ठळक उदाहरणें देण्याजोगीं आहेत. त्या लग्नापैकीं पुष्कळ लग्नें नाइलाजास्तव जुलमानें लाविलीं गेलीं यात मुळींच शका नाहीं पण या खानदानींच्या व उच्च घराण्यातील स्त्रिया तेथील जुलूम गुपचूप सहन करून त्या तद्रूप कशा झाल्या हा मोठा महत्त्वाचा प्रश्न आहे त्याचें उत्तर " स्त्रीजात दुर्बल, त्या अबला, त्या उपभोग्य, त्याचें पति हेंच दैवत, जुलमाचा पती असला तरी त्यानीं एकनिष्ठ असलें पाहिजे, त्याच्यावर पुरुषाचा हक्क आहे, स्त्रिया एकदा बाटल्यावर त्यांना शुद्ध करून घेता येत नाहीं, ' या अवैदिक कल्पनाचा प्रभाव हें होय. बुद्धोत्तर कालात बौद्ध भिक्षुणींच्या प्रतिबधाकरिता ज विचार प्रति क्रियारूपानें उत्पन्न झाले, त्याचा अतिरेक मुसलमानांच्या पथ्यावर पडला, यात मुळींच संदेह नाहीं

**शुद्धीचा अभाव**–शुद्धिकार्याची चळवळ आज राष्ट्रिय स्वरूपाची झाली आहे परतु मुसलमानानीं बाटवण्याचें सत्र सुरू केलें त्यावेळीं शुद्धिकार्य जोरानें पुढें आलें नाहीं. अल्बेरुनी हा मुसलमान इतिहासकारक लिहितो कीं, " त्या वेळीं शुद्धीचा निषेधच होता मुसलमानांनीं गुलाम करून नेलेल्या लोकाना शुद्धिकरणार्थ प्राय श्चित्त होतें परतु त्यांचा समावेश पूर्व जातींत होत नसे. " ( म यु. भा ) खरोखर हिंदुराजांनीं, त्यांच्या मत्र्यांनीं अगर पडितांनीं छलबलानें बाटविलेल्याना भराभर शुद्ध करून घ्यावयास पाहिजे होतें. मुसलमान लढाऊ जातींना भ्रष्ट

करीत हें पाहून तरी शुद्धीचा अवलंब करावयास पाहिजे होता मुसलमानाचा लढाऊ धर्म, लढाऊ वृत्ति व सर्व लोकांचा लढवय्या पेशा पाहून त्यापेक्षा दुप्पट लढवय्ये निर्माण करण्याची युक्ति तेव्हां योजावयाची होती परंतु मुसलमानांनीं पुष्कळ लढवय्या जाती बाटविल्या तरी राजे व पंडित स्वस्थ बसले! पंडितांना कलियुगांत या गोष्टी व्हावयाच्याच, त्यास कोण काय करणार, त्याचें निवारण सर्वस्वीं मानवी शक्तीपलीकडे आहे, असेंच प्रामाणिकपणें वाटत होतें म्हणून त्यांनीं मुसलमानांच्या अत्याचाराकडे लक्ष दिलें नाहीं शिवाय भविष्यपुराणामध्यें व इतर ग्रंथांतहि पुढें असें असें होणार व धर्मोच्छेद होणार असे नाउमेदीचे विचार मुसलमानांच्या स्वाऱ्याचे वेळीं व त्याचे अगोदर लिहिले गेले होते त्यामुळें पंडितवर्ग व त्याचे अनुयायी यांच्यामधील प्रोत्साहक विचारशक्ति जवळ जवळ नष्ट झाली होती दुर्दैव हें कीं, भविष्यपुराणासारखे ग्रंथहि मुसलमानांनाच उपयोगीं पडले म्हणून हे ग्रंथ लिहिणाऱ्यांनीं एक प्रकारें समाजघात केला! बळजबरीनें एखाद्याला धर्मांतर करावें लागलें तर तो हिंदुधर्मापासून कायमचा भ्रष्ट झाला, त्याला या जन्मीं शुद्ध होण्याचा उपाय नाहीं, मार्ग नाहीं, ही कल्पना पंडितांनीं उराशीं बाळगिल्यामुळें त्यांच्या पांडित्यप्रचुर ग्रंथांपासूनहि समाजहित फारच अल्प झालें तत्कालीन समाजांत धर्मभोळेपणा इतका वाढला होता कीं, उच्चवर्णीय ब्राह्मणसुद्धां पिराफकीरांना भजूं लागले, ताबूत करूं लागले व मुसलमानांचे आचार विचार पाळूं लागले जणुं सर्व हिंदु देवता इष्ट फल देण्याला असमर्थ इत्यादि भावना पंडितवर्गाच्या अनास्थेमुळें उत्पन्न झाल्या असेंच म्हणावें लागतें

धर्मांचें स्थान शरीर नसून हृदय हें आहे स्थूल शरीरापेक्षा सूक्ष्म शरीराचा धर्माशीं संबंध जास्त आहे, अर्थात् छळबळानें धर्म हा लादतां येत नाहीं असें शास्त्र असतां तोंहि जोरानें पुढें आलें नाहीं. शास्त्रांत असें सांगितलें आहे कीं, स्त्रीवर बलात्कार झाला तर ती रजोदर्शनानंतर शुद्ध होते व बलात्कारानें जर ती गरोदरहि झाली तर बाळंतपणानंतर शुद्ध होते या शास्त्राचा उपयोग भोळ्या हिंदूंनीं बचावाकरितां सुद्धां करून घेतला नाहीं त्यावेळीं चढाईचें शुद्धिकार्य व्हावयास पाहिजे होतें म्हणून बाटविण्याच्या सत्रास प्रतिबंध झाला असता. (चढाईच्या शुद्धिकार्याचें महत्त्व प्रकरण ११, 'हिंदुसमाज समर्थ कसा होईल' या ग्रंथांत पाहा ). जुलमानें झालेलें धर्मांतर व खुषीनें झालेलें धर्मांतर या दोहों-

मधील फरक त्यावेळीं ओळखला गेला नाहीं हें राष्ट्राचें दुर्दैव होय जुलमानें तोंडात गोमास घातलें किंवा एकाद्या विहिरीन्या पाण्यात गाईचें रक्त टाकल्यामुळें तें पाणी चुकून पिण्यात आलें की, तो मनुष्य हिंदुत्वाला कायमच मुकला अशी समाजघातकी कल्पना सर्वांच्या मनात बद्धमूल झाली होती त्यामुळें छन्दलानें बाटविलेल्या लोकाबद्दल इतराचे मनात अनुकंपा उत्पन्न होण्याऐवजीं तिरस्कार मात्र उत्पन्न झाला, ही गोष्ट तत्कालिन पंडित व समाजाग्रणींच्या ध्यानात आली नाहीं, यास्तव बाटग्या लोकाना अस्सल मुसलमानापेक्षा बाटविण्यान्या कामीं अधिक उत्साह आला व इतराना आत्मसम करण्याचे कामीं त्यानीं शिकस्तीचे यत्न केले ' माझ्यासारखी कथा होतील ' या ग्राम्य म्हणींतील तत्त्व या बाटलेल्यानीं पूर्णपणें अमलात आणलें, तात्पर्य अस्सल मुसलमानापेक्षा बाटे मुसलमान हेच हिंदुसमाजाला जास्त जाचक झाले इतकेंच नव्हे तर मुसलमानाचें राज्य दृढ करण्यास हेच लोक कारणीभूत झालेले आहेत !

**बाटग्या हिंदूंचा उत्साह**—एकदा परधर्मात गेल्यावर पूर्वधर्माचा पाडाव करण्यास विशेप स्फुरण येत असतें त्यातून या पूर्वहिंदूना हिंदु लोकाचीं व्यगें, राहाणी, स्वभाव, यांची खडान्खडा माहिती असल्यामुळें त्याचा उपयोग मुसलमानाना झाला कोणती युक्ति करावी, स्त्री कशी व केव्हा पळवावी, हिंदु लोक केव्हा गाफील असतात, देवालय लुटून संपत्तीचा अपहार कसा करावा, हें सर्व पूर्वहिंदूपासून मुसलमानाना कळत असे या बाटलेल्या लोकामध्यें कित्येक फारच मोठे होऊन गेले त्यान्या हातून धर्मांतर केल्याबरोबर स्वन्या मुसलमानापेक्षा बाटविण्याचें कार्य अधिक कसें झालें हें पुढील माहितीवरून समजेल मलिक काफूर हा हिंदूपैकीं एका खालच्या जातीचा मनुष्य होता एकट्या मलिक काफूरनें अल्लाउद्दीनाच्या राज्यवृद्धीचें अर्धे अधिक काम केलेलें आहे ! जहांगीराचा सेनापती महाबतखान, फिरोजशहाचा वजीर मकबुलखान, इमादशाहीचा संस्थापक फत्तउल्ला, गुजराथचें मुसलमानी राज्य स्थापन करणारा मुजफ्फरखान, निजामशाही स्थापन करणारा निजामुल्मुल्क बहिरी, लोदी घराण्यातील सुलतान शिकंदर इत्यादि अनेक पराक्रमी पुरुप पूर्वहिंदु होते ! त्याना हिंदूच्या स्वभावाची पारख असल्यामुळें त्याचा पाडाव करण्याचें कार्य त्यानीं सहज केलें निजामशाही स्थापन करणारा हा तर विजयानगरास राहाणान्या तिमाप्पा बहिरव नावाच्या ब्राह्मणाचा मुलगा होता विजयानगरच्या लढाईत हा कैदी होऊन

मुसलमानांच्या स्वाधीन झाला. पुढें हा मुसलमान होऊन पराक्रम करून उदयास आला. महाबतखान हा उदेपूरच्या प्रतापसिंहाचा पुतण्या होता. याचा बाप सगरसिंह हा पूर्वीच मोंगलांस मिळालेला होता. रजपुतान्यातील एक मोहिमेवर महाबतखान प्रमुख असे. मकबूलखान हा तैलंगणांतील एक उच्च कुळांतील असून त्यानें पुढें मुसलमानी धर्म स्वीकारला. याचें फिरोज तुघलखावर फार वजन होतें. म्हणजे तें इतकें कीं, फिरोज स्वतः म्हणे 'हा वजीर खरा सुलतान आहे.' याच पूर्वहिंदूनें हिंदूंच्या छळणुकीविषयीं अनेक मसलती फिरोजला सांगितल्या. काश्मीरच्या शिकंदरशहानें आपल्या सुहभट्ट प्रधानाच्या सल्ल्यानें काश्मिरांतील प्रत्येक हिंदु मारून टाकिला. हा प्रधान मूळचा ब्राह्मण असून मुसलमान झाल्यावर त्यानें अनन्वित प्रकार केले यांत आश्चर्य कसलें? काश्मिरांतील ब्राह्मणांना मुसलमान करणारा काळापहाड हा पूर्वी ब्राह्मणच होता. या पूर्व हिंदूंच्या ठिकाणीं धर्मांतरामुळें आवेश उत्पन्न झाला व त्यांनीं स्वीकारलेल्या नवीन धर्माची उन्नति पाहिजे त्या इत्यास मिळाल्यामुळें हिंदूंचा पाडाव त्यांच्या हातून झाला. मुसलमानांना प्रथम आल्यावर जयावर जय मिळत गेले. शिवाय त्यांच्या राज्यवृद्धीचें कार्य पूर्वहिंदूकडून होऊं लागल्यामुळें पुष्कळ हिंदूंना मुसलमानी धर्मांत कांहीं अचाट सामर्थ्य आहे असें वाटूं लागलें. हिंदुधर्म हीन आहे, त्यामुळें पराक्रम होत नाहीं, अशा चुकीच्या समजुतीनें पुष्कळांनीं खुषीनें स्वधर्माचा त्याग केलेला आहे.

**खुषीनें स्वधर्मत्याग**—बंगालचा राजा जितमल, कालिकोटचा सामुरी, केरळदेशचा राजा, सिंधचा सुमेरवंशी रजपूत जामराजा हीं त्यांतील प्रसिद्ध उदाहरणें होत. महमद गिझनी जेव्हां मथुरेवर चालून आला, तेव्हां वाटेंत हरून राजाच्या बरण किल्ल्यास त्यानें वेढा दिला. हा राजा उत्तर हिंदुस्थानांत फार मोठा होता. त्यानें महमदाचा अफाट सेनासमुद्र पाहतांच आपल्या १० हजार सैनिकांसह इस्लामी धर्माचा स्वीकार केला. या मोठ्या राजाच्या उदाहरणाशिवाय कित्येक जातींच्या जाती व हजारों कुटुंबें हीं जबरदस्तीनें व खुषीनें बाटलीं!

**बाटलेल्या हिंदूंची मनोवृत्ति**—नवलाची गोष्ट ही आहे कीं छलबलानें बाटलेल्या हिंदु स्त्री पुरुषांपैकीं एकानेंहि आपल्या धर्माला उपकारक असें एखादें अद्भुत कृत्य केलेलें आढळत नाहीं! जर्मन महायुद्धाच्यावेळीं जे जर्मन स्त्री

पुरुष जगभर पसरलेले होते, त्यानीं आगामी युद्धाच्या सिद्धतेसाठीं अनेक साहसी कृत्यें केल्याच्या व धोरणें आखल्याच्या वातम्या वृत्तपत्रांत वाचावयास मिळत त्यांवरून कोणत्याहि देशांत व कोणत्याहि स्थितींत जर्मन स्त्रीपुरुष हे मातृभूमीला विसरत नाहींत, ही गोष्ट त्यावेळीं जगापुढें आली इग्लंड, अमेरिका, इटली, या राष्ट्रांतील देशभक्तांच्या अत्यायितादि पुष्कळ ऐकण्यांत येतात पण बाटलेल्या हिंदु स्त्रीपुरुषाकडून जाज्वल्य धर्मनिष्ठा वेग्हादि एखाद्या कृत्याच्या रूपानें आविष्कृत झालेली दृष्टीस पडत नाहीं, हें आश्चर्य नव्हे काय? आमच्या मतें याचें कारण हेंच कीं, बौद्ध संस्कृतीच्या संन्यासानें, अहिंसेनें, व जगन्मिथ्यात्वाच्या कल्पनेनें हिंदुसमाजाला सर्व बाजूनीं भेगे करून सोडलें होतें व वैदिक आर्यांच्या जयिष्णु वृत्ति पालविल्या होत्या एकांतिक तत्त्वज्ञानाच्या व शुद्धा-शुद्धतेच्या कल्पना वाढून व्यष्टि धर्माला महत्त्व येतांच स्वतःच्या शुद्धतेच्या कल्पना भलत्याच झाल्या अमुक खाऊन बाटतो, तमुक पिऊन बाटतो, या कल्पनाइळें भ्रष्ट झालेल्यांना असें वाटलें कीं, कांहीं केलें तरी आतां हिंदुधर्मांत आपल्याला पुन जाता येत नाहीं हिंदुधर्मांत जन्माशिवाय प्रवेश नाहीं ही कल्पना कांहीं वाईट नव्हती पण त्याबरोबरच एकादा हिंदु जन्मल्यावर मग तो कशानेंहि अहिंदु होत नाहीं, ही कल्पनाहि तितक्याच जोरानें पुढें यावयास पाहिजे होती. पण मुसल्मान येण्यापूर्वीं एकच समतजू वाढला होती. शिवाय भोळसटपणा, सापेक्षनीतीचा अभाव, समाष्टधर्माचा अभाव, मोक्षाच्या एकदेशी कल्पना, कली, दैववाद* यांचें जंजाळ पसरलें होतें. म्हणून अहिंदु बनल्यावर हिंदु होणें अशक्य अशा समजुतीनें स्त्री पुरुषांचें वतन परस्पर समा जाला अनुकूल असें घडलें

**विटाळाचें फाजील वेड**—बौद्ध धर्माच्या प्रभावानें निवृत्ति, संन्यास, अहिंसा, व दुःखवाद यांचे संस्कार समाजावर ठसे झाले कीं त्याला जगांत आनंद व सुख हीं दिसेनात जगांत जिकडे तिकडे दुःख आणि घाण दिसू लागली! प्रत्येक व्यक्तीला आपली शुद्धता, आपली उच्चता व आपला मोक्ष याचीच काळजी वाटू लागली. त्यामुळें सोंवळ्याओंवळ्याच्या आचाराला व

* टीप —कली व दैववाद हीं प्रकरणें 'हिंदुसमाज समर्थ कसा होईल' या आमच्या ग्रंथांत पाहा

विटाळचडाळाच्या कल्पनेला अगदीं ऊत आला पदार्थ, माणसें, पशु, पक्षी यान्या ठिकाणीं दोष दिसू लागले त्यान्या स्पर्शापासून पाप उत्पन्न होतें असें वाटू लागलें विटाळचडाळ, सोंवळेंओंवळें यान्या ज्या कल्पना आज समाजात वावरत आहेत, त्या खिस्तपूर्व ५०० ते खिस्तोत्तर ५०० या कालातील आहेत त्या वेळीं समाजातील सर्व प्रकारची प्रतिकारशक्ति कशी नष्ट झाली होती हें या कल्पनावरून सिद्ध होतें. व्यक्तीचें अस्तित्व, समाजाचें अस्तित्व, फार काय पण निर्जीव पदार्थांचे अस्तित्वही प्रतिकारशक्तीनेंच राहातें दगड, झाडें, घरें हीं आपआपलें अस्तित्व प्रतिकारक्षमतेनें टिकवितात दगडात प्रतिकारशक्ति नसती तर त्याला इतर पदार्थांनी नष्ट केलें असतें झाडामध्यें प्रतिकार शक्ति नसता तर त्याचें अस्तित्वच न राहातें जगातील विविध पदार्थांचें अस्तित्व त्या त्या पदार्थांच्या प्रतिकारक्षमतेंत असतें हेंच शेवटीं सिद्धातभूत आहे निर्जीव पदार्थ व सजीव पशुपक्षी यात जर प्रतिकारशक्ति आहे तर ती मनुष्यात का नसावी ? पाल चुकचुकली, पिंगळा किलकिलला, कावळा शिवला, कोंबड्याचा स्पर्श झाला, तर माणसाचें पावित्र्य नष्ट होण्याइतका तो दुर्बल आहे काय ? कोल्ह्याकोंबड्यान्या विगळानें जर माणसाचें पावित्र्य नष्ट होतें तर माणसान्या स्पर्शानें कोंबडे, कावळे इत्यादि पक्षी पवित्र होतात असें कां समजू नये ? दहा ब्राह्मणामध्यें एक अत्यज येताच तो तेवढ्याचें पावित्र्य नष्ट करतो हें जर खरें तर दहा ब्राह्मणामध्यें आपल्या स्पर्शानें त्याचें हीनत्व घालविण्याचें सामर्थ्य आहे असें तरी का समजू नये ? उदीर, घुशी, वदकें, काउडी, कावळे, कुत्रीं या पशुपक्ष्याना समजलें कीं, आपल्या स्पर्शानें माणसामध्यें अपवित्रपणा येतो म्हणून जर त्यानीं माणसावर एकदम आक्रमण करून मनुष्याचें अस्तित्व नष्ट करण्याचा यत्न केला तर मग पुढें काय ? दुसऱ्याच्या स्पर्शानें मी भ्रष्ट होतों ही प्रतिकारशून्यतेचीच कल्पना आहे या दुर्बल कल्पनेपेक्षा माझ्या स्पर्शानें सर्व जग पुनीत होतें ही प्रबळ कल्पना समाजात पाहिजे होती

**हिंदुसमाजाची सहिष्णु वृत्ति** —जयिष्णु समाजामध्यें माझ्या स्पर्शानें जगाला पावित्र्य मिळतें अशा कल्पना असतात व असे समाज चढाईनें जगावें आक्रमण करतात. अमक्याला कसें शिवू, अमक कसें खाऊ, अमक्या देशात कसा जाऊ, तिथें गेलों तर दोष काही घडेल काय, त्याला प्रायश्चित्त काय, असले प्रश्न जयिष्णु समाजाच्या मनाला शिवत नाहींत. सहिष्णु समाजाचा सर्व

धर्म "शिवू नकोस व जेवू नकोस" यामध्यें येऊन बसतो, तर जयिष्णु समाजाला हे प्रतिबंध शिवत नाहींत कोठेंही जावें, जगावें आक्रमण करावें, सर्व भागावर आपली संस्कृति प्रस्थापित करण्याचा अट्टाहासानें यत्न करावा आणि सर्व जगाला आपलें ऐश्वर्य, आपलें ज्ञान आणि आपलें कर्तृत्व दाखवावें अशी वृत्ति जयिष्णु समाजाची असते ही वृत्ति इस्लामची होती पण हिंदुसमाजाची वृत्ति त्या काली फारच संकुचित व असहिष्णु झाली होती इस्लामच्या स्पर्शाचा, खाण्याचा, पिण्याचा, कसलाच विधिनिषेध नव्हता तर, या सर्व विधिनिषेधांनीं आर्य-संस्कृतीच्या समाजाला अगदीं जखडून टाकलें होतें स्पर्शाला प्रायश्चित्त, भोजनाला प्रायश्चित्त, अमक्याला प्रायश्चित्त, तमक्याला प्रायश्चित्त, असा सगळा प्रायश्चित्तधर्म हिंदुसमाजात त्या वेळीं आला होता सहाव्या सातव्या शतकात अस्तित्वात आलेलें विटाळाचें व सोवळयाओवळयाचें शास्त्र हें अलीकडे निर्माण झालें यात मुळींच संदेह नाहीं.

**विटाळाची वंशवृद्धि**—वैदिक-वाङ्मयामध्यें विटाळचंडाळाच्या कल्पना फारशा दिसत नाहींत. कारण त्या वेळा कर्मठपणा व कठोर जातिबंधनें हीं नव्हतीं विविध समाजामध्यें वंश व संस्कृतिमूलक जे भेद होते त्यामुळें निसर्गत जेवढें अंतर समाजामध्यें होतें, तेवढयावरच पावित्र्याच्या कल्पना व विटाळाच्या कल्पना उभारल्या गेल्या होत्या त्रैवर्णिक सत्ता वेदकाली प्रमुख होती. त्यामध्यें अन्न स्पर्शादि व्यवहार राजरोस होत हाते त्रैवर्णिकामध्यें वंशमूलक भेद मुळींच नसल्यामुळें परस्परांतील सोंवळेंओवळें व विटाळ याचा बडेजाव वाढलेला नव्हता मनुयाज्ञवल्क्यस्मृतींचा काल जरी अनिश्चित असला व त्या प्रथावरहि बौद्धधर्माचे थोडे संस्कार झालेले दिसत असले तरी या दोन्ही स्मृतींमध्यें सोंवळ्या-ओंवळ्याचें स्तोम फारच थोडें आहे. मनु-याज्ञवल्क्यस्मृतिकालीं चातुर्वर्ण्यव्यवस्था होती, राज्यव्यवस्था होती, समाज शासन होतें, आणि नागर जीवनाला उपयुक्त अशा आरोग्य, वैद्य आणि स्थापत्य अशा शास्त्राचा प्रसार झालेला होता इतकें असूनही मनु याज्ञवल्क्य-स्मृतींमध्यें विटाळचंडाळाचा अतिरेक नाहीं. बुद्धोत्तर कालात निर्वाण, सन्यास, अहिंसा, निर्मांसभोजन, शुद्धाशुद्धतेच्या व उच्चनीचतेच्या कल्पना यामुळें शिवाशिव व प्रायश्चित्त याची रेलचेल चाली आहे स्मृतिग्रंथात आचार, व्यवहार व प्रायश्चित्त असे तीन विषय आहेत. मनुस्मृतीमध्यें १२ अध्यायांपैकीं शेवटचे दोन

अध्याय प्रायश्चित्तास्तव दिलेले आहेत दहाव्या अध्यायाच्या शेवटी " एष धर्म विधि कृत्स्नश्चातुर्वर्ण्यस्य कीर्तित । अत पर प्रवक्ष्यामि प्रायश्चित्तविधिं शुभम् ।' अशी प्रस्तावना केली आहे. याज्ञवल्क्यस्मृतीमध्यें एकदर तीनच अध्याय आहेत पैकीं ३६८ श्लोकात आचारधर्म ३०७ श्लोकात व्यवहारधर्म व ३३४ श्लोकांत प्रायश्चित्तधर्म सागितलेला आहे विषयाच्या दृष्टीनें या स्मृतींतही आचार, व्यव हार व प्रायश्चित्त याचें तारतम्य चागलेंच राखलेलें आहे पण पराशर–स्मृती पासून अत्रि, अगिरा, आपस्तंब, दक्ष, हारीत, बृहस्पति, शख, लिखित इत्यादि ज्या स्मृति झाल्या, त्या सर्व स्मृतींना प्रायश्चित्त–स्मृति असें म्हणणे ज्यास्त शोभतें कारण या ग्रथात आचारधर्म, पुरुषार्थधर्म, व्यवहार व कर्तृत्व यासबधाचा विचार समुद्रात खसखस असून प्रायश्चित्ताचाच समुद्र खवळलेला दिसतो ! बुद्धोत्तर कालात पराशरापासून पुढच्या सर्व स्मृति खास निर्माण झालेल्या आहेत, म्हणूनच त्यात शिवाशिव, विटाळ, सोवळें, याचे धर्म भरलेले आहेत मुसलमानाच्या स्वाऱ्या जयिष्णुतेच्या वृत्तीनें एकसारख्या होऊ लागल्या त्यांनी हिंदुसमाजाची वर्मे ओळखून त्यावर आघात करण्यास प्रारभ केला त्याचा विचार स्मृतिकारानीं व पडितानीं करावयास पाहिजे होता पण दुर्दैवाची गोष्ट ही कीं, त्यानी आपल्या ग्रथात विचार केला नाहीं सातव्या शतकापासून १६ व्या शतकापर्यंत जे धर्मनिबधकार झाले, त्याना जिंकण्याचा धर्म तर सागि तला नाहींच, पण जगण्याचा धर्महि न सागता खाऊ नकोस, शिवू नकोस, तसें करशील तर पाप लागल असें म्हणून प्रायश्चित्तधर्माचेंच विवेचन केलें ! !

**विटाळाची शिरगणती** —मनु याज्ञवल्क्य आणि इतर स्मृतींमध्यें जे विटाळ सागितले आहेत त्याची शिरगणती पुढीलप्रमाणें आहे –" चातु वर्णिकाचा परस्पर विटाळ, जातीजातींचा एकमेकास तारतम्यानें उद्या विटाळ मुडदफरास मूर्ख व उन्मत्त मनुष्य, रगारी कोळी, बुरूड, पराट, चाभार नट, सुतकी, म्लेच्छ, पारसिक, पातकी बौद्ध, शैव, पाशुपत, नास्तिक, नापित, कसाब, वडार तेली विकर्मस्थ द्विज, दुर्जन, गुरव, पुजारी, बाळताण, विटाळशी, प्रेत व त्याचें काष्ठपाषाण याचा विटाळ, पान, मैथुन, मूत्र, पुरीष, थुकणें, शिंकणें, चोपण इत्यादिकाचा विटाळ, हातानें माडलेलें दहीं, पाण्याचा पेस दूधभोपळ, कादा, लसूण, शेवगा, तावडा मुळा पाढरा वागीं, गाजर, तोंडलें घोसाळें, दाडका, भार्ङ्ग, तिळकूट, करानी, कमळाचे कादे, कांहीं पालेभाज्या, फळभाज्या व कलिंगड, ग्माटो अशा प्रकारच्या पदार्थांचे विटाळ

या पदार्थांचा जसा विटाळ सांगितला आहे तसेंच हे सर्व पदार्थ भोजनाला
निषिद्ध म्हणूनही सांगितलेले आहेत पुष्कळ प्रकारचें अन्न अभक्ष्य म्हणून
म्हटलें असून वैद्य, नट, धूर्त, लबाड, वाद्यें वाजविणारा इत्यादि शेंकडों लोकांच्या
घरचें अन्न अभोज्य म्हणून सांगितलें आहे पशुपक्ष्यांपैकीं डुक्कर, कुत्रें, मांजर,
गाढव, उंट, एडका, कोल्हा, वरकोचा, कोंबडा, कावळा, चिमणी, गिधाड,
उंदीर, किडे, उवा, इत्यादि पुष्कळ विटाळाचे सांगितले आहेत हे सर्व ठळक ठळक
विटाळ व कांहीं पदार्थांच्या खाण्यापिण्याचे निषेध यांची संख्या ३०।४० दिसली
तथापि यांची प्रजा कुठें ४०० तर कुठें त्यांच्या पलीकडेहि गेलेली आहे विटाळ
चंडाळांच्या अतिरेकामुळें धर्माधर्मांच्या कल्पना इतक्या कुजक्या झाल्या होत्या
कीं, त्या पाहून आश्चर्य वाटतें मुसलमानाशीं शरीर संबंध ठेवूनसुद्धा इतर
व्यवहारांत सोंवळें ओंवळें पाळल्यानें आपण हिंदु राहतों, अशी हिंदुस्त्रियांची
भावना होती मोंगल बादशहांनीं आपल्या रजपूत राण्यांसाठीं त्यांनीं स्वधर्मा-
चरण करावें म्हणून जनानखान्याजवळ शिवाचीं व विष्णूचीं देवालयें बांधून दिलीं
होतीं ! सकाळीं स्नान करून शिवपूजा करावी, दुपारीं पुराणश्रवण करावें, व
रात्रीं जुलमानें नवरा झालेल्या बादशहाशीं शरीरव्यवहार करावे व इतकें सर्व
करून सुद्धां आपला धर्म बिघडत नाहीं, अशी जेथें पुळचट कल्पना होती
तेथें काय विचारावें ? स्मृतींतील प्रायश्चित्तें, विटाळाचा अतिरेक, व लोकांच्या
पावित्र्याच्या भ्रामक समजुती पाहून त्या कालचा इतिहास व मुसलमानांचा हैदोस
हीं लक्षांत घेतलीं तर हळहळ वाटल्यावांचून रहात नाहीं इस्लामचें तोंड
मोठें म्हणून त्यांत पाहिजे तें जात होतें व गेल्यावर सर्व कांहीं पचत होतें पण
हिंदूचें तोंड फारच लहान कीं त्यांत मावणारा मनुष्य सुद्धां जात नव्हता व
पचत नव्हता ! पाप, दुःख, घाण इत्यादि वृत्तांनीं मारक अशा दुसऱ्या वृत्ति
समाजांत उत्पन्न करण्याची त्यावेळीं आवश्यकता होती. पण जगत्, शस्त्र, शास्त्र,
समाज, शासन, यांकडे दुर्लक्ष करण्याची सवय हिंदुसमाजाला कित्येक शतकांची
असल्यामुळें अभ्युदयपोषक वृत्ति उत्पन्न झाल्या नाहींत

**पावित्र्याच्या भ्रामक समजुतींचा परिणाम**—सर्व प्रायश्चित्त
स्मृतींवर बुद्धांच्या दुःखवादाची छाप पडलेली आहे नास्तिकाचें तोंड पाहू
नये, त्याचा स्पर्श झाल्यास स्नान करावें, हें शास्त्र नास्तिकदर्शनाच्या उत्पत्ती-
नंतरचें आहे जातिजातींचे तट दुर्धरतर कालीं झाले, उच्चनीच कल्पनामुळें

परस्पराचा विटाळ होऊ लागला. शुद्ध, अशुद्ध, प्रवृत्तमास, निवृत्तमास या भेदामुळें समाजात दूरीभाव उत्पन्न झाला स्पर्श व प्रेम ह्या-या उलट अस्पर्श व दूरीभाव असें द्वंद्व आहे. स्पर्शास्पर्शांच्या कल्पनानीं पछाडलेला, उच्चनीच कल्पनानीं फुटीर व विस्कळित झालेला, हिंदुसमाज मुसल्मानानीं पादाक्रांत केला यात आश्चर्य कसलें ?

**बुद्धाचे स्त्रियाविषयींचे विचार**—हिंदुसमाजात स्त्रियाचें स्थान किती उच्च आहे हें वेद, रामायण, व भारतकालीन संस्कृति या प्रकरणामध्यें सांगितलेंच आहे बौद्धधर्माच्या क्रातीनें स्त्रियाना त्या उच्च स्थानापासून भ्रष्ट केलें व स्त्रियाविषयीं अनुदार वृत्ति उत्पन्न केली ही वृत्ति सुद्धा मुसल्मानाच्या पथ्यावर कशी पडली हें सागून प्रकरण संपवितों

बौद्धक्रान्तीपर्यंत समाजाचें ध्येय गृहस्थाश्रम हें होतें बुद्धानें तें ध्येय नष्ट करून तेथें सन्यास या आश्रमाची स्थापना केली दु खविल्यात्मक तत्वज्ञानास सन्यासाश्रम पोषक होता व गृहस्थाश्रम मारक होता म्हणून गौतमबुद्ध हा 'स्त्रि वाईट आहेत, त्या पापखाणी आहेत, त्या धर्मांच्या आड येतात, त्यापासू शक्य तितकें लाब असावें असें म्हणत असे. बुद्धानें स्वत रूपवती तरुण स्त्रीच त्याग केला होता. म्हणून गृह व भार्या याचा त्याग करून सन्यास घ्याव असें तो प्रतिपादन करी स्त्रियाना भिक्षुणीची दीक्षा दिल्यास आपल्या धर्मा न्हास त्वरित होईल असें तो आपल्या आनदनामक शिष्यास सांगे संस्कृत वाङ्मयात स्त्रियाविषयीं जे अनुदार विचार दिसतात ते याच काळातील होत " अग्निसारखी स्त्री आहे, लोण्यासारखा पुरुष आहे, कलियुगांत घरोघरीं हृत्या आहेत म्हणून ' स्त्रियाचा हा सग नको नारायणा। काष्ठा या पाषाणा मूर्त केल्या ॥ ' पायानें काष्ठाच्या पुतळीला सुद्धां स्पर्श करू नये " असे स्त्रियाविषयीं तिरस्कारयुक्त विचार समाजात वाढू लागले. त्यामुळें स्त्रियाचें वैभव गेलें, योग्यता कमी झाली, व त्याची स्थानच्युति झाली. स्नानादि भिक्षुप्रमाणें भिक्षुणी होण्यात मोठेपणा वाटू लागला। बौद्धानें सरसकट सर्वांना सन्यास सांगितला म्हणून पुरुष जसे सर्व भिक्षु होऊ लागले तशा स्त्रियादि हळुहळू भिक्षुणी होऊं लागल्या भिक्षु व भिक्षुणी याचें बंड बुध्दोत्तरकाळीं किती वाढलें याचें विवेचन सहाव्या प्रकरणांत आलेंच आहे. मुली उपवर झाल्या म्हणून त्या विवाहाचा विचार सोडून देऊन भिक्षुणी होण्याकरतां मठाकडे धांव घेऊ

लागल्या, त्यामुळें गृहस्थाश्रम उलगड होण्याचा प्रसंग ओढवला. स्त्रियांविषयींच्या वेद-कालीन चांगल्या विचारांचा अत्यंत दुरुपयोग होऊं लागला। स्त्रिया या घराबाहेर पडल्या कीं एकदम भिक्षुणी होतात, असें जेव्हां धास्ती वाटूं लागली तेव्हां ' न स्त्री स्वातन्त्र्यमर्हति ' हें शास्त्र पुढें आलें. मनुस्मृति व गृह्यसूत्रें यांत सांगितलेली प्रौढविवाहाची पद्धत जाऊन बालविवाह रूढ झाला, याचें कारण हेंच की लौकर लग्नें केल्यावर भिक्षुणी होण्याचा मार्ग खुंटला स्त्रियांचें स्वातन्त्र्य, त्यांचे स्वैराचार, व इतर अनिष्ट वर्णन पाहून " स्त्रियांना घरांत डांबावें, नेहमीं कार्यव्याप्त ठेवावें, त्या घराबाहेर पडल्या तर पडून जातात व घरीं रिकाम्या असल्या तर भलतेंच करतील, त्यांच्या ठिकाणीं अनृत, साहस, माया, मूर्खत्व, असे दोष आहेत. त्यांना अक्कल नाहीं, त्या पापी असल्यामुळें मोक्ष नाहीं, त्या उपभोग्य आहेत, त्यांचा धर्म पति, त्यांचा देव पति, गुरु यांहीं पति, पतीवांचून गति नाहीं, तो कसाही असला तरी देवच समजावा, तो कसाहि वागला तरी तें इष्ट मानावें' असे संकुचित विचार समाजांत वावरूं लागले पति हें दैवत ही कल्पना वैदिक आर्यांची होती पण स्त्रियांविषयीं इतर संकुचित विचार हे बौद्धकाळीं वाढले व त्यातच मुसलमानाच्या काळ्या विचारांची भर पडली

**मुली म्हणजे जंगम मालमत्ता**—त्याविषयीं स्त्रिया या पुरुषापेक्षां कमी योग्यतेच्या आहेत, असी स्त्रियाविषयीं समाजाची कल्पना होती स्त्रिया या पुरुषांच्या उपभोग्य वस्तु होत, म्हणून त्यांच्याशीं कसेंहि वागण्यास हरकत नाहीं बापानें मुलींची व्यवस्था पाहिजे तशी लावावी, तसें करण्याचा त्याला हक आहे, बाप सांगेल त्या वयांत मुलीनें लग्नाला तयार असावें, तो ज्याशीं लग्न लावील तो कसाहि असला तरी तिनें त्याच्याशीं पतिव्रताधर्मानें रहावें, पित्याच्या अवमान तिनें कधींहि करूं नये असा विचारांनी स्त्रियांचें जीवित तुच्छ मानलें गेलें याचें प्रत्यक्ष उदाहरण रजपूत राजाच्या कृतींमध्यें सांपडतें रजपूत राजांमध्यें आपापसांत फूट होती त्यामुळें मुसल्मानांचा प्रतिकार करणें त्यांना अशक्य झालें तेव्हां त्यांच्या विषयलोलुपतेला आपल्या मुली बळी देऊन रजपूत राजांनी बादशाहांची मर्जी संपादन केली। हें कृत्य स्त्रियांच्या अवनतीकरता स्वैरत्वाची होळी करणाऱ्या रजपुतांपासून कसें घडलें असा एक प्रश्न येतो त्याचें उत्तर कोणी असें देतात कीं, रजपुतांनीं आपल्या नाटकशाळांच्या कन्या

गुणांत त्यांची बरोबरी कोणीही करीत नसे. पराक्रमाच्या जोरावर हे हिंदुराजे शत्रुविषयीं बेफिकीर असत. मुसलमानांची माहिती याना फार थोडी होती. लढायामध्यें शत्रूस फसविणें, त्यावर एकाएकीं हल्ले करण, छापे घालणें, कत्तली करणें, या गोष्टी ते करीत नसत! फार तर काय पण शत्रू हातीं सापडला व त्यानें लुच्चेगिरीनें "मी शरण आहे" असें म्हटलें म्हणजे ते त्याला सोडून देत! रजपूत राजाचें ब्रीद असें असे कीं, युद्धांत पाठ दाखवावयाची नाहीं व शरण आलेल्यास मरण द्यावयाचें नाहीं. या ब्रीदामुळें ते प्राण जाईपर्यंत लढत, पण प्रतिपक्षी आपल्या भावनेचा जेव्हा नसतो, तेव्हां असल्या प्रतिज्ञा आपल्याला बाधक होतात हें त्याच्या ध्यानीं येत नसे.

**चढाईच्या धोरणाचा अभाव**—रजपूत राजामध्यें चढाईचें धोरण मुळींच नव्हतें. हे राजे नेहमी किल्ल्याच्या आश्रयानें आपलें संरक्षण करीत असत. मुसलमानांना कपट व विश्वासघात याचें काहीं वाटत नसे. तें लक्षात घेऊन 'जशास तसें' या न्यायानें कपट करणें, अनेक युक्त्या व कावे करून आणि कारस्थानें रचून शत्रूला चीत करण्याचें धोरण जें अनेक वेळा पत्करावें लागतें तें त्यांनीं केव्हाही स्वीकारलें नाहीं. हिंदुराजात जर हा गुण असता तर, महमद गिझनी व महमद घोरी याच्या स्वाऱ्यांचें उट्टें काढण्याकरिता जयपाळ व पृथ्वीराज यानीं त्याच्या देशावर स्वाऱ्याच केल्या असत्या!

**युद्धशास्त्राचें अज्ञानः**—हिंदुराजामध्यें युद्धशास्त्राचें अज्ञान फार होतें. सावधपणा व दूरदर्शीपणा हे गुण मुसलमान सेनापतींमध्यें महमद कासीमपासून तों तालिकोटच्या लढाईपर्यंत एकसारखे दिसतात पण कोणत्याहि हिंदुराजानें युद्धशास्त्रातील हे गुण दाखविलेले आढळत नाहींत. हुलकावण्या दाखविणें, छापे घालणें, गनीमी काव्यानें लढणें, सैन्याची व युद्धाची आगाऊ सर्व शिस्त ठरविणें हे युद्धशास्त्राचे नियम हिंदुराजांना माहीतच नव्हते कीं काय असा संशय येतो कारण हिंदुमुसलमानामध्यें अगदी हातघाईच्या अशा पुष्कळ लढाया झाल्या या लढायांत विजयश्रीनें हिंदूच्या गळ्यात घातलेली माळ सावधपणा व दूरदर्शीपणा याच्या अभावीं काढून नेलेली दिसते ऐन लढाईच्या कुठें एकदम धुरळाच उडूं लागला, तर कुठें सेनापती पडला, कुठें हत्ती सेनापतीला घेऊन पळाला, तर केव्हां एकदम निशाण दिसेनासें झालें हिंदुसैन्याची गाळण होई व मुसलमानाचा जय ठेवल्यासारखा आपोआ

होई! हिंदूंच्या धर्मभोळेपणाचा फायदा कडव्या, शूर व निश्चयी मुसलमानांनी कपटनीतीचा अवलंब करून घेतला. पण हिंदूंनी तसें केल्याचें उदाहरण क्वचित आढळेल. मुसलमानांना हिंदूंच्या स्वभावाची, धर्मभोळेपणाची व जातिवैमनस्याची खडान्खडा माहिती होती. ही सर्व माहिती त्यांना बाट्या हिंदूकडून मिळे व तिचा ते उपयोग पाहिजे तेव्हां यथास्थित करीत. मुसलमान येण्यापूर्वी कडव्या व प्रबल शत्रूंशी सामना करण्याचे प्रसंग कित्येक शतकें हिंदुराजांना आले नव्हते. त्यामुळें क्षत्रिय राजामध्यें स्वसामर्थ्याबद्दल फाजील अभिमान व घमेंड ही उत्पन्न झाली होती. युद्धांत अपजय येणार असें दिसलें की, बचावाची आगाऊ सिद्धता ठेवणें, युद्धाची व्यवस्था व तयारी विचारपूर्वक करणें, शत्रूबद्दल सावध राहाणें या युद्धशास्त्रांतील नियमांचा अवलंब क्षत्रिय राजांनीं केला नाहीं, याचें कारण स्वसामर्थ्याबद्दल फाजील अभिमान हेंच होय! शिवाय हिंदुराजे विधर्मी शत्रूंशी जशास तसें या न्यायानें कधींमुद्धां ते वागत नसत. त्यांचें युद्धशास्त्र व युद्धकौशल्य, स्वसंस्कृतीच्या शत्रूशी लढतांना चांगलें असे शत्रूवर तो बेसावध असतां हल्ला न करणें, शरणागताला अभय देणें, लढाई चालू असतां प्रतिपक्षी क्षीणबल झाला असं त्यास त्या या आयत्या प्रसंगाचा पूर्ण फायदा न घेणें, इत्यादि गुण परक्या शत्रूशी लढतांना दोषास्पद झाले. ज्या संस्कृतीचा शत्रू आहे, त्याशीं तसेंच वागावें, ही नीति क्षत्रिय राजांना माहीत नव्हती. हिंदुराजांची युद्धप्रसंगीं जय्यत तयारीहि क्वचितच असे. जयपाळ व महमद गिझनी यांमध्यें १००१ मध्यें जें युद्ध झालें त्या वेळीं जयपाळची तयारी नाहीं असें पाहूनच महमदानें एकदम हल्ला करून लढाई जिंकली. त्या वेळीं महमदाला हिरे, माणकें, मोतीं, पाच यांचे अलंकार पुष्कळ सांपडले. कारण जयपाळाकडचे सरदार व सैनिक हे दागिने घालून नटून थटून रमाच्या मिरवणुकीप्रमाणें लढाईला आले होते! पुष्कळ प्रसंगीं हिंदूकडील गजदळ हें हिंदूंना मारक होई, पण केव्हां केव्हां त्याच हत्तींचा उपयोग मुसलमान करीत व हिंदूंना जिंकीत! आनंदपाल व गिझनीचा महमद, यामध्यें १००८ त जी लढाई झाली त्या वेळीं गक्खर लोकांच्या पराक्रमामुळें हिंदूंच्या बाजूला जय अगदी ठेवला होता. पण आनंदपालाचा हत्ती कासमच्या प्रतिस्पर्धी जो दाहीर (सिंधचा राजा) त्याच्या हत्तीप्रमाणें एकदम भडकला व रणांगण सोडून पळाला. झालें, सेनापती पळाल्या-

वर किंवा पळाल्यावर हिंदुसैनिकांनीं लगेच पळ काढला व मुसलमानांचा जय झाला ! महंमद घोरी पहिल्यानें पृथ्वीराजाच्या हातांत सांपडला होता पण त्यानें त्यास सोडून दिलें ! ! या अपमानामुळें महमद घोरीला झोंप आली नाहीं. त्यानें तिकडे युद्धाची जंगी तयारी केली तर पृथ्वीराज इकडे असावध-पणें स्वस्थ राहिला. महंमद घोरीनें पृथ्वीराजावर स्वारी करून त्याला पराजित करून पकडलें व पूर्वीचें प्राणदानाचें कृत्य कृतघ्नपणें विसरून त्याला ठार केलें.

**भोळसटपणाची कमाल:**—अल्लाउद्दीन खिलजीनें हिंदूचा भोळा स्वभाव लक्षांत घेऊनच दक्षिणेवर स्वारी केली. तो चुलत्यास म्हणाला " हिंदु लोक सात्विक आहेत, ते दुसऱ्याच्या वाटेस जात नाहींत, धर्मयुद्धाचे नियम मोडत नाहींत, आगाऊ वर्दी दिल्याशिवाय युद्ध करीत नाहींत, त्यांच्या वाटेस न जाणाऱ्यास विनाकारण ते त्रास देत नाहींत, तेव्हां मी त्यांना थापा देऊन सहज दक्षिण जिंकून येतों. " चमत्कार असा की, अल्लाउद्दीन दक्षिणेंत अचानक उतरला, " चुलत्यानें घालविल्यामुळें तेलंगणांत नोकरास जातों " असें त्यानें सांगितलें, पण त्याला कोणीहि आडकाठी केली नाहीं; व तो बोलतो तें खरें किंवा खोटें याची कोणी चौकशीहि केला नाहीं. तो एकदम देवगिरीच्या तटाखालीं येऊन धडकला व त्यानें युद्धाला आव्हान केलें. आयत्या वेळीं पूर्वतयारीच्या अभावें पुढें देवगिरीची काय स्थिति झाली हें वाचकास विदित आहेच !

झाले, त्यांनीं इतर मुसलमानांना, आपल्याकडे घेतलें व युद्धाची प्रचंड तयारी चालविली. पण रायचूरच्या जयामुळें बेहोष झालेले हिंदुराजे अगदीं स्वस्थ व बेफिकीर होते पुढें धोका येणार ही त्यांना कल्पना नव्हती शेजारी शत्रूचें सैन्य येऊन धडकलें तरी त्यांचे नित्याचे व्यवहार स्वस्थपणें चालले होते शत्रूचा मारा होऊं लागल्यावर रामराजा लढाईला निघाला व पालखींत बसून सैनिकांना उत्तेजन देऊं लागला. त्यानें रत्नांच्या राशी आपल्यापुढें ठेविल्या, व त्याचीं बक्षिसें तो सैनिकांना वाटूं लागला इतक्यांत त्याच्या पालखीवर एक मदोन्मत्त हत्ती चालून आला त्याला पाहताच भोई लोक पालखी टाकून पळाले. राजा उठून जों घोड्यावर स्वार होणार तोंच त्याला मुसलमानांनीं पकडलें व कंठस्नान घातलें. रामराजा पडल्यावर हिंदुसैन्य दशदिशा पळूं लागलें! अशा तऱ्हेचीं जीं अनेक उदाहरणें आढळतात त्यावरून हिंदूचें युद्धकौशल्य फार जीर्ण झालें होतें, आणि तें केवळ स्वदेशी व स्वधर्मी क्षत्रियाशीं लढण्यापुरतेंच उपयुक्त होतें, हें उघड दिसतें.

**जितांशीं वागणूक**—युद्धांत जय मिळविल्यावर विजेते हिंदुराजे जित लोकांशीं फारच मृदु वर्तन करीत आपण प्रभु आहोंत, सम्राट् आहोंत, चक्रवर्ती आहोंत, या अभिमानानें हिंदुराजे सत्य, विश्वास, औदार्य या गुणांचा अवलंब करीत. जितांना गुलाम करणें, त्यांना छळणें, त्यांच्या कत्तली करणें, त्यांच्यावर जबर कर बसविणें, हीं कृत्यें हिंदुराजाकडून होत नसत म्हणून त्यांचा जितांवर धवक कधींहि बसत नसे मुसलमान विजेत्यांचें वर्तन त्याच्या अगदीं उलट होतें. त्यांना दया दाखविणें, मृदुपणा धारण करणें हें पाप वाटत असे म्हणून ते जितांवर वर्चस्व गाजविण्याकरितां क्रौर्य, कत्तल व कपट यांचा स्वीकार अविलंबेंकरून करीत लढाऊ लोकांची कत्तल करणें, निरपराध्यांना गुलाम करणें, शहर जाळणें, देवळें पाडणें व मूर्ती फोडणें, हीं मुसलमान विजेत्यांचीं स्वभावकर्में होतीं, असें म्हटल्यास त्यांत अतिशयोक्ति नाहीं

**धार्मिक युद्धाभिनिवेश**—लढाईच्या वेळीं अंगात वीरश्रीबरोबर सात्विक धर्माभिमानहि उत्पन्न व्हावयास पाहिजे. मुसलमान नेहमीं मोठ्या अभिनिवेशानें लढत, कारण त्यांच्या धार्मिक भावना तीक्ष्ण, जळजळीत व उत्कट अशा होत्या. युद्धापूर्वी मुसलमान सेनापती गुडघे टेकून अल्लाची प्रार्थना करी व आपणास हटकून जय मिळणार असें बोलून तो सैनिकांचा उत्साह

द्विगुणित करी कुराणातील वचनाप्रमाणें हिंदु काफरावर परमेश्वराची अवकृपा असून आपणावर त्याची पूर्ण कृपा आहे, असें प्रत्येक मुसल्मानाला वाटे. पण हिंदुसैनिकामध्यें धार्मिक युद्धाभिनिवेश मुळींच नव्हता ! हिंदूच्या धर्मभावना अगदीं मृदु, शांत व मिळमिळीत अशा झालेल्या होत्या. तें पाहून तरी तत्कालीन राजानीं, त्यांच्या मन्त्र्यानीं व तत्कालीन पंडितानीं हिंदूमध्यें चेव आणण्याचा यत्न करावयास पाहिजे होता, आणि 'हतो वा प्राप्यासि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम्' हें तत्त्व हिंदुसैनिकांच्या नसानसांत भिनवावयास पाहिजे होतें पण हें तर झालेंच नाहीं, उलट मुसलमानाना जयावर जय मिळालेले पाहून त्यांच्यावर ईश्वरी कृपा आहे, ईश्वराचें चक्र मुसलमानाचें रक्षण करतें, असें म्हणून ते हताश होत जेत्याविषयीं जितांची भावना अशी होणें हें स्वाभाविक आहे, पण प्रारंभापासूनच हिंदूना या भावनानीं पछाडल्यामुळें त्यांचे पराभव लागो पाठ होत गेले, हेंहि तितकेंच खरें आहे

**धार्मिक वेडगळ समजुती** —धर्माच्या यथार्थ कल्पनाच समाजाला तारक होतात. पण समाजाचें मरण जर कशानें लौकर ओढवत असेल तर तें धार्मिक वेडगळ कल्पनानींच ओढवतें या वेडगळ समजुती हिंदूना नेहमी निरुत्साही करीत. पुराणामध्यें धर्मोच्छेद होणार हें लिहिलेलें भविष्य, कलिप्रभाव, दैववाद, अवतार, शकुन, उल्कापात, दिनशुद्धि, अशा कित्येक अड चणी हिंदूच्या मार्गांत धार्मिक वेडगळ समजुतींमुळें उत्पन्न होत शिवाय पिंगळा ओरडला, पाल चुकचुकली, कुत्रें रडूं लागलें, की हिंदु विगतधैर्य होत व हातीं घेतलेले उद्योग सोडून देत मुसलमानाना या गोष्टींचा काहींच विधि निषेध नसे, म्हणून ते अखेरपर्यंत नेटानें लढत व प्रसंगविशेषीं हिंदूच्या धार्मिक वेडगळ कल्पनांचा फायदा घेत युद्ध हातघाईवर आलें व त्यांत पराभव होणार असें दिसू लागलें की, मुसलमान एकदम एखादी गाय आणून सैन्याच्या सन्मु मागीं उभी करीत, किंवा तिचें रक्त मांस विहिरींत किंवा अन्नांत टाकून हिंदु सैनिकांना अन्नांत तें पाहून धर्मभोळे हिंदुसैनिक मृदुपणानें धर्मभावनांना वश होत व घमूचा जय मिळे गाय कापिली की डुक्कर कापावें, गोमांस टाकलें वाढमासं टाकावें, देऊळ पाडलें की मशीद उध्वस्त करावी, अशा प्रकारचें सव्वाशेरपणाचें वर्तन हिंदूंनीं युद्धाच्या वेळीं म्हणजे आणीबाणीच्या प्रसंगींहि केलें नाहीं, हें पाहून मन संताप व उद्वेग यांनीं भरत होतें !

**स्वामिभक्तीचा अतिरेक**—स्वामिभक्ति हा सद्गुण हिंदुसमाजामध्यें स्त्रियांच्या पातिव्रत्याइतका उत्कट आहे, जुल्मानें झालेल्या मुसलमान पती बद्दल हिंदुस्त्रियांनीं जें पातिव्रत्य दाखविलें तें अक्षम्य होतें. त्याहीपेक्षां जुल्मानें स्वामी झालेल्या माणसाबद्दल हिंदूंनीं, विशेषतः रजपुतांनीं, जी स्वामिनिष्ठा दाखविली ती अत्यंत अक्षम्य होती. क्षुद्र स्वार्थ साधण्यासाठीं नाइलाजास्तव एखाद्याला स्वामी म्हणून कबूल केल्यावर त्याचें हित साधण्यासाठीं कायावाचामनेंकरून झटावयाचें हा हिंदूचा बाणा! आपण परदास्यशृंखलेंत पडलों याची शरम न वाटतां दुसऱ्याला त्या स्थितींत आणण्याची उत्सुकता हा हिंदु लोकांचा स्वभाव! पोटाला देईल त्याची नोकरी करावयाची, धन्यानें स्वसरुतिबांधवांच्या माना कापावयास सांगितलें तरी तें काम खुषीनें करावयाचें, वैयक्तिक स्वार्थाकरितां पाहिजे तें करण्याची तयारी हा जो हिंदु लोकांचा स्वभाव याचा फायदा मुसल्मान सेनापतींनीं घेतला व आज इंग्रजहि या गुणाचा फायदा करून घेत आहे. त्याचें कारण समाजहित व राष्ट्रहित यांची जाणीव नसणें व स्वार्थाकरितां स्वामिभक्तीची पराकाष्ठा करणें हें होय

**हिंदुजनतेचा उदासीन व सोशीक स्वभाव**—हिंदुजनतेचा स्वभाव अनेक शतकांपासून अतिशय सोशीक व जगाविषयीं उदासीन असा, झालेला आहे. कोणींहि यावें, टपटावें, मारावें तरी ही स्वस्थच! जुलमाचा प्रतिकार करण्याची वृत्ति हिंदु जनतेमध्यें फारच थोडी आढळते. जनतेनें राजाचा प्रतिकार केला असें क्वचितच आढळेल! राजा चांगला असला तर म्हणे ईश्वराची कृपा, तो जुलमी असला तर तो ईश्वराचा क्षोभ, काहीं बरें वाईट झालें तर ती देवाचीच मर्जी! "तुका म्हणे उगी रहावें। जें जें होईल तें तें पाहावें॥ आलें देवाजीच्या मना। तेथें कोणाचें चालेना॥" हीच वृत्ति कित्येक शतकें हिंदुसमाजाच्या हाडींमासीं खिळलेली आहे खेडेगावच्या शेतक-याला चोर चिल्ट व श्वापद यांपासून संरक्षण करणारा कुत्रा, एक रखवालदार महार व एक ग्रामपंचायत असली कीं मग कांहीं नको! सरकार म्हणजे त्यांच्या समजुतीनें लुपटसुम चोरांची टोळी!! त्यांचें देणें म्हणजे चोरांचें देणें तें एकदां दिलें म्हणजे वर्षभर पिडा टळली सारांश, या शेतकरीवर्गाचा राज्य सत्तेशीं अत्यंत उदासीनतेचा संबंध असे!! जनतेनें राज्यव्यवस्थेविषयीं केव्हांहि उत्सुकता दाखविलेली नाहीं आजपर्यंत अनेक राजवटी झाल्या त्यांचें सूक्ष्मपणें

अवलोकन केल्यास असें दिसतें कीं, जुन्या राजवटींतील राजा व त्याच्या भोंवतालचे लोक, आणि नवी राजवटी स्थापू इच्छिणारा व त्याच्या भोंवतालचे लोक असे दोनच पक्ष काय ते राजकारणामध्यें पडत. त्याशिवाय प्रामुख्यानें दोन्ही बाजूला पोटभरू सैनिक जे काय असतील ते सोडून इतरांचा संबंध राजकारणामध्यें कांहींच नसे कोणी आला गेला तरी आपल्याकडून कर घेणार आणि आम्हांला लुटणार असेंच त्यांना वाटे. इसापनीतींतल्या गाढवाच्या "कोणी धनी झाला तरी माझ्या पाठीवर गोण्या देणारच" या वृत्तीशींच जनतेच्या वृत्ताचें सादृश्य होतें. या सोशिक वृत्तीचा फायदा मुसलमानांना मिळाला. घरें लुटलीं, बायका पळविल्या, मूर्ति फोडल्या, देवळें भ्रष्ट केलीं, शेवटीं तोंडात कोणी थुकलें, तरी या समाजाची आ करण्याची वृत्ति !!! पूर्वीचा सोशिक स्वभाव व त्यावर मुसलमानांच्या अतिरिक्त जुलमाचा थर, त्यांतच निवृत्तिपर तत्त्वज्ञानाची भर यामुळें प्राण गेला तरी क्षिति नाहीं अशा हिय्यानें समाजानें जुलमी राज्यसत्तेवर आक्रमण कधींहि केलेलें नाहीं मुसलमानाशीं झगडतांना ही उणीव दूर करण्याचा प्रयत्न पंडितांनीं किंवा राजानीं केलेला आढळत नाहीं असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें.

**हिंदुसैनिकाचा पोट हाच पुरुषार्थ**—तत्कालीन हिंदुसमाज व मुसलमानसमाज यांच्या मनोवृत्तींचें परीक्षण केल्यास मुसलमानांमध्यें लुटीची लालूच, धर्माचा आवेश या गोष्टी प्रामुख्यानें दिसतात धर्माकरता मरणामध्यें कांहीं विशेष आहे, स्वर्ग आहे, असे विचार त्यावेळीं हिंदुसमाजामध्यें उत्पन्न करावयास पाहिजे होते जातिवंत रजपूत लोकांशिवाय इतर जे लोक लढाईला जात ते धन्याची नोकरी म्हणून प्राण देण्यास व घेण्यास तयार असत. त्यांना धर्म व राष्ट्र यापैकीं कशाचीच जाणीव नव्हती. पोटाला भाकरी दिली कीं त्याच्या बाजूनें लढावें, तो पाठीवर असेल तोंपर्यंत लढावें, तो मेला कीं लगेच पळून जावें, असा यांचा क्रम असे या लोकांत पोट हीच काय ती भावना होती. त्याशिवाय दुसरी कोणतीहि जिवंत भावना नव्हती पोटाला जो देईल त्याच्या बाजूनें हे लोक लढणारे आहेत ही गोष्ट गिझनीच्या महमुदाच्या ध्यानांत आली व त्यानें हिंदुराजांशीं लढण्याकरतां हिंदुसैन्यच जवळ ठेवलें. सिंधदेशचा राजा दाहीर याच्या पदरीं अरबांचें लष्कर होतें. पण महमद कासीमची जेव्हां स्वारी झाली, त्यावेळीं अरबांनीं आपल्या स्वधर्मबांधवाशीं लढण्याचें

साफ नाकारलें ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी नाहीं काय ? अरबी सैनिक इस्लामी सैन्याविरुद्ध केव्हांहि शस्त्र उपसणार नाहीं असें आपल्या अब-दाल्याला स्पष्ट सांगतात व हिंदुसैनिक पोटाला देणाऱ्या कोणत्याहि धन्याच्या बाजूनें स्वबांधवाशीं लढण्यास तयार होतात हें दृश्य किती विपरीत आहे ?

शिकंदरच्या स्वारीपासून तों इंग्रजांनीं हिंदुस्थानाचें राज्य घेतलें तोंपर्यंत हिंदुसमाजाची नीति हीच कीं, त्यांना पोटाशिवाय दुसऱ्या कशाकरताहि लढावेंसें वाटत नसे ! याला अपवाद फक्त शिवभूपतीपासून राजाराम महाराजाच्या कारकीर्दीपर्यंतचाच होय सामान्य हिंदुजनतेमध्यें जी वृत्ति तीच पाटील, पटवारी, देशमुख, देशपांडे यांमध्येंहि होती गांवची पाटिलकी व वतन राहिलें म्हणजे बस्स, मग कोणाचीहि नोकरी करण्यास यांना कसलीहि दिक्कत वाटत नसे ! वतनवाडी जर जात असेल तरच, हे जागे होत प्रसंगीं धर्मांतर झालें तरी पुरवलें, पण वतनवाडी जातां कामा नये, अशा वृत्तीचीं उदाहरणें अनेक दाखवितां येतील. तात्पर्य हिंदुराजांच्या वतीनें लढणाऱ्या सैनिकांपैकीं पुष्कळांना पोट, शेत व वतन याचाच लोभ असे म्हणून ते निकरानें केव्हांहि लढत नसत राजा आपला, धर्म आपला, लढाईच्या विजयानंतर होणारें राज्य आपलें, कदाचित् युद्धांत मेल्यास स्वर्ग आपला, अशा उत्साहाच्या लहरी त्यांच्या अंतःकरणावर केव्हांहि उसळलेल्या दिसत नाहींत ! सेनापती पडल्यावर चिकाटीनें युद्ध केल्याचीं उदाहरणें सूर्याजीच्या प्रसंगासारखीं फार थोडीं देतां येतील ! भारतीय युद्धप्रसंगीं दुर्योधन रणांगणांत पडल्यावर सैनिक जेव्हां सेनापतीची चौकशी करूं लागले, त्यावेळीं ''आधीं तुम्ही लढा व मग सेनापतीची चौकशी करा' असें उत्तर व्यासांनीं तेथील संवादांत घातलें आहे चिकाटीनें लढा, जय मिळवा हें भारतांतील तत्त्व प्रथमतः मुसलमानांशीं लढतांना हिंदुसैनिकांमध्यें आणावयास पाहिजे होतें मनुष्यप्राणी सामान्यतः स्वार्थी, त्यांत सामान्य माणसांना पोटापेक्षां दुसरें कांहींहि दिसत नसतें; तथापि अशाहि लोकांमध्यें धर्म, राष्ट्र, स्वर्ग, लूट व राज्य अशा तऱ्हेचे उच्च उच्च विचार उत्पन्न करून मुसलमानांशीं टक्कर देण्याची सिद्धता करावयास पाहिजे होती तशी सिद्धता झाली नाहीं याबद्दल त्यावेळचे विद्वान् ब्राह्मण, पंडित, राजे व त्यांचे मंत्री हेच दोषास पात्र आहेत

**एकट्या क्षत्रिय जातीवरच युद्धाचा मारा**—अहिंसा, सन्यास, जगन्मिथ्यात्व, समष्टिधर्माचा अभाव यामुळें हिंदुसमाजांत जातिविषयक उच्चनीच कल्पना, शिवाशीव, विटाळचंडाळ, खाऊन बाटतो, पिऊन बाटतो अशा प्रकारचा धर्म अतिशयच बोकाळला होता या सर्व धर्म कल्पना मुसलमानाना पोषक झाल्या व त्या हिंदूना शोषक झाल्या ! परकीयाना त्या साधक झाल्या आणि हिंदूना बाधक झाल्या ! इतकेंच नव्हे तर मारकही झाल्या. वर्णव्यवस्थेचा लोप होऊन जातींना व त्यातील पोटजातींना मुसलमान येण्यापूर्वी फार महत्त्व आलें होतें त्यामध्यें उच्चनीचपणाच्या पुष्कळ कल्पना होत्या राज्य करावें क्षत्रियानीं, लढावें क्षत्रियानीं, कोणी परकी आला गेला तर त्याचें पारिपत्य करावें क्षत्रियानींच अशी समजूत म्हणून एकट्या क्षत्रिय जातीवरच लढाईचा मारा पडला ! क्षत्रिय राजामध्यें आपआपसात फारसें रहस्य नसल्यामुळें ते एकमेकाच्या मदतीला क्वचितच येत म्हणून त्याचा पराभव वरचेवर होई व एकदरीत लढवय्याचा तुटवडा पडे मुसलमानापैकीं झाडून सर्व लोक लढाईला येत हिंदूपैकीं एकटी क्षत्रिय जातच लढाईचें काम करी. मुसलमानानीं हिंदुराजाना जिंकल्यावर त्यानींच राज्य करावें, हिंदूची योग्यता राज्याची नाहीं, परमेश्वरानें मुसलमानाना राज्यकर्ते नेमले आहेत, अशा समजुती झाल्या व त्यामुळें हिंदूतील लढाऊ जाती फार कमी झाल्या प्रतिपक्षाशीं लढतांना सैनिकाचा तुटवडा पडतो हें वैगुण्य धारणावान् दूरदर्शी मनुष्याच्या लक्षात आलें नाहीं काय ? “ **शस्त्र द्विजातिभिर्ग्राह्यं यत्र धर्मोपरुध्यते** ’ अशी मनूची धर्माज्ञा असतांना सुद्धा सर्व लोकाना धर्माकरता लढण्याची स्फूर्ति कां बरें झाली नाहीं ?

# प्रकरण बारावें

## बौद्धसंस्कृतीचे अनिष्ट परिणाम

**पूर्वार्धसमाप्तीची प्रस्तावना**—भारतीय युद्धापर्यंत आर्यसंस्कृति उत्कर्षाच्या वैभवावर आरूढ होती त्यानंतर पाणिनीकालापर्यंत ती एका स्थिर स्थितीमध्यें वावरत होती या स्थैर्याच्या कालांत तिच्या अपकर्षाचीं बीजें रुजलीं गेलीं व त्याचा स्फोट बौद्धसंस्कृतीच्या रूपानें झाला. बौद्धसंस्कृतीमुळें जग दुःखमय आहे, तें क्षणिक आहे, शून्य आहे, हें तत्त्वज्ञान बळावलें, त्याचा परिणाम जगाकडे दुर्लक्ष, प्रवृत्तिधर्म मागें पडून सन्यासधर्माला महत्त्व, निवृत्तीचा अतिरेक, अहिंसेचा पुरस्कार, व्यष्टिधर्माच्या स्तोमामुळें सापेक्षनीतीचा अभाव, मूर्तीबद्दल अद्भुत कल्पना असा झाला, इत्यादि विवेचन गेल्या प्रकरणापर्यंत झालें. आतां बौद्धसंस्कृतीनें आर्यसंस्कृतीवर केलेल्या एकदर आघातानीं तिचा खरोखरी घात कसा झाला याचा आढावा घेऊन या ग्रंथाचा पूर्वार्ध येथें संपवावयाचा आहे

**बुद्धाच्या दु खवादाचें बंड**—बौद्धसंस्कृति म्हणजे आर्यसंस्कृतीविरुद्ध एक बंड होतें. बौद्धक्रांति म्हणजे भयकर सामाजिक क्रांति होती! फार काय पण बौद्ध तत्त्वज्ञान म्हणजे जगविनाशाचें तत्त्वज्ञान होतें उपनिषदामध्यें जो तत्त्वविचार आहे, जी निवृत्ति आहे, ती ऐश्वर्यसंपन्न समाजाची स्वाभाविक मनोवृत्ति होती. ऐश्वर्याची रेलचेल झाल्यावर निरतिशय सुखाची ती जिज्ञासा होती किंवा धर्मार्थकामप्राप्तीच्या पूर्ण तृप्तीची ती ढेकर होती! पण, बुद्धपूर्वकाळापासून तिचें स्वरूप पालटलें जी ज्ञानाची सहज वृत्ति, जी त्यागाची स्वाभाविक प्रवृत्ति ती जाऊन तिजमध्यें कृत्रिमता आली सहजत्याग गेला व कृत्रिम त्याग आला व त्याचें महत्त्व वाढविण्याकरितां जगांत दु ख आहे, या तत्त्वाची मीमासा उत्पन्न झाली आनद, ऐश्वर्य, सत्ता, स्वामिभाव यांची वैदिक मीमांसा कुणीकडे व बुद्धाची दु खमीमांसा कुणीकडे? कुठें इंद्राचा ऐरावत, व कुठें श्याम भटजीची तट्टाणी! दोहोंमध्यें जमीन–अस्मानचें अंतर! पण हेंच तत्त्वज्ञान जगापुढें आलें व ऋग्वेद व यजुर्वेद संहितेंतील जिवत विचार पूर्ण लोपले वैदिक वृत्ति मारण्याकरिता वासनाक्षयाचे पाठ दिले गेले उपनिषदांमध्ये विशेषत साहि

तिक वाङ्मयामध्यें जगत् दुःखमय आहे, तें शून्य आहे, क्षणिक आहे हें तत्त्वज्ञान नाहीं. तेथें आनंद, सुख, ऐश्वर्य यांचें तत्त्वज्ञान आहे. बुद्धाला सर्वत्र पाप, दुःख, व अपावित्र्य हीं दिसत होतीं. परंतु वेदामध्यें याच्या उलट विचार आहेत. जगांत सर्व पाप पाप म्हणून बुद्ध त्या पापी जगापासून अलिप्त राहाण्याचा व शुद्ध राहाण्याचा उपदेश करितो तर, वेद हे शरिराच्या सर्व इंद्रियशक्तीमध्यें व जगामध्यें देवताचें अधिष्ठान आहे असें सांगून त्या देवताच्या साह्यानें देवांचें यजन करण्याची अनुज्ञा देतात! देवाच्या प्रेरणेनें सर्व होत आहे, त्याच्या शक्तीनें मी हें कृत्य करितों असा भाव वेद उत्पन्न करितात व जगांत सर्वत्र देवताचें अस्तित्व भासवितात.

**वैदिक आनंदवादः**—सामान्य कर्मापासून तों प्रधान वैदिक यज्ञकर्मापर्यंत इंद्रियांच्या ठिकाणी देवता कल्पून वैदिककर्मांचा विचार केलेला आहे. नारायणोपनिषदामध्यें एक सुंदर रूपक आहे तें त्रिसुपर्णाच्या पाठांत येतें.

"**तस्यैवं विदुषो यज्ञस्यात्मा यजमानः श्रद्धा पत्नी शरीरमिध्ममुरो वेदिर्लोमानि बर्हिर्वेदः शिखा हृदयं यूपः काम आज्यं मन्युः पशुस्तपोऽग्निः**" या मंत्राचा अर्थ असा आहे कीं, आत्मा हाच कोणी यजमान, श्रद्धा ही पत्नी, शरीर हें लांकूड, हृदय हें यूप, काम हा हवि, क्रोध हा पशु, व तप हा अग्नि अशा भावनेनें जो वागतो त्याला यज्ञ केल्याचें फळ मिळतें. सर्व जग भावनेनें चाललें आहे. सुख व दुःख या दोन्ही भावनाच आहेत. परंतु, वेदाची दृष्टि सुख व आनंद या भावना वाढविण्याकडे आहे. अस्यावर महदाची भावना म्हणजेच उपासना होय! क्षुद्र विचार, क्षुद्र कल्पना सोडून उच्च विचार, उच्च भावना यामध्यें मानवी जीविताचें अस्तित्व आहे व साफल्य आहे, असाच वेदाचा सिद्धान्त आहे. कोणतेंहि कर्म देवता घडवून आणतात, त्यांचीच प्रेरणा सर्वत्र कार्यकारी होते हें पुरुषसूक्ताच्या शेवटच्या मंत्रावरूनहि समजण्याजोगें आहे.

"**देवस्य त्वा सवितुः प्रसवेऽश्विनोर्बाहुभ्यां पूष्णो हस्ताभ्याम् अग्नेस्तेजसा सूर्यस्य वर्चसेन्द्रस्येन्द्रियेणाभिषिंचामि**" सविता देवाच्या प्रेरणेमुळे अश्विनदेवाचे बाहु, पूषन् देवाचे हात, अग्नीचें तेज, सूर्याचें ओज इन्द्राचीं इंद्रियें यांच्या साह्यानें मी अभिषेक करितों, असा या मंत्राचा भावार्थ आहे. यांत पाप, दुःख, घाण यांची वार्ताहि नाहीं. अशा तऱ्हेचे किती तरी

मंत्र साहित्तिक वाङ्मयातून देतां येण्याजोगे आहेत. बुद्धाचा दुःखवाद पुढें आला व त्यानें जगांत दुःखच दुःख भरलें आहे असें सांगितलें. पण जगांत सर्वत्र जर दुःखच आहे तर माणसें जगतात कशीं? सृष्टी चालते कशी? व्यवहार घडतात कसे? हा मोठाच प्रश्न आहे. त्याचें उत्तर बुद्ध देत नाहीं. अत्यंत दुःखरूपी जगांत माणसांनी पटापट आत्महत्या करून घेतल्या असत्या व सुखाचा मार्ग स्वीकारला असता. तैत्तिरीयोपनिषदात असा प्रश्नच केला आहे कीं,

'को ह्येवान्यात् कः प्राण्यात् । यदेष आकाश आनंदो न स्यात् ॥'

जर हें आकाश किंवा ही पोकळी आनंदरूप नसती तर यामध्यें कोणी तरी अपानक्रिया किंवा प्राणक्रिया म्हणजे श्वासोच्छ्वास कधी केला असता काय? अर्थात् कुणी तरी जिवंत राहिला असता काय? ज्या अर्थी मनुष्य जगांत जिवंत राहातो त्या अर्थी "एष ह्येवाऽऽनन्दयाति" हें सर्व जगत् आनंदरूप आहे. उपनिषदाचें पर्यवसान आनंदमीमांसा करण्यामध्यें झालेलें आहे. सत्, चित्, आनंदस्वरूपाची प्राप्ती कशी करून घ्यावी असा तेथें विचार आहे. तैत्तिरीय व बृहदारण्यक उपनिषदांमध्यें आनंदमीमांसा केली आहे ती अशी–'तरुण मनुष्य, अगदी तरणा बांड विद्वान् मनुष्य, हा चांगला भोक्ता आहे, सदृढ आहे व बलवान् आहे. त्याच्या स्वाधीन ही सर्व पृथ्वी (वित्तानें परिपूर्ण अशी) केली तर, त्याला या पृथ्वीचा जो उपभोग घेता येईल तो एक मानुष आनंद समजावा! असे शंभर मानुष आनंद म्हणजे एक मनुष्यगंधर्वांचा आनंद; त्याच्या शतपट देवगंधर्वांचा आनंद; त्याच्या शतपट चिरलोक लोकांत राहणाऱ्या पितरांचा आनंद; त्याच्या शतपट अजानजान देवाचा आनंद; त्याच्या शतपट कर्मदेवानंद; त्याच्या शतपट इंद्रानंद; त्याच्या शतपट बृहस्पतीचा आनंद, त्याच्या शतपट प्रजापतीचा आनंद व त्याच्याहि शतपट परब्रह्माचा आनंद आहे इत्यादि. ही मीमांसा मानुषानंदापासून सुरू झाली व ती परब्रह्मापर्यंत गेली. हा मानुष आनंद तरी सामान्य आहे काय? तोहि असामान्य कोटीतीलच आहे।

पृथिवी रत्नसंपूर्णा हिरण्यं पशवस्त्रियः ।
नालमेकस्यपर्याप्तमितिमत्वा शमं व्रजेत् ॥

हें जे तत्त्व भारत व भागवतात सांगितलें आहे, तेंच वरील आनंदमीमांसेंतहि आहे. रत्नांनें भरलेली पृथ्वी, द्रव्याच्या राशी, स्त्रिया, पशु, इतर उपभोग्य वस्तु ही सर्व मिळवून त्यांचा उपभोग घेतल्यावर मग यांमध्यें निरतिशय

आनद नाहीं असा विचार करून सामाचा स्वीकार करणें हेंच योग्य आहे मानुषानदाची तृप्ती होऊन ढेंकर आली म्हणजे मग पुढें जाणें उचित आहे पण बुद्धाच्या दु खवादामध्यें तृप्तीच्या ढेकरा नसून तेथें पित्ताच्या ढेकरा उत्पन्न झालेल्या दिसतात! भोगानतर त्याग, पाडित्य सपादन केल्यावर मग " पाडित्य निर्विद्य," मिळविल्यानतर दान हें तत्त्व तेथें नाहीं तर, मुळापासूनच वासना मारण्याची शिकवण आहे बुद्धाला सर्वत्र अपावत्रता दिसत होती तर, वेदाना सर्वत्र सुख, पावित्र्य, व पौरुषाला पूर्ण अनुकूल असें जग दिसत होतें " हे वायु मधु आहेत, हे समुद्र मधु आहेत, या ओषधि, या वनस्पती, हे दिवस, ह्या रात्री सर्व काहीं मधु मधु आहेत, गोड आहत, अनुकूल आहेत," असा भाव पुढील मनात सागितला आहे.

**मधुवाताऋतायते, मधु क्षरन्ति सिंधव माध्वीर्न· सन्त्वोषधी ।१।**
**मधुनक्तमुतोषसि मधुमत्पार्थिव रज मधुद्यौरस्तुन पिता।२।**
**मधुमान्नो वनस्पतिर्मधुमा अस्तुसूर्य माध्वीर्गावो भवन्तु न ।३।**

ऋ १।९०।६ ते ८

अथर्ववेदामध्यें एक मधुसूक्त आहे त्यांत सर्व काहीं मधुच आहे असें विवेचन केलें आहे बृहदारण्यक उपनिषदांमध्यें एक मधु ब्राह्मण भाग आह तेथें पृथ्वी भूताना मधु, भूतें पृथ्वीला मधु, आपाना भूतें मधु, भूताना आप (पाणि) मधु, त्याचप्रमाणें वायु, अग्नि, आदित्य, दिशा, चद्र, विद्युत्, आकाश, धर्म, मनुष्यलोक, आत्मा हे सर्व या भूताना मधु असून भूतें या सर्वांना मधु आहेत असें सागितलें आह म्हणजे जगात अन्योन्य उपकारता व उपयोगिता आहे परस्पर मारकता नाहीं, ती नाहीं म्हणूनच जगात सुख, पावित्र्य, उत्साह हीं आहेत भृगुवल्लीमध्यें तर आनदापासूनच भूताची उत्पत्ति सागितली आहे " **आनन्देन जातानि जीवन्ति, आनन्द प्रयन्त्यभिसंविशन्तीति** ॥" अशी भार्गवी वारुणी विद्या आहे व ती वरुणानें आपल्या भृगुपुत्राला सागितली आहे असो

**बुद्धक्रिया व दार्शनिक वाङ्मय—** बुद्धानें वैदिक कर्मप्रवृत्ति समूळ बद करून निवृत्ति आणली, वैदिक विचारपरपरा बदलली, आनदमीमासा घालविली व दु खमीमासा स्थापन केली याचें प्रत्यतर दार्शनिक वाङ्मयावरूनाहि चांगलें येतें एकदर सस्कृत वाङ्मयापैकीं जवळजवळ निम्में वाङ्मय दार्शनिक आहे या

आस्तिक व नास्तिक षड्दर्शनामध्ये दु:खवाद भरलेला आहे व बुद्धोत्तर काळातील संस्कृत वाङ्मयामध्येहि त्याची घोषणा सर्वत्र झालेली आहे. सांख्य, योग, न्याय, वैशेषिक व वेदान्तादि शास्त्रातील प्रथावर बौद्ध सिद्धान्तांचा चांगलाच संस्कार झालेला दृष्टीस पडतो. या शास्त्रातील मूळ सूत्र वाङ्मय बुद्धपूर्वकालीन असले तरी टीका व भाष्यवाङ्मय बुद्धोत्तर काळातच निर्माण झालेले आहे. अर्थात् या वाङ्मयात बुद्धप्रक्रिया पूर्णपणे स्वीकारलेली दिसते—

सांख्यकारिका —दुःखत्रयाभिघाताज्जिज्ञासा तदपघातके हेतौ। दृष्टे साऽपार्था चेन्नैकान्तात्यन्ततोऽभावात् ॥ १ ॥

न्यायसूत्र —आत्मशरीरेंद्रियार्थबुद्धिमनःप्रेत्यभावफलदुःखापवर्गास्तु प्रमेयम् ॥ १।१।९

न्यायभाष्य —सुखसाधनस्य दु:खानुषंगाद् दुःखेनाविप्रयोगाद्विविधबाधनायोगाद् दु:खमिति समाधिभावनमुपदिश्यते ॥ १।१।९
वात्स्यायनन्यायभाष्यात याचाच अनुवाद आहे. न्यायवार्तिकात जगातील एकवीस तऱ्हेच्या दु:खाचे वर्णन केलेले आहे.

योगसूत्र —परिणामतापसंस्कारदु:खैर्गुणवृत्तिविरोधाच्च दु:खमेव सर्वं विवेकिनः ॥ २।१५

ब्रह्मसूत्रांनी उपनिषदातील वाक्याचा समन्वय केल्यामुळे त्यात दु:खाचा स्पष्ट उल्लेख नाही. पण भाष्यकार आचार्य जगत् दुःखमय आहे या मताचेच आहेत. त्यांनी ऐतरेयोपनिषदातील "अस्मिन् महत्यर्णवे" या पदावरील भाष्यात संसारदु:खाचे वर्णन मोठ्या बहारीचे केले आहे.

'अस्मिन् संसारार्णवे अविद्याकामकर्मप्रभवदुःखोदके तीव्ररोगजरामृत्युमहाग्राहे अनादौ अनंते अपारे निरालंबे विषयेंद्रियजनितसुखलवलक्षणविश्रामे पञ्चेन्द्रियार्थतृष्णामारुतविक्षोभोत्थितानर्थशतमहोर्मौ महारौरवाद्यनेकनिरयगतहाहेत्यादि आकूजिताक्रोशनोद्भूतमहारवे सत्यार्जवदानदयाहिंसाशमदमधृत्याद्यात्मगुणपाथेयपूर्णज्ञानोडुपे संसर्गसर्वत्यागमार्गे मोक्षतीरे एतस्मिन् महत्यर्णवे पतितवत्यः ( ऐ. उ. शां. भा. २।१ )

**भावार्थ**—( सांख्यकारिका )— दु खत्रयाच्या आघातांनीं पीडलेल्या जीवाचा तत्त्वज्ञान हा एकच तरणोपाय आहे. दु खाची पूर्ण निवृत्ति करण्यास इतर साधनें असमर्थ आहेत. ( न्या. सू. ) आत्मा, शरीर, इंद्रिय, विषय, बुद्धि, मन, पुनर्जन्म, फल, दु ख व मोक्ष असे मोक्षशास्त्राचे विषय आहेत यातील दु ख शब्दावर ( न्यायभाष्यात ) असें म्हटलें आहे 'जगांतील सुख साधनें दु खाशी निरतर संबद्ध असतात. सुखाला दु ख हें सारखें चिकटलेलें असतें नानाविध दोषांनीं सुखसाधनें युक्त असल्यामुळें सुखसाधनें हीं मूर्तिमत दु ख होत. म्हणून एकाग्रचित्तानें समाधिभावाचा उपदेश दु खशब्दानें केला आहे ( योगसूत्र ). प्रपचातील सर्व सुखें परिणामीं दु खजनक असतात, त्याच्या उपार्जनातहि अत्यंत ताप होत असतो, त्यामुळें वासना पुन पुन उत्पन्न होऊन मनाला अत्यंत ताप देतात, म्हणून विवेकी पुरुषाच्या दृष्टीनें प्रापचिक सुखें मूर्तिमत दु ख होत ( शंकराचार्य )—ससार हा एक मोठा सागर, अविद्या, कर्म, कामनाजन्य जें दु ख तें यातील अगाध पाणी, भयकर रोग, जरा व मरण हीं या जलातील भयकर जलचरें, अनत, अपार अशा या समुद्रात विषयेंद्रियजन्य जी क्षणिक सुखें तींच जणुं विश्रामस्थानें असतात या समुद्रात विषयतृष्णेच्या महावायूनें क्षोभ होऊन शेंकडों लाटा उत्पन्न होत असतात, रौरवादि नरकात पडलेल्या दु खित जीवाच्या किंकाळ्या ही त्या समुद्राची गर्जना होय, ज्ञान ही या समुद्रातून तरून जाण्याची होडी असून सत्य, अहिंसा, शम, दम, धैर्य इत्यादि सद्गुण ही या नावेंतील शिदोरी होय सत्सगति व सन्यास हा या होडीचा मार्ग असून मोक्ष हें या समुद्राचें पैलतीर आहे ! श्री मध्वरामानुजाचार्य हे सुद्धा दु खवादाला अनुमति देतात महाभारतातील स्त्रीपर्वामध्यें दु खमय ससाररूपकाचा एक स्वतन्त्र अध्याय आहे

**दु खवाद व साधुसंत**—पूर्वमीमासक हे जगाकडे फारसें लक्ष देत नाहींत. त्याचा अभ्युदय म्हणजे स्वर्ग आहे व तो परलोकासबद्ध आहे त्यांनीं जगाचा फारसा विचारहि केलेला नाहीं उत्तरमीमासेच्या सिद्धान्तामध्यें दु ख निवृत्ति व परमानदप्राप्ति हे दोन भाग आहेत. तें शास्त्रच मुळीं इष्टप्राप्ति व अनिष्ट परिहारोपायाकरिता प्रवृत्त झालें आहे पण या शास्त्रालाहि दु खवादानें सोडलें नाहीं. शकराचार्यांनंतर जेवढें निवृत्तिपर सस्कृत प्राकृत वाङ्मय उत्पन्न झालें त्यांत जन्मापासून मरेपर्यंत दु खच दु ख भरल्याचे विचार आढळत

ज्ञानेश्वर आपल्या भावार्थदीपिकेंत "मातेचिया उदर कुहरीं। पचूनि विष्ठेच्या दाथरीं। उकडूनि नव मासवरी। जन्मजन्म मरति॥" असें म्हणतात व "अगा कटकटा हें चोखटें। मृत्युलोकींचें उफराटें। येथ अर्जुना जरी अवचटें। जन्मलासि तूं॥ तरी झडझडोनि वाहिला निघ। इये भक्तीचे वाटे लाग।" असा उपसंहार गीता अ. ९ श्लो. ३३ मधील 'अनित्य असुख' या पदावरील टीके मध्यें करितात. येथें मृत्युलोकाचें मोठें बहारींचें दुःखवर्णन आहे. ज्ञानेश्वरीतील विचाराचे संस्कार पुढील सर्व प्राकृत वाङ्मयावर झाले आहेत. त्रिविध ताप, संसारदुःख, जगत् दुःखमय हें वर्णन "सुख पाहातां जवा पाडें। दुःख पर्वताएवढें॥" या भाषेनेंच प्रत्येकानें केलें आहे. तात्पर्य, बुद्धाच्या दुःखवादानें आर्यसंस्कृतीच्या तत्त्वज्ञानाचें मूळचें स्वरूप पूर्ण पालटलें. म्हणून आमचा हिंदुसमाज वैदिक आर्यवृत्तीचा नाहीं तर तो बौद्धवृत्तीचा आहे. बौद्ध तत्त्वज्ञान, बौद्धनीतितत्त्वें हींच त्याच्या हाडींमासीं खिळलेलीं आहेत. बौद्धधर्माच्या आघातानें एकदर समाजाचें स्वरूप पालटून टाकिलें. या क्रांतीचें स्वरूप लक्ष्यांत यावें म्हणून इतिहासाचार्य राजवाडे यांची रा. मा. वि. चपूतील यादी आमच्या मतासह व थोड्या फेरफारासह देतों.

**बौद्ध क्रांतीचें स्वरूप**—१ बुद्धापूर्वी चार्वाकानें आपलीं लोकायतिक मतें चव्हाट्यांत व संकर जातींत पसरवून ठेविल्यामुळें आर्यसंस्कृतीविषयीं कुत्सित बुद्धि उत्पन्न झाली होती तीच बुद्धानें वाढविली.

२ चातुर्वर्ण्यव्यवस्था मोडून सर्वांमध्यें समता व एकजिनसीपणा आणण्याचा उद्योग व उपदेश बुद्धानें सुरू केला. (ज्ञानकोशांतील माहितीवरून असें दिसतें कीं, बुद्धानें जाती मोडण्याचा उद्योग न करितां फक्त क्षत्रिय जात ही सर्वश्रेष्ठ आहे असें ठरविण्याचा यत्न केला.)

३ बुद्धानें प्राकृत भाषामध्यें लिहिण्याचा, बोलण्याचा उपक्रम केल्यामुळेंच त्याच्या धर्माचा प्रसार झाला, पण संस्कृत व वैदिक भाषांना फाटा दिल्यामुळें वैदिक परंपरेचें आयतेंच उच्चाटण झालें।

४ अहिंसेच्या पुरस्कारानें यज्ञयागादि प्रवृत्तिपर वैदिक कर्में दुष्ट ठरलीं व तिच्या अतिरेकानें समाज निवृत्तमांस, क्षात्रतेज व क्षात्रवृत्तिविहीन असा बनला. समाजांतील क्रौर्य व शौर्य या वृत्ति मारल्या गेल्या. क्षत्रिय राजे हे

बुद्धगया, भरहूत, ( प्रयाग आणि जबलपूर यामधील ठिकाण ) येथील उंच, उंच दगडी शिखरें, त्याच्या सभोंवार कोरलेले सुबक व नक्षीदार कठडे, त्या कठड्यावर कोरलेल्या हत्ती, सिंह, सुसरी यांच्या रांगा; झाडांच्या आकृती आणि इतर प्रेक्षणीय देखावे पाहून मन आश्चर्यचकित होतें ओरिसा प्रांतातील व्याघ्रगुहा, अजिंठ्यान्या गुहांतील चितारकाम, नाशीकच्या आसपास असणारे मठ हे सर्व प्रेक्षणीय असून त्यांत नक्षीच्या खांबांचा सुबकपणा तर अत्युत्तम साधला आहे सांची आणि अमरावति ( कृष्णा नदीचे मुखाजवळील एक प्राचीन शहर ) या ठिकाणचीं कोरीव कामें अत्यंत प्रेक्षणीय असून त्यांत परकीय शिल्पकलेची किंचितही छटा दिसून येत नाहीं शिल्पशास्त्रांतील ज्या बारीक सारीक खाचाखोचा असतात त्यासुद्धा वरील ठिकाणीं इतक्या सफाईनें आणि टापटिपीनें कोरलेल्या आहेत कीं, त्याबद्दल जगातील सर्व शिल्पशास्त्रज्ञांनी प्रशंसापर उद्गार काढले आहेत पुण्याजवळील कार्ल्यां या लेण्यासारखीं लेणीं पुष्कळ असून तीं याच कालांतील आहेत.

बौद्ध संस्कृतीनें आर्यसंस्कृतीवर केलेल्या या दोन सुपरिणामांशिवाय इतर दुष्ट परिणामांची यादी बरीच देण्यापेक्षा वाढविता येण्याजोगी आहे येथें फक्त प्रमुख बाबींचा नामनिर्देश केला आहे त्यावरून स्पष्ट दिसतें कीं, बौद्ध संस्कृतीनें आर्यसंस्कृतीचा पूर्ण पाडाव करून विजय मिळविला, व इस्लामच्या उग्र, क्रूर व रानदांडग्या अनुयायांना येथें राज्य स्थापण्याची पूर्व तयारी करून दिली. आमचें असें स्पष्ट मत आहे कीं, बौद्ध संस्कृति जर येथें बद्धमूल झाली नसती व समाजामध्यें वैदिकआर्यांची यात्रा व संस्कृतीच जर शाश्वत असती तर, इस्लामला पहिल्या एक दोन स्वाऱ्यानंतर चपराक खाऊन पुनश्च इकडे न येण्याचाच निश्चय करावा लागला असता !

बौद्ध संस्कृतीचा प्रभाव आर्यसंस्कृतीवर पडल्यामुळें ती निस्तेज व निर्वीर्य होऊन राष्ट्राचें व समाजाचें अपरिमित नुकसान झालें हें खरें आहे परंतु चीन, जपान, तिबेट इत्यादि देशांतहि बौद्ध संस्कृति गेली होती, तीमुळें त्या देशाचें नुकसान कितीसें झालें असा येणारा प्रश्नहि विचाराई आहे या प्रश्नाचें सरळ उत्तर [illegible], ही संस्कृति जेथें जेथें गेली ते देश सहिष्णुच झाले त्या समाजामध्यें [illegible] देशांमध्यें आज जी जयिष्णु वृत्ति आली आहे तिचें कारण त्यांनी या संस्कृतीला गुरुड घालून तिला व्यावहारिक स्वरूप दिलें व जेथें तें जमेना तेथें निराळी पाश्चात्य संस्कृति स्वीकारली हें होय ! चीन, जपान देशांतील लोकांनीं अहिं-

मेच्या वेडानें झुरळें, बेडूक्या, मासे, खाण्याचें सोडून दिलें नाहीं किंवा तेथील एकाद्या राजानें प्राणिहत्येच्या नदीचा निर्बंधहि केला नाहीं उलट जेव्हां बौद्ध भिक्षूंचें प्रस्थ अधिक वाढलें तेव्हा त्यांनी त्याचा छळ केला व भिक्षु भिक्षुणींचे विवाह कायदा करून लावले अशीं उदाहरणें चीन-जपानच्या इतिहासात सापडतात. तिबेट, व ब्रह्मदेश यासारखे जे देश आहेत त्यांनीं बौद्ध संस्कृति पूर्ण उचलली असें स्पष्ट दिसत आहे ! पण चीन-जपानादि उदया-मुख राष्ट्रें ही सारग्राहक आहेत त्यांनीं भलत्या क्षेत्रात भलत्या तत्त्वाचें महत्त्व केव्हाच वाढविलें नाहीं हिंदुस्थानात मात्र हें तारतम्य पुष्कळ दिवसापासून सुटलेलें आहे बौद्ध संस्कृतीविषयीं चिनी-जपानी ग्राच कशा आहे याविषयीं प्रा प ल वैद्य विलिंग्डन कॉलेज याच्या प्रबंधातील एक मार्मिक उतारा येथें देतों

" चिनी मनुष्याप्रमाणें आमचा जपानी मनुष्यहि एक प्रकारें (Eclectic) म्हणजे सार संग्राहक बनला आहे. स्वदेशभक्तीचा धडा त्यानें शिंतोपासून उचलला आहे व्यावहारिक आणि सामाजिक नीतिमत्ता कान्फ्यूशिअसपासून त्यानें घेतली आहे आणि परलोक व निर्वाण कल्पना त्यानें बौद्ध धर्मातून घेतल्या आहेत काऊन्ट ओकुमा यानें गल्या पन्नास वर्षांचा जपानचा इतिहास लिहिला आहे त्यात " राष्ट्रीय उत्सवासाठीं मी शिंतोधर्माच्या उपाध्यायाची मदत घेता तर, मृत्युशय्येवर असता बौद्ध भिक्षूस बोल वितों आणि स्वत चे वर्तणुकीच्या बाबतीत कान्फ्युशिअस आणि ख्रिस्ती धर्मांतील सुभाषितें यांना मान देतों असें वाक्य प्रोफेसर कूभे यांच्या तोंडी घातलें आहे हें वस्तुस्थितिनिदर्शक आहे ( बौद्धधर्माचा अभ्युदय आणि प्रसार, पा १२८ ) चिनी प्रोफेसर Tistan Hsu yen ching Mniversity Haitien Peking & China." " यांचीं चिनी संस्कृतीच्या इतिहासावर तीन व्याख्यानें हिंदु युनिव्हर्सिटीच्या प्रोफेसरांच्या क्रमामध्यें १९२६।२७ सालीं झालीं व्याख्यानानंतर बौद्धमताचा चिनी लोकांच्या क्षत्रिय वृत्तीवर काय परिणाम झाला असें विचारण्यांत आलें, तेव्हा त्यांनीं त्याचें उत्तर असें दिलें कीं, ' दक्षिणेकडील चिनी लोकांची क्षत्रिय वृत्ति थोडी कमकुवत झाली कारण त्यांचें मन विशेष परमार्थाकडे लागलें कान्फ्यूशिअसच्या ऐहिक वृत्तीच्या उलट ही वृत्ति होती."

मुसलमानांना येथें येऊन बद्धमूल होण्याजोगी पूर्वतयारी बौद्ध संस्कृतीनें कशी करून ठेविली होती हें या पूर्वार्धांत येथपर्यंत दाखविलें आहे

उत्तरार्धास प्रारंभ करण्यापूर्वी मागील विषयाचें थोडें सिंहावलोकन करूं। पहिल्या प्रकरणांत ग्रंथाची भूमिका सांगून पुढील तीन प्रकरणांत वेद, रामायण व महाभारतकालीन आर्यसंस्कृतीचें स्वरूप कथन केलें. भारतीय युद्धापासून पाणिनीपर्यंत अपकर्षाचीं बीजें रुजत चाललीं होतीं व त्या सर्वांचा स्फोट बौद्ध संस्कृतीच्या रूपानें झाला हें पांचव्या प्रकरणांत दाखविलें आहे आचार्यांच्या संन्यास व जगन्मिथ्यात्व, मीमांसकाचें अपूर्व, हीं बौद्धतत्त्वज्ञानाला मारण्याकरितां निघालीं, पण बौद्धमताचा जनमनावर झालेला संस्कार कुणालाहि नरडतां आला नाहीं, हें पांच सहा व सात या प्रकरणांत सांगितलें. बौद्ध धर्मांच्या संस्कारामुळें अहिंसेचा अतिरेक, मूर्तिविषयक अद्भुत कल्पना, यांनीं कोणते अनर्थ केले याचें विवेचन आठ व नऊ या प्रकरणांत केलें बुद्धोत्तरकालीन बाटाबाटी, शिवाशीव, स्त्रियाविषयीं अनुदारपणा याचा विचार दहाव्या प्रकरणांत करून अपकर्षाच्या अनेक कारणांचा विचार अकराव्या प्रकरणांत केला आहे. शेवटच्या प्रकरणांत बौद्ध संस्कृतीनें केलेल्या एकंदर आघातांनीं आर्यसंस्कृतीचा कसा घात झाला याचा आढावा घेऊन हा पूर्वार्ध पुरा केला आहे. उत्तरार्धामध्यें बौद्धसंस्कृतीच्या अगदीं उलट असें इस्लामचें स्वरूप कसें होतें, धर्माच्या एकांगी समजुतीमुळें हिंदुसंस्कृतीला तिच्याशीं टक्कर देतां देतां कसें पुरे पुरे झालें व त्यामुळें आधिभौतिक शोधाकडे पाहण्यास हिंदुसंस्कृतीला सवडच कशी झाली नाहीं इस्लाम व हिंदु संस्कृतीची झुंज चालत असतां एका शास्त्रसंपन्न प्रबळ संस्कृतीनें दोन्ही संस्कृतींना कसें व कोणत्या गुणांनीं गिळंकृत केलें, या पाश्चात्य संस्कृतीच्या कचाट्यांतून सुटण्याकरितां राष्ट्र धर्म, शास्त्रसंपन्नता, देशाभिमान, शिस्त, सहकार्य, स्वाभिमान, इत्यादि सद्गुण कसे आणिले पाहिजेत आणि इस्लामची नित्याची अरेरावी चुकविण्याकरितां हिंदुसमाजांत कोणत्या सुधारणा केल्या पाहिजेत, इत्यादि महत्त्वाच्या व प्रस्तुत जिव्हाळ्याच्या प्रश्नावर चर्चा करावयाची आहे अर्थात पूर्वार्धापेक्षां उत्तरार्ध हा वाचकांना अधिक आकर्षक, विचारप्रवर्तक, उपकारक व उपयुक्त असा आहे इतकेंच सांगून हा पूर्वार्ध संपवून थोडा वेळ विश्रांति घेतों.

**पूर्वार्ध समाप्त**